


**विजयनगर आणि परिसर**

(पाइश आणि नुनीझने उल्लेखिलेली स्थाने)

भारत सरकारच्या सर्वेक्षण विभागाच्या महानिदेशकांच्या परवानगीनुसार सर्वेक्षण खात्याच्या नकाशावर आधारित

# विजयनगरचे साम्राज्य

(दुमिंगुश पाइश व फेर्नाव नूनीश या
सोळाव्या शतकातील दोन पोर्तुगीज
बखरकारांनी लिहिलेला ग्रंथ)

भारत - देश आणि लोक

# विजयनगरचे साम्राज्य

लेखक

**दुमिंगुश पाइश व फेर्नाव नुनीश**

मूळ पोर्तुगीज ग्रंथाचा अनुवाद

**रॉबर्ट स्युअल**

संपादन

**वसुंधरा फिलियोझा**

मराठी अनुवाद

**चंद्रशेखर जहागिरदार**



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया.

## मुखपृष्ठ

हंपी येथील कृष्णपुऱ्यातील नरसिंहाची एकपाषाणी मूर्ती

मध्यवर्ती छायाचित्र सौ. वसुंधरा फिलियोझा यांच्या सौजन्याने.
इतर सर्व छायाचित्रे पॉंडिचेरी येथील फ्रेंच इन्स्टिट्यूटच्या सौजन्याने.

# प्रस्तावना

विजयनगरचे साम्राज्य १३३६ साली हरिहर ऊर्फ हुक्क आणि बुक्क या दोन भावांनी स्वामी विद्यारण्य यांच्या मदतीने स्थापन केले, असे परंपरा सांगते. या राजघराण्याच्या स्थापनेविषयी निरनिराळ्या लेखकांनी निरनिराळे सिध्दांत मांडले आहेत. काहींच्या मते या राज्याचे संस्थापक मुळात तेलुगू होते. पण बहुतेक विद्वानांच्या मते ते कानडी होते. विजयनगरचे संस्थापक मुळात कोण होते याची सविस्तर चर्चा इथे अभिप्रेत नाही, फक्त हे होयसळ घराण्याचे राजकीय वारस कसे ठरतात एवढेच दाखवावयाचे आहे.

होयसळ घराण्याचे शेवटचे दोन राजे तिसरा व चौथा बल्लाळ यांची कारकीर्द अनुक्रमे १३४२ व १३४५ पर्यंन्त चालू होती. शिलालेखांच्या मदतीने हे सिध्द होते की, यांच्या कारकीर्दीत पहिला हरिहर व पहिला बुक्क हे दोघेही होयसळ राज्यात चाकरी करत होते. इतर कोणत्याही दस्तावैजांपेक्षा शिलालेख जास्त विश्वसनीय असतात. त्यामुळे होयसळ वंशातील शेवटचे दोन राजे आणि विजयनगर घराण्याचे पहिले दोन राजे यांच्या कारकीर्दीतील शिलालेखांचा आढावा घेतला तर असा निष्कर्ष काढता येतो की, होयसळांचे प्रमुख सरदार, मांडलिक, आप्त तसेच त्यांच्या पदरी चाकरीस असणारे लोक या सर्वांनी हरिहर व बुक्क या दोन भावांना परकीय आक्रमणाच्या धोक्यापासून हिंदू साम्राज्य व धर्म यांचे रक्षण व्हावे यासाठी आपला पाठिंबा दिला. हा निष्कर्ष काढताना उत्तरकालीन वाङमयीन पुराव्यांचा विचार आपण करणार नाही. कारण त्यात दंतकथा, अनैतिहासिक घटना यांना वाव असल्यामुळे गोंधळ होतो.

होसपेटपासून सुमारे दहा किलोमीटर अंतरावर तुंगभद्रा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर हंपी वसलेले आहे. याच नदीच्या उत्तर किनाऱ्यावर अनेगोंदी वसलेले आहे. हंपीच्या ईशान्येस बारा मैलांवर कंपिली किंवा कांप्ली आहे. कर्नाटकाच्या इतिहासात कंपिली, अनेगोंदी आणि हंपी यांचे स्थान फार महत्वाचे आहे.

हंपीचा प्राचीन इतिहास महाकाव्य युगापर्यंत मागे जातो. रामायणकाळी हंपीला किष्किंधा म्हणत तर आजच्या तुंगभद्रा नदीचे नाव त्याकाळी पंपसरस असे होते. आजसुध्दा अनेगोंदीच्या चिंतामणी मठास गेल्यास तेथील लोक, रामाने सुग्रीवास राजपद देण्यापूर्वी ज्या ठिकाणी वालीचा वध केला ते ठिकाण दाखवतात. पंपमहात्म्य या ग्रंथात तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावरील एका तलावाचे वर्णन आहे. स्थानिक लोक त्याला सीताकुंड म्हणून ओळखतात. रावण सीतेला घेऊन लंकेस चालला होता.

त्यावेळी मार्गावर सीतेने या तलावात स्नान केले. हंपीतील कोदंडराम मंदिराच्या शेजारी हा तलाव आहे. इथेच रामाची हनुमानाशी भेट होऊन त्याने त्यास आपला दूत म्हणून सीतेला भेटण्यासाठी लंकेस पाठवले. याखेरीज तिथे काही निसर्गतः तयार झालेले चिरेबंदी रस्ते आहेत. त्यावर काही लांब रेषा दिसतात. यांना ''सीता सेरंगु'' म्हणजे सीतेची साडी असे म्हणतात. होसपेट ते अनेगोंदी या मार्गावर एक तलाव असून, तो नैसर्गिक खडकाळ टेकड्यांनी वेढलेला आहे. या तलावालादेखील पंप सरोवर असे म्हणतात. शिवाची प्राप्ती व्हावी म्हणून पार्वतीने इथे तप केले असे सांगतात. इथे दोन गुंफा आहेत. त्यापैकी एका गुंफेत शबरी रामाची वाट पाहात थांबली होती आणि तिथेच तिने त्याला बोरे दिली होती. तर दुसऱ्या गुंफेत पार्वतीने तप करून शिवाला प्रसन्न करून घेतले व मग त्याने तिला दर्शन दिले व नदीच्या दक्षिण तीरावर असणाऱ्या हेमकूट टेकड्यांवरील आपल्या निवासस्थानी जाण्याची आज्ञा केली, असे सांगतात. शिव-पार्वती विवाह हेमकूट टेकडयांवर साजरा झाला अशी लोकसमजूत आहे. यानंतर पार्वतीच्या नावावरून या जागेचे नाव पंपक्षेत्र किंवा हंपी असे पडले. काही वेळा तिथल्या विरुपाक्ष देवाच्या नावावरून या ठिकाणास विरुपाक्षतीर्थ असेदेखील म्हणतात.

या प्राक्कथांवरून हंपीचे इतिहासातील महत्वाचे स्थान लक्षात येते. अगदी आठव्या शतकापासून हंपीच्या नावाचा उल्लेख निरनिराळ्या शिलालेखात आढळून येतो. नवव्या शतकात हंपीवर चालुक्यांचा अंमल होता आणि चालुक्य सोमेश्वर स्वतः हंपीस दानधर्म करण्यासाठी गेला होता. नूनीश सांगतो त्याप्रमाणे काहींच्या मते विजयनगरच्या राज्याची स्थापना होण्याच्या सुमारास हंपी हे ओसाड व विरळ लोकवस्तीचे ठिकाण होते. पण खुद्द हंपीच्या विरुपाक्ष मंदिरातील एक शिलालेख पाहिल्यास या मताला इतिहासात आधार नाही हे सिध्द होते. या शिलालेखात लिहिले आहे, की ११९९ मध्ये नायक मादेगौडा याने मंदिराला काही जमीन दान दिली. यातून ब्राम्हणांसाठी अन्नछत्र चालवले जाई. हे 'छत्र' आजही अस्तित्वात आहे. पंपतीर्थात राहणाऱ्या सातशे ब्राम्हणांच्या समक्ष ही देणगी देण्यात आली. याच शिलालेखात हंपीचा उल्लेख विरुपाक्षतीर्थ असाही आहे. हंपी त्याकाळी विरुपाक्षतीर्थ आणि पंपक्षेत्र या दोन्हीही नावाने ओळखले जात होते, याचा उल्लेख अगोदर आलेलाच आहे.

यानंतर हंपी होयसळांच्या अंमलाखाली आले. विरुपाक्ष मंदिरातील एका शिलालेखात होयसळ राजा सोमेश्वर आणि त्याने आपल्या कारकीर्दीत केलेला दानधर्म यांचा उल्लेख आहे. हेमकूट टेकडयांवरील एका शिवमंदिरात सापडलेल्या १३०० सालच्या एका शिलालेखात कंपिली देवाने ते मंदिर बांधले असा उल्लेख आहे. याचा अर्थ असा की, तिसऱ्या नरसिंहाच्या कारकीर्दीत होयसळ राजांनी हंपी जिंकून घेतले. त्यांचा मुलगा तिसरा बल्लाळ याने १३२१ च्या सुमारास पुन्हा ते जिंकून परत मिळवले. यानंतर ते तिसऱ्या बल्लाळाचा मुलगा चौथा बल्लाळ यांच्या ताब्यात होते. तिसऱ्या

बल्लाळाच्या मुलाचे नाव हंपीच्या विरुपाक्ष देवावरून विजय विरुपाक्ष बल्लाळ असे ठेवण्यात आले होते. आपल्या या मुलाच्या नावावरून तिसऱ्या बल्लाळाने हंपीचे नाव विजय विरूपाक्ष होयपट्टण असे ठेवले. एका शिलालेखात चौथ्या बल्लाळांचा उल्लेख हंपेवोदेयार असा आढळतो. तिसऱ्या व चौथ्या बल्लाळाच्या कारकीर्दीत हंपीला-विरुपाक्ष होसपट्टण, विजय विरुपाक्षपट्टण, विरुपाक्षपदा इत्यादी निरनिराळी नावे होती.

यानंतर संगमाची मुले होयसळानंतर जेव्हा गादीवर आली तेव्हा हंपी हे त्यांच्या राजधानीचे शहर म्हणून राहिले. त्याचे होसपट्टण हे नावही बराच काळ त्यांनी वापरात ठेवले. १३६८ च्या एका शिलालेखात हंपीचा उल्लेख अभिवन विजयनगर असा आहे. नंतर नेहमीच्या वापरात ते नुसते विजयनगर असे झाले.

संगमाविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही, पण तो होयसळांच्या पदरीचा एक लहान सरदार असला पाहिजे. त्याला पाच मुले होती. पहिला हरिहर, पहिला कंपण्णा, पहिला बुक्क, मरप्पा आणि मुद्दप्पा. हे सर्व संगम सहोदर म्हणजे संगम बंधू या नावाने ओळखले जाऊ लागले आणि त्यांच्या घराण्याला संगम राजघराणे असे नाव पडले.

एक दंतकथा अशी आहे की, तुंगभद्रेच्या तीरावर एकदा शिकारीस गेले असताना पहिल्या हरिहराची विद्यारण्य या तपस्व्याशी भेट झाली. आपण जाटेवर काय पाहिले हे हरिहराने त्या तपस्व्याला सांगितले. ज्या सशाचा तो पाठलाग करत होता त्या सशाने उलटून त्याच्या कुत्र्यांवर हल्ला करून त्यांना चावे घेतले होते. ही कथा ऐकल्यानंतर त्या तपस्व्याने हरिहराला त्या ठिकाणी साम्राज्य स्थापन करण्यास सांगितले आणि त्याची राजधानी सुवर्ण, संपत्ती यांनी संपन्न व्हावी, असा आशीर्वाद देवी भुवनेश्वरीची प्रार्थना करून तिला मागितला. ही प्रार्थना फलद्रुप झाल्याने पहिल्या हरिहराने कृतज्ञतापूर्वक त्या तपस्व्याचे विद्यारण्य हे नाव आपल्या राजधानीस दिले. कालांतराने विद्यारण्य नावाचे 'विजयनगर' असे नाव झाले. या किंवा अशा प्रकारच्या दंतकथांना इतिहासात आधार नाही.

पण ही दंतकथा आजही का सांगितली जाते? त्या तपस्व्याचे पूर्वीचे नाव माधव असून, तो मायण आणि श्रीमती यांचा वडील मुलगा होता. वेदावरील प्रसिध्द भाष्यकार सायण आणि पहिल्या कंपचा मुलगा असणारा दुसरा संगम यांच्या दरबारात विदूषक असणारा भोगनाथ हे त्याचे दुसरे दोन भाऊ होते. हे तिन्ही भाऊ श्रृंगेरी मठाच्या आचार्यांचे शिष्य होते. शेवटचा होयसळ राजा मरण पावल्यानंतर राजपदावर संगम बंधू आले. यात माधवाने महत्वाची कामगिरी बजावली असली पाहिजे. काही काळासाठी तो पहिल्या हरिहराचा मंत्रीदेखील होता. १३४६ साली पहिल्या हरिहराने आपल्या विजयाप्रीत्यर्थ श्रृंगेरी मठाला देणग्या दिल्या. काही शिलालेखानुसार, नंतर १३४६ साली विद्यारण्य श्रृंगेरी मठाच्या गादीवर येऊन आचार्य झाले. १३८५ साली ते 'परिपूर्ण' म्हणजे कैलासवासी झाले. त्यांचा जीवात्मा परमात्म्यात विलीन पावला.

माधवाचे परशुराम संहितेवरील भाष्य आणि विद्यारण्यचा जीवन्मुक्तीविवेक हा ग्रंथ, यावरून माधव आणि विद्यारण्य या दोन व्यक्ती नसून, एकच असावी असे लक्षात येते. माधव ऊर्फ विद्यारण्य याच्या मृत्यूनंतर हिंदू धर्म आणि साम्राज्याची त्याने केलेली सेवा स्मरणात ठेवून लोकांनी त्यांच्याविषयी विविध गोष्टी सांगण्यास सुरुवात केली असली पाहिजे. प्रत्यक्ष ऐतिहासिक घटितांपेक्षा या दंतकथांचे आवाहन जास्त लोकप्रिय ठरले आणि खरा इतिहास अंधारात राहिला.

हरिहर हा संगम वंशाचा पहिला राजा. काही शिलालेखांचा आधार घेता, त्याची सत्ता १३५७ पर्यन्त होती असे दिसते. प्रथम कोलार आणि नंतर कडप्पा, नेलोर यावर राज्य करणारा पहिला कंप १३५१ साली मरण पावला. त्यानंतर पहिला बुक्क आपल्या भावामागे गादीवर बसला. हाच खरा विजयनगरचा शिल्पकार होय. आपला भाऊ पहिला हरिहर जिवंत असतानादेखील हा राज्य करीत होताच. या दोन्ही भावांच्या नावाचे पुष्कळ शिलालेख सापडले आहेत. यावरून असे दिसून येते त्या दोघांचे एक प्रकारचे सहशासन होते. स्वतंत्र राजा म्हणून पहिल्या बुक्काने १३५७ ते १३७७ पर्यंत विजयनगरवर राज्य केले व १३७७ साली तो मरण पावला. पहिल्या बुक्कचा एक मुलगा कंप ऊर्फ कुमार कंपण्ण याने मदुराईपर्यन्त मजल मारली व मुसलमानांचा पाठलाग करून तेथून त्यांना हुसकावून लावले, मदुराईच्या सुलतानास मारले आणि त्या शहराला परकियांच्या जोखडातून मुक्त केले. १३७४ मध्ये किंवा त्या सुमारास, दुसरा कंप याच्या मृत्यूपूर्वी, मदुराई स्वतंत्र झाले. श्रीरंगम येथे श्रीरंगनाथाच्या मूर्तीची पुन्हा प्रतिष्ठापना करण्याचे श्रेय दुसरा कंप याचा मंत्री गोपण्णा याच्याकडे जाते. गोपण्णाने आपल्या राजाने काढलेल्या दक्षिणेवरील मोहिमांमध्ये सक्रिय भाग घेतला होता. गंगादेवीच्या मदुराविजयात मदुराईच्या मुक्तीचे बोलके वर्णन आलेले दिसते.

पहिल्या हरिहरचे दोन भाऊ मरप्पा आणि मुद्दप्पा यापैकी मरप्पाचा अंमल गोव्याच्या प्रदेशावर होता तर मुद्दप्पाचा अंमल आजच्या कोलार जिल्ह्यातील मालूरवर होता. या दोन्ही भावांचे १३४६ सालचे दोन शिलालेख सापडले आहेत.

बुक्कचा आणखी एक मुलगा दुसरा हरिहर बापाच्या मृत्यूनंतर गादीवर आला आणि इ. १५०४ पर्यन्त त्याने आपले भाऊ, चुलतभाऊ आणि मुले यांच्या मदतीने विजयनगरवर सहजपणे राज्य केले. त्याचा मोठा भाऊ[१] विरूपाक्ष याने नारायण विलास नावाचे नाटक लिहिले आहे. त्यात साम्राज्याचा विस्तार लंकेपर्यन्त होता असा उल्लेख आहे. आपला पिता बुक्क याच्याप्रमाणेच दुसरा हरिहरदेखील संस्कृत भाषेचा आश्रयदाता असून, त्याने कन्नड व इतर वाङ्मयांच्या विकासात भर घातली. याच

---

१. लेखनिकाने यातील पद्यात एक चूक केलेली आहे. त्याचे वाचन पुत्रो बुक्कनेंद्रस्य दौहिओ रामभूपते विद्यतेही विरूपाक्षो राजा हरिहराग्रजः असे असावयास हवे.

सुमारास विजयनगरचे नाव विद्यानगर असे बदलण्यात आले. कारण अगोदरच्या कोणत्याही शिलालेखात विद्यानगर हे नाव आढळत नाही.

याच वेळी म्हणजे १३४७ मध्ये तुंगभद्रेच्या उत्तर तीरावरील कलबुर्गी आजचे गुलबर्गा - येथे हसन गंगू बहामनी याचे मुस्लीम राज्य स्थापन झाले. याला बहामनी राज्य म्हणत. तुंगभद्रा आणि कृष्णा या दोन नद्यांमध्ये असणाऱ्या प्रदेशासाठी या दोन राज्यात सतत लढाया झाल्या. विजयनगर व बहामनी राज्यांच्या इतिहासाच्या अभ्यासकाला रायचूर आणि मुद्गलच्या लढाया हमखास माहिती असतात. विजयश्री या दोन्ही राज्यांशी जणू लपंडाव खेळत होती.

१४०६ मध्ये दुसऱ्या हरिहरचा मृत्यू झाला आणि त्याचा मुलगा पहिला देवराय गादीवर आला. पण त्या अगोदर, म्हणजे १४०४ ते १४०६ या काळात हरिहरचा आणखी एक मुलगा दुसरा बुक्क राजपदी होता. आपल्या धाकट्या भावासाठी त्याने स्वखुशीने राजसिंहासनाचा त्याग केला आणि सुदूर दक्षिणेतील एका प्रांताचा प्रमुख म्हणून तो राहिला.

## साळुव घराणे

साळुव हे लोक पहिल्यापासूनच संगमांच्या पदरी चाकरीस होते. पहिला बुक्क याचा मुलगा दुसरा कंप यांच्या शिलालेखात एका साळुव सरदाराचा सर्वात पहिला उल्लेख आढळून येतो. साळुव मंगू हा दुसरा कंप याच्याबरोबर दक्षिणेवरील मोहिमेत होता, त्यात त्याने सक्रिय भाग घेतला आणि कांचीपुरम जवळील राजगंभीर मलाई येथील संभुवराय सरदारांना नमवले, अशी माहिती काही शिलालेखामध्ये आहे.

साळुव नरसिंहाने दुसरा देवराय याचा दिवाण म्हणून आपल्या कारकीर्दीस सुरुवात केली व नंतर त्याचे वारस गादीवर आले तेव्हादेखील तो याच पदावर राहिला. पण नंतरच्या राजामध्ये आवश्यक ते गुण नव्हते आणि त्यामुळे राज्यास धोका आहे हे पाहून त्याने राजपद बळकावून घेतले. विजयनगरच्या विविध प्रांतांत ब्राह्मण लोक गडबड करत होते. त्याखेरीज ओरिसाचा राजा आपल्या राज्याचा विस्तार विजयनगरपर्यन्त व्हावा या प्रयत्नात होता. नरसिंहाने विजयनगरने गमावलेला प्रदेश पुन्हा मिळवण्याचा यथाशक्ती प्रयत्न केला. पण तो १४९५ मध्ये मरण पावला आणि त्याचा मुलगा गादीवर बसला.

पण दुर्दैवाने हा नवीन राजाही परिस्थितीशी तोंड देऊ शकला नाही. त्यामुळे विजयनगरचे भवितव्य पुन्हा एका धोक्यात आले. तुळुव घराण्याचा नरसन्नायक हा साळुवांचा मंत्री होता. सर्व परिस्थिती लक्षात घेऊन १५०३ मध्ये तो राज्यावर आला.

## तुळुव घराणे

तुळुव नरसिंह हा विजयनगरच्या गादीवर चार वर्षांच्या थोडक्या कालावधीसाठी होता. त्याला तीन बायका होत्या (तिप्पाजी, नागलदेवी ऊर्फ नागजी अम्मा आणि देवांबा ऊर्फ ओबलंबा). त्यांच्यापासून त्याला चार मुले झाली. भुजबळ नरसिंहराय, कृष्णदेवराय, अच्युतराय आणि रंगराय. १५०९ पासून भुजबळ नरसिंहराय आणि कृष्णदेवराय या दोघांचा एकत्रित अंमल सुरू झाला. रायवाचकम या ग्रंथानुसार आपला भाऊ कृष्णदेवरायसाठी भुजबळ नरसिंहाने राजसिंहासनाचा त्याग केला. नंतर साम्राज्य वाढवण्याच्या कामात त्याने सक्रिय भाग घेतला. १५१६ पर्यन्तचे त्याचे शिलालेख मिळतात. त्यात कृष्णदेवराय विजयनगरच्या रत्नजडित सिंहासनावर बसला असताना भुजबळ नरसिंहाने काही सरदारांवर हल्ले करून त्यांना नमवले, अशी माहिती आहे. नूनीशने आपल्या बखरीत वर्णिला आहे, त्या प्रकारचा कोणताही कौटुंबिक कलह नव्हता हे आपल्याला या शिलालेखांवरून कळते.

इ. स. १५०९ पासून कृष्णदेवरायाची वैभवशाली कारकीर्द सुरू झाली. त्याच्या साम्राज्याचा विस्तार पूर्वेकडे ओरिसापर्यन्त, पश्चिमेकडे भटकळ व होनावरपर्यन्त, उत्तरेकडे रायचूर पर्यन्त, तर दक्षिणेकडे समुद्र किनाऱ्यापर्यन्त असा झाला. काही शिलालेखात तर रायाने लंकेवर कर लादले होते, असेही वर्णन आहे. आपल्या A History of Karnatak या ग्रंथात डॉ. पी. बी. देसाई यांनी संदर्भ न देता काही सिलोनी लोकगीतात रायाने लंकेवर मिळवलेल्या विजयाच्या कथा गुंफल्या आहेत, असे लिहिले आहे. रायचूर व मुदगल हे विजयनगरच्या अंमलाखाली आले आणि तालीकोटची लढाई व विजयनगरचा पाडाव होईपर्यन्त ते विजयनगरच्या राजांकडेच होते. नूनीश म्हणतो की, कृष्णदेवरायाच्या मृत्यूनंतर लवकरच विजयनगर साम्राज्याने रायचूर व मुदगल ही शहरे गमावली. पण शिलालेखांच्या पुराव्यावरून हे विधान चूक असल्याचे सिध्द करता येते.

रायाने उदयगिरी, कोंडविडू कोंडपल्ली, केतावरम इत्यादी ठिकाणांवर केलेल्या स्वाऱ्यांची माहिती पुष्कळच शिलालेखात दिलेली आढळून येते. या स्वाऱ्यांतील विजयानंतर रायाने असे फर्मान काढले की, प्रत्येक महत्वाच्या मंदिरासमोर भव्य गोपुरे बांधण्यात यावीत. त्यानुसार हंपी येथील विठ्ठल मंदिर, तसेच तिरुवन्नमलाई, चिदंबरम, कळहस्ती, श्रीरंगम, तिरुपती या ठिकाणांच्या मंदिरासमोर गोपुरे बांधण्यात आली. ती गोपुरे आजही दिसतात. त्यांना 'रायगोपुरे' म्हणतात. स्वतः कृष्णदेवराय संस्कृत, तामीळ आणि कन्नड या भाषांमध्ये पारंगत होता. शिवाय तेलगू साहित्याला त्याने चांगला आश्रय दिला. त्याचा कालखंड तेलगू साहित्याचा वैभवशाली कालखंड समजला जातो. त्याने स्वतः जी ग्रंथरचना केली त्यात तेलगूतील "आमुक्तमाल्यदा" आणि संस्कृतमधील 'जांबवतीकल्याण' यांचा समावेश होतो. 'नवरत्ने' म्हणवले जाणारे

## विजयनगरच्या राजांची वंशावळ

(अंदाजे काळ शिलालेखांवरून)

### संगम घराणे



नऊ कवी त्याच्या दरबारात होते. पण यापैकी एक कवी तेनाली रामलिंगम याच्या काळाविषयी काहीशी शंका असल्याने त्यांची संख्या आठ होती असे काही जण म्हणतात. या आठ जणांना 'अष्टदिग्गज' म्हणत.

विजयनगर यावेळी वैभवाच्या आणि भौतिक विकासाच्या शिखरावर होते. राज्याला भेट देणारे परकीय प्रवासीदेखील त्याचा थाट व ऐश्वर्य पाहून प्रभावित होत. बरीच उपनगरे राजधानीस जोडण्यात आली ज्यायोगे तिचा विस्तार आजच्या होसपेटपर्यन्त झाला. कृष्णदेवरायाच्या काळातच तीन उपनगरे जोडण्यात आली, ती अशी: तिरुमलेदेवीअम्मनपट्टण ज्याचे नांव त्याची गतर्भतृका राणी तिरुमलादेवी हिच्यावरून ठेवण्यात आले, नागलपूर जे त्याची आई नागलदेवी ऊर्फ नागजीअम्मा हिच्या प्रीत्यर्थ वसवण्यात आले आणि साले तिरुमलेरायनपूर जे त्याच्या मुलाच्या नावे बांधण्यात आले. खुद्द राजधानीतच कृष्णपूर नावाची नवीन वसाहत निर्माण करण्यात आली. राजाने तिथे एक मंदिर बांधून त्यात कृष्णाची मूर्ती स्थापन केली. उदयगिरीच्या विजयानंतर त्याने ही मूर्ती आणली होती. राजा आणि त्याच्या स्त्रियांनी विठ्ठल मंदिरास बऱ्याच देणग्या दिल्या. मंदिर जिथे होते तो भाग विठ्ठलपूर म्हणून ओळखला जाऊ लागला.

नवी मंदिरे बांधण्यात आली, जुन्या मंदिरांची डागडुजी करण्यात आली. कृष्णदेवरायाच्या कारकीर्दीत कृष्णमंदिर, लक्ष्मी नरसिंहमंदिर (आता त्याला उग्रनरसिंह मंदिर म्हणतात), हंपीच्या मार्गावरील अनंतशयन देवाचे अनंतशयनगुडी - ही मंदिरे बांधण्यात आली. ज्या भागात आता अनंतशयनाचे मंदिर आहे तो भाग विजयनगरकाळी साले तिरुमलेरायनपूर म्हणून ओळखला जाई. राजपुत्र तिरूमलेरायावरून हे नाव देण्यात आले होते. ('साले' या शब्दाचा अर्थ 'जवळ' असा होता आणि हे शहर तिरुमलेदेवी अम्मपट्टणला लागून होते.) होसपेटमध्ये एक विष्णुमंदिर असले पाहिजे कारण १५३१ पासूनच्या शिलालेखांमध्ये त्याचा उल्लेख आढळतो. पण अद्याप मला त्याचा माग लागला नाही आणि शहरातील कोणालाही या मंदिराविषयी काही माहिती नाही. अनंतशयन गुडीहून काही मैलांवर असलेल्या नागलपूर किंवा आताचे नागेनहळ्ळी येथे दोन मंदिरे आहेत. यापैकी एक नागशयन या नावाने विष्णूचे असून, दुसरे नागेश्वर या नावाने शिवमंदिर आहे. नागसमुद्र नावाचा एक मोठा तलावही इथे बांधण्यात आला होता. अगोद्रर सांगितले आहे त्याप्रमाणे या उपनगराला राजमाता नागलदेवी हिचे नाव देण्यात आले होते. भव्य गोपुरे, स्तंभ असलेली बोळ, भित्तीचित्रे आणि शिल्पाकृती यामुळे ही सर्व मंदिरे अत्यंत सुंदर ठरतात. कृष्णमंदिराच्या पूर्वेकडील गोपूरावर राजाच्या उदयगिरी मोहिमांचे भित्तीचित्रण केलेले आहे. विठ्ठल मंदिरातील शिल्पे आणि त्याची वास्तुशास्त्रीय भव्यता प्रशंसा करावी अशी असेल तर अनंतशयन गुडी येथील प्रशस्त आणि घुमटाकृती छते असणारा गाभारा

मंत्रमुग्ध करून टाकणारा आहे.

कृष्णदेवरायाची ही वैभवशाली कारकीर्द १५२९ साली संपली. त्याचा एक मुलगा तिरुमलेराय याचा अल्पवयीन मृत्यू झाला. त्याचा दुसरा मुलगा अजून राजपदावर बसण्याइतका सज्ञान झाला नव्हता. त्यामुळे त्याचा सावत्र भाऊ अच्युतराय १५३० मध्ये गादीवर आला.

अच्युतराय व्यसनी, एकतंत्री व जुलुमी झाला असे नूनीश लिहितो. हे विधान बरोबर असेल. त्या काळच्या राजकीय परिस्थितीचा अभ्यास करून आपल्याला त्याची सत्यासत्यता पाहता येईल. कृष्णदेवराय मरण पावला तेव्हा आपल्या पाठीमागे त्याने एक संपन्न, शांततामय असे राज्य ठेवले होते. वरवर पाहता सर्वत्र शांतता होती आणि परकीय आक्रमणाचा धोका दिसत नव्हता. अच्युतरायाच्या कारकीर्दीतील कला आणि वास्तुशास्त्र यांचा विकास झाला. तिरुवेंगलअनंत - ज्याचे नाव चुकीने अच्युतराय मंदिर पडले - रघुनाथ मंदिर (ज्याचे नाव पुन्हा चुकीने पट्टाभिराम मंदिर असे पडले) आणखी एक रघुनाथ मंदिर ज्याला पुन्हा चुकीने शिवमंदिर किंवा कल्लार ('चोर') मंदिर म्हणू लागले, ही सर्व मंदिरे वरदजम्मनपट्टण येथे बांधण्यात आली व त्यांच्या विस्तारासाठी किंवा देखभालीसाठी भरघोस देणग्या देण्यात आल्या. लेपाक्षीचे वीरभद्र देवालय त्याच्या वास्तुशास्त्रीय सौंदर्यासाठी आणि चित्रांसाठी प्रसिध्द आहे. कांचीपुरम येथे वरदराज मंदिरात राजाने आपली राणी वरदाजम्मा आणि मुलगा वेंकटगिरी यांची मौक्तिकतुला केली. त्याने स्वतः 'आनंदविधी' आणि 'सुवर्णमेरू' अशा दोन देणग्या हंपी येथील विठ्ठल मंदिरास दिल्या. त्याची पहिली राणी वरदाजम्मा हिच्या प्रीत्यर्थ वरदाजम्मनपट्टण हे नवीन उपनगर वसवण्यात आले. भव्य देवालये, बाजार आणि निवासस्थाने यांनी त्याचे सौंदर्य वाढले. अच्युतरायच्या काळी बांधलेल्या इतर इमारतीदेखील त्यांची उंची व आकार यांसाठी प्रसिध्द आहेत.

विठ्ठलमंदिराच्या उत्तरेकडील पायऱ्यांच्या दगडी चौथऱ्यावर १५४१ सालच्या एका शिलालेखाचा काही भाग आहे. हा भाग उत्तरकालीन दुरुस्ती नसून मूळ वास्तूचाच भाग आहे असे सिध्द झाले तर त्या सुंदर मंडपाचे बांधकाम अच्युतरायाच्या काळीच झाले असा निष्कर्ष काढता येतो. भव्य कोरलेले एकपाषाणी स्तंभ व अर्धस्तंभ असलेला हा 'महारंग मंडप' त्या प्रकारच्या वास्तुरचनेत पहिलाच ठरतो. या ठिकाणी वापरण्यात आलेला गुणधर्म असा, की अर्धस्तंभावर बोटांनी हलकेच मारल्यास संगीतमय नाद ऐकू येतात. सुप्रसिध्द हिंदुस्थानी गायक वसंत कवळी यांनी योग्य प्रयोग करून हे निःसंशयपणे सिध्द केलेले आहे. या एकाच मंडपावरून अच्युतराय हा ललितकलांचा थोर प्रेमी असला पाहिजे हे सिध्द होते. अच्युतरायाच्या दरबारात थोर वास्तुशास्त्रज्ञ व शिल्पकार होते. दुर्दैवाने त्यांची नावे अज्ञात आहेत. आपल्या राज्याच्या आर्थिक स्थितीची फारशी पर्वा न करता किल्ले बांधण्यासाठी प्रचंड पैसा ओतणारा आणि त्यामुळे वेडा ठरून पदच्युत

होणारा बव्हेरियाचा लुडविग याच्या कारकीर्दीशी अच्युतरायच्या कारकीर्दीशी तुलना होऊ शकते.

अच्युतराय १५४१ साली मरण पावल्यावर त्याचा मुलगा वेंकटाद्रि हा गादीवर आला. पण त्याचा अल्पवयात मृत्यू झाल्यामुळे त्याची कारकीर्दही अल्पकालीन ठरली. त्याच्यानंतर त्याचा चुलतभाऊ म्हणजे रंगरायचा मुलगा सदाशिवराय गादीवर बसला.

काही शिलालेखानुसार सदाशिवराय जरी गादीवर होता तरी राज्याचा सर्व कारभार मात्र कृष्णदेवरायचा जावई रामराय हा पाहत होता. अच्युतरायाच्या काळातच रामराय प्रबळ नेता झाला होता. सदाशिवरायांच्या काळात तर कारभाराची सर्व सूत्रे त्याच्या हाती एकवटली. आपल्या नावची नाणीदेखील त्याने पाडली. आजसुध्दा 'रामरायन्न गद्यण' या नावाने ती पाहावयास मिळतात. रामराय हा काहिसा अव्यवहारी असल्याचे सांगतात. त्यामुळेच विजयनगरच्या वैभवशाली साम्राज्याची अखेर झाली.

विजयनगरच्या इतिहासात तो 'अलिय-रामराय' म्हणजे 'जावई रामराय' म्हणून ओळखला जातो. मोडकळीस आलेल्या बहामनी राज्यातून पाच शाह्या निर्माण झाल्या. ही शाही राज्ये आणि विजयनगर यात सतत लढाया चालत. काही वेळा या शाह्यांचे राजे आपसात लढत असताना विजयनगरची मदत घेत. एका प्रसंगी रामरायाने विजापूरच्या सुलतानाला साहाय्य केले. त्यामुळे हा सुलतान रामरायाशी कृतज्ञ राहिला. तथापि विजयनगरची संपत्ती व वैभव यांचा हेवा वाटून सर्व शाही राज्ये एकत्र आली आणि १५६५ मध्ये या हिंदू राज्याविरुध्द त्यांनी युध्द पुकारले. तालिकोट ऊर्फ राक्षसगी तंगडीची प्रसिध्द लढाई ती हीच. विजापूरचा सुलतान आपला विश्वासघात करणार नाही असे वाटल्याने रामरायाने शाह्यांचे हे आव्हान फारशा गंभीरपणे स्वीकारले नाही. रणांगणावर, विजापूरचा सुलतान तर सोडून द्या पण खुद्द रामरायाच्या फौजेतील दोन हजार मुसलमान सैनिक मोक्याच्या क्षणी त्याच्यावर उलटले व फितूर झाले. रामरायाचे त्यावेळी वय झाले होते. लढण्यासाठी तो हत्तीवर चढण्याचा प्रयत्न करीत होता. पण अगोदर झालेल्या जखमांमुळे हत्ती मरण पावला. रायाने मग उडी मारून घोड्यावर स्वार होण्याचा प्रयत्न केला आणि लढणे चालू ठेवले. पण काळ त्याला अनुकूल नव्हता. त्याचे डोके धडापासून वेगळे करून शत्रूंनी आपल्या ताब्यात घेतले. मुसलमान मग राजधानीत शिरले, त्यांनी लुटालूट केली, देवळांची - विशेषत: संपन्न अशी विठ्ठल मंदिराची - नासधूस केली आणि हंपीची धूळधाण केली. लढाईतील पराजयानंतर सदाशिवरायने साम्राज्य पुन्हा उभे करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला, पण त्याला यश आले नाही. अशा रीतीने १५७० साली किंवा त्या सुमारास हंपीची अखेर झाली. त्यानंतर बऱ्याच काळपर्यन्त हंपी म्हणजे सरपटणारे प्राणी, वन्य श्वापदे, चोर आणि गुप्त खजिन्याच्या शोधात असणारे लंबाडी व उत्तर भारतीय साधू या सर्वांचे आश्रयस्थान झाले होते. आज ते सहज जाता येण्यासारखे सुप्रसिध्द पर्यटन केंद्र आहे. गुप्त खजिना शोधणारे आणि

इतर विध्वंसक यांनी ज्या हंपीची निर्दयपणे मोडतोड केली होती, तिचे अवशेष, देवालये आणि शिल्प यांचे संरक्षण करण्याचा प्रयत्न पुरातत्व विभागाने आपल्या परीने चालू ठेवला आहे.

### ग्रंथातील दोन वृत्तांताविषयी

हस्तलिखिताची एक प्रत पॅरिस येथील बिब्लिओतेक नेस्योनाल येथे उपलब्ध आहे. विजयनगरच्या इतिहास लिहिण्याच्या उद्देशाने कागदपत्रे गोळा करून असणाऱ्या एखाद्या इतिहासकारासाठी कोणी तरी हे हस्तलिखित उतरवून काढले असावे. या अज्ञात व्यक्तीने पहिल्यांदा नूनीशची बखर उतरवून काढली होती. नंतर एकच माणूस सर्व काही सांगू शकणार नाही या विचाराने त्याने पाइशचा वृत्तांतही उतरवून काढला. त्याला त्याने जी पुस्ती जोडली तिचे रॉबर्ट स्युअलने केलेले भाषांतर असे : ''मी शहरात (? गोवा) राहात असल्याने हुजुरांनी जी इच्छा मजपाशी व्यक्त केली होती, की बिसनागमध्ये अगोदर वास्तव्य केलेल्या माणसांचा मी शोध घ्यावा, ती पूर्ण करणे मला आवश्यक वाटले. कारण तेथे गेलेला कोणीही इसम येताना तिथल्या परिस्थितीविषयी दस्ताभर कागदाचा मजकूर लिहून आणल्याखेरीज राहात नाही, हे मला पक्के ठाऊक आहे. येणेप्रमाणे हा गोषवारा एक दुमिगुश पाइश याजकडून घेतला. हा पाइश तिथे जात असतो आणि कृष्णरायाच्या काळात क्रितोव्हांव द फिगैरेदु बिसनागास असताना हाही तिथे होता. फेर्नांव नूनीश याजकडून मी दुसरा गोषवारा घेतला. नूनीश तिथे तीन वर्षे घोड्यांचा व्यापार करीत होता (तो फारसा फायदेशीर ठरला नाही). एक माणूस सर्व काही सांगू शकत नाही - तो काही गोष्टी सांगेल ज्या दुसरा सांगणार नाही - या कारणास्तव मी दोघांनी लिहिलेले दोन्ही गोषवारे पाठवत आहे. मी अगोदर म्हणालो त्याप्रमाणे त्यातला एक कृष्णरायाच्या काळात लिहिला गेला दुसरा त्यानंतर सहा महिन्यांनी तिथून पाठवण्यात आला. मी असे करू इच्छितो कारण दोन्हीमध्ये काय उपयोगी आहे हे हुजुरांना उमगेलच. आणखी म्हणजे बिसनागच्या राजाबद्दलची बखर आहे. त्यातील काही गोष्टी आपणास जादा भरवशाच्या वाटतील कारण दोन्ही बखरी एकमेकांशी जुळतात. पहिल्यांदा बिसनागच्या राज्यात गेल्यानंतर त्याने (म्हणजे दुमिगुश पाइशने) जी बखर लिहिण्यास सुरुवात केली तिची नक्कल खालीलप्रमाणे आहे.'' नकलनवीसाने याच पानावर मग पाइशचा वृत्तांत चालू ठेवला आहे. मूळ संहितेत नूनीशची बखर पहिल्यांदा येते. पण कालानुक्रमे पाहिल्यास नूनीशच्या अगोदर पाइशने राजधानीस भेट दिली होती. यासाठी स्युअलने या वृत्तांताचा क्रम कालानुक्रमेच - म्हणजे आधी पाइश व नंतर नूनीश - असा ठेवला. हा क्रम आम्ही बदलला नाही.

पाइशने विजयनगरचे वैभव पाहिले तर नूनीशने विजयनगरच्या राजाचे ऐश्वर्य व त्यांचे दोष व उधळपट्टी या दोन्ही गोष्टी पाहिल्या. पाइश हा माहितगार माणूस असावा. त्याने जे पाहिले त्याविषयी लिहिले आहे. नूनीशप्रमाणे तो दंतकथा, कल्पित

कथा, ऐकीव गोष्टी सांगत नाही. नूनीशच्या बखरीने आपल्याला त्यावेळी रूढ असणाऱ्या दंतकथा समजण्यास मदत होते. या दंतकथा म्हणजे विजयनगरच्या साम्राज्याची स्थापना किंवा कृष्णदेवरायचा गणिकेशी झालेला विवाह इत्यादींविषयी होत. या दोन्ही वृत्तांताचा अभ्यास केल्यास राजधानीचे नियोजन कसे आखण्यात आले आणि तत्कालीन रुढी व शिष्टाचार तसेच सामाजिक जीवन कसे होते हे समजून येते. नूनीशने केलेली गावांची व युध्दांची वर्णने आणि पाइशने दिलेली उत्सवाची माहिती ही काही ठिकाणी थोडीशी अतिशयोक्तीपूर्ण असली तरी तत्कालीन लोकांच्या जीवनपध्दतीचे स्वरूप स्वारस्यपूर्णरीतीने उलगडून दाखवतात.

वृत्तांतात देण्यात आलेली काही नावे व घटना याबद्दल शंका आहे. उदाहरणार्थ पाइश एकदा एक तलावाच्या बांधकामाचा उल्लेख करतो, पण त्या गावाचे नाव देत नाही. नूनीश मात्र हें गाव राणी चिन्नादेवी हिच्या प्रीत्यर्थ वसवण्यात आलेले नागलपूर असल्याचे लिहितो. काही शिलालेखानुसार १५ - ६ - १५१७ मध्ये ते बांधण्यात आले. त्याच सुमारास पाइशने आपला हंपीच्या दिशेने प्रवास सुरू केला. हंपीजवळ त्यावेळी कोणतेही गाव किंवा खेडे नव्हते - तसे ते आजही नाही - की जे राणी चिन्नादेवीच्या नावे वसवण्यात आले होते. पाइशने केलेले तलावाचे वर्णन होसपेटजवळील एका तलावाला लागू पडते. कोरडा पडल्याने आज तो तलाव मशागतीखाली आला आहे. हाच तलाव बांधकाम चालू असताना पाइशने पाहिला असावा, असे मानून आम्ही या ग्रंथात त्या तलावाचे एक छायाचित्रही दिले आहे. चित्रदुर्ग किंवा हरिहरहून होसपेटला जाताना मार्गावर रेल्वेचा ओलांडण्याचा फाटा आहे त्यापुढे आणि आताची पाण्याची टाकी व तुंगभद्रा यांच्याजवळ हा तलाव आहे. स्तंभ सोडल्यास, बाकी पाइशने केलेले वर्णन तलावास लागू पडते. कोरीव शिल्प असणारे तीन स्तंभ होते असे पाइश म्हणतो. पण आपल्याला तलावात दिसतात त्या तीन स्तंभापैकी दोन स्तंभावरच कोरीव काम आहे. आज हा तलाव कोरडा पडला असला तरी पाणी साठवण्याच्या दृष्टीने केलेल्या व्यवस्थेच्या खाणाखुणा अजूनही त्यात दिसून येतात.

नावाचा घोटाळा झाल्यामुळे हे वृत्तांतकार कोणत्या प्रवेशद्वाराने शहरात शिरले हे अनिश्चित आहे. गदग रस्त्याने होसपेटला जाताना एक वेस आणि गणेश मंदिर दिसतात. वर उल्लेख केला त्या तलावापासून ते या वेशीपर्यन्त एक रस्ता असला पाहिजे. याच वेशीतून त्या काळात लोक शहरात प्रवेश करत असावेत. काही शिलालेखानुसार या शहराचे नाव चिन्नादेवीपट्टण असे नसून, तिरूमलेदेवी अम्मनपट्टण असे होते. यामुळे एक शंका निर्माण होते. ही तिरुमलदेवी गणिका होती काय ? शिलालेखानुसार ती कृष्णदेवरायाची पट्टराणी होती. मग ही गणिकाच त्याची पट्टराणी होती, असा अर्थ घ्यावयाचा काय ?

काही ग्रंथात कृष्णदेवरायाने ज्या ओरिसाच्या राजकन्येशी लग्न केले तिचे नाव

जगनमोहिनी होते. ती राजाशी एकनिष्ठ नव्हती आणि तिने त्याला मारण्याचा प्रयत्न केला, अशी माहिती आहे. नूनीश म्हणतो, की ती राजाच्या तीन पट्टराण्यांपैकी एक होती. शिलालेखांमध्ये मात्र चिन्नादेवी व तिरुमलादेवी या दोघींचाच उल्लेख येतो. तर मग ही राणी कोण ? नूनीश सांगतो ते शिलालेखातील माहितीशी विसंगत आहे. यात मग बरोबर कोण ?

त्याचप्रमाणे सदाशिवरायाचा काळी लिहिल्या गेलेल्या काही ग्रंथात असे आढळते, की कृष्णदेवरायाची राजमाता नागजीअम्मा ही नर्तकी असून, नरसण्ण नायकाची पहिली राणी तिप्पाजी ऊर्फ तिपम्बा हिच्या तैनातीत होती. असे असल्यास नूनीशने गफलतीने सून समजून सासूबद्दल लिहिले असेल काय ?

भारतीयांना चुन्याचा उपयोग माहीत नव्हता. हे त्याचे म्हणणे चुकीचे आहे. शिवाय दुसऱ्या एका संदर्भात शहरातील इमारती चुन्याने आणि मंदिरे दगडांनी बांधत, असे त्याने स्वतः च लिहिले आहे. दुसरा एक प्रवासी सीझर फ्रेडरिक याने १५६७ साली विजयनगरला भेट दिली. त्यानेही भारतीयांना चुन्याचा बांधकामातील वापर ज्ञात होता यास दुजोरा दिला आहे.

एकंदरीत पाहता पाइशचा वृत्तांत अधिक स्वारस्यपूर्ण आणि अचूक माहिती देणारा आहे. तर नूनीशची बखर त्याकाळी रूढ असणाऱ्या दंतकथा, गोष्टी यावर जास्त अवलंबून राहणारी आहे. तथापि दोन्हीही वृत्तांत आपापल्यापरीने उपयुक्त असून, विजयनगर शहराचे वैभव व डामडौल यांची कल्पना देतात. अर्थात विजयनगरचा इतिहास कोणास लिहायचा झाला तर हे वृत्तांत पूर्णतः विश्वसनीय ठरणार नाहीत, पण त्याच बरोबर त्यांना दुर्लक्षून चालणार नाही हेही खरे. कृष्णदेवरायाने स्वारी करून रायचूर जिंकून घेतले याचा उल्लेख करणारे शिलालेख मिळेपर्यन्त पाइशने केलेले वर्णन हेच त्या विषयावरील माहितीचे एकमेव साधन होते. या वृत्तांतावरून स्युअलने रायचूर विजयाचा जो काल काढलेला आहे तो शिलालेखात दिलेल्या कालाशी अचूक जुळतो. या वृत्तांतामध्ये आलेल्या विजयनगर साम्राज्याचा अभ्यास पूर्ण करण्यासाठी आपल्याला दुसऱ्या परकीयांनी भेटी देऊन लिहून ठेवलेले इतर वृत्तांतदेखील लक्षात घ्यावे लागतील. हे परकीय म्हणजे दुसऱ्या देवरायाच्या काळात विजयनगरात असणारा अब्दुल रझाक हा पर्शियाचा वकील, १६ व्या शतकात आलेले इटालीचे निकोलो कोंती व वर्तेमा, १५१० साली आलेला निक्तिन हा रशियन आणि १५६७ साली भेट दिलेले पोर्तुगालचे बार्बोझा आणि व्हेनिसचा सीझर फ्रेडरिक हे होत.

या पुस्तकाचे संपादन करताना मी रॉबर्ट स्युअलने आपल्या A Forgotten Empire (जी. ॲलन ॲन्ड ॲनविन लिमिटेड, लंडन, १९२४, पहिली भारतीय आवृत्ती, नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, १९६२) यात दिलेल्या अनुवादाचा पुरेपूर उपयोग

## २) साळुव घराणें १४८४ पासून

साळुव मंगु (हा दुसऱ्या कंप याच्या बरोबर दक्षिणेवरील मोहिमेत होता)

|

गौत

|

गुंड आणि मल्लंबिका

|

नरसिंह (१४८५-१४९५)

|

दुसरा नरसिंह १४९५-१५०५

३) तुळुव घराणे १५०५-१५७०

तिम्म

|

ईश्वरभूपती (विवाह बुक्कमा)

|

नरसिंह (नरसण्ण ऊर्फ नरस नायक) १५०५ - १५०९ (विवाह : तिप्पाजी, नागलदेवी, देबंबा ऊर्फ ओबलंबा.)

- भुजबळ नरसिंह १५०९–१५१६
- कृष्णदेवराय १५०९ - १५२९ (चिन्नादेवी व तिरुमलादेवी या राण्या)
  - |
  - तिरुमलेराय १५१७ - १५२५
- अच्युतराय १५३० - १५४१
  - |
  - वेंकटाद्रि १५३१ - १५४२
- रामराय
  - सदाशिवराय १५४२–१५७०

विजयनगरचा पाडाव, १५६५.

करून घेतला आहे. याखेरीज क्वार्तु सेन्तेनारियु दिश्कोब्रिमेंतु दु इंदिय, कोंत्रिबुइसाईश द सोसियेदाद जेओग्रफीय द लिश्बोअ, लिश्बोअ, इंप्रेस - नासियोनाल, १८९७ या मालिकेत डेव्हिड लोपेझने प्रकाशित केलेल्या क्रॉनिक दुश रेईश द बिसनाग याचाही उपयोग केलेला आहे. पॅरिसमध्ये असताना मला बिब्लिओतेक नेस्योनाल येथील हस्तलिखित नजरेखालून घालण्याची संधी मिळाली. ते प्रसिध्द करण्याचे श्रेय सेनॉर लोपेझ यांना आहे. पण प्रा. ज्यां. फिलियोझांच्या मते त्यात काही चुका आहेत कारण लोपेझने बिब्लिओतेक नेस्योनालमधील हस्तलिखिताच्या एका प्रतीचा वापर करून ग्रंथाचे संपादन केले. लिपिबध्द मजकूर लावण्यातील अडचण लक्षात घेता - विशेषत: i आणि l किंवा g, j किंवा y ही अक्षरे इत्यादी, उतरवून घेणाऱ्याने केलेल्या चुका समजू शकतात. उदाहरणार्थ, दार्चा या शब्दाच्या बाबतीत, तो खरोखर दार्चा आहे का 'आर्चा' किंवा 'लार्चा' आहे हे सांगणे कठीण आहे. तथापि स्युअलने आपल्या अनुवादासाठी आपल्या हस्तलिखिताचाच वापर केला असल्याने त्यावर अवलंबून राहणे मला अधिक सुरक्षित वाटले. काही ठिकाणी आवश्यक वाटले तिथे किरकोळ बदल केले आहेत. स्युअलच्या टिपा कंसामध्ये ग्रंथातच दिलेल्या आहेत आणि काही वेळा माझ्या स्वत:च्या टिपा जोडलेल्या आहेत, नावे ओळखण्यासाठी मी एपिग्रफिआ कर्नाटिका भाग १ ते १६, साऊथ इंडियन इन्स्क्रिप्शनस् भाग १, ४, ९, क्र. दोन,१६ व २० यात प्रसिध्द झालेल्या. शिलालेखांचे संदर्भ वापरले आहेत. त्याचप्रमाणे म्हैसूर पुरातत्व विभागाचे वार्षिक अहवाल आणि इंडियन एपिग्राफी यांचाही उपयोग केला आहे. ग्रंथात वारंवार आलेली स्थळे व नावे यांची सूची शेवटी दिलेली आहे.

**वसुंधरा फिलियोझा.**

# दुमिंगुश पाइश याचा वृतांत

## (इ. स. सुमारे १५२०-२२ नंतर लिहिलेला)

*ज्या गोष्टी मी पाहिल्या आणि नरसिंगचे राज्य इत्यादी संबंधी माहिती मिळवून घेतली त्याविषयी .*

हिंदुस्तान सोडून समुद्र किनाऱ्यापासून नरसिंगच्या [१] राज्याकडे जाताना पहिल्यांदा डोगरांची एक रांग लागते. ही रांग नरसिंगचे राज्य आणि समुद्राकाठचे प्रदेश यांची सरहद्द असून, हिंदुस्तानच्या संपूर्ण किनाऱ्याला समांतर जाते. तिच्यामध्ये खिडी असून त्यामार्गे लोक अंतर्गत भागात जातात. बाकीचा सारा भाग अतिशय खडकाळ असून, घनदाट जंगलांनी भरलेला आहे. नरसिंगाच्या राज्याची पुष्कळ शहरे हिंदुस्तानच्या सागरकिनारी आहेत. ही बंदरे असून, आम्ही त्यांच्याशी सलोख्याने राहतो यापैकी आमकोला, मिरगियो, होनोर, वाटेकला, मामलगोर, ब्राकालोर आणि बाकानोर [२] अशा काही बंदरात आमच्या वखारी आहेत. डोगरराजी ओलांडून वर गेले, की सपाट प्रदेश लागतो. इथे डोंगरांची रांग अशी नाही. फक्त लहान लहान टेकड्या आहेत. बाकी सर्व प्रदेश 'सांतारेम' च्या प्रदेशासारखाच सपाट आहे. फक्त भटकळ ते झांबुजा [३] या

---

१. पोर्तुगीजांच्या गोव्यात वखारी होत्या. त्याला ते ''आमचा हिंदुस्थान'' म्हणत. पहिला पोर्तुगीज प्रवासी वास्को-द-गामा गोव्यास आला तेव्हा गोव्यावर विजयनगरच्या साळुव नरसिंहाचा अंमल होता. या परकियांनी याला म्हणूनच नरसिंगचे राज्य असे नाव दिले.

२. मिरगिओ (मिरजान), होनोर (होनावर), वाटेकला (भटकळ), मामलगोर (मामगालूस), ब्राकालोर (बसरूर) आणि बाकानोर (बारकूर).

३. झांबुजा, झांबूर : स्युअल झांबुजा म्हणजे सोंडूर असे म्हणतो. कदाचित ते होसपेटजवळील जंबुकेश्वर असावे. ते बनवासीही असू शकेल. प्राचीन काळी बनवासी भरभराटीस आलेले असून, जयंतीपूर या नावे प्रसिध्द होते. भटकळ ते बनवासी हे अंतर शिरसीमार्गे १६२ कि. मी. आहे. शिकारीपूर तालुक्यातही जांबूर नावाचे एक लहानसे खेडे आहे. पुरेशा पुराव्याभावी झांबुजा या तिन्हीपैकी कोणते असेल हे निश्चितपणे सांगता येणे कठीण आहे.

मार्गावर मात्र अरण्ये, डोंगररांगा आहेत. पण एकंदरीत रस्ता सपाटच आहे. भटकळ ते झाबुजा अंतर ४० कोसांचे आहे. रस्त्याच्या बाजूस पुष्कळ नद्या, ओढे, नाले आहेत. त्यामुळे भटकळला व्यापारी मालाची वाहतूक इतकी आहे, की दरवर्षी पाच ते सहा हजार ओझे लादलेले बैल जाताना दिसतात.

आता नरसिंगच्या राज्याविषयी सांगतो. पूर्वेकडील पहाडी रांग सोडली तर इतरत्र या राज्यात तुरळक झाडी आहे. काही ठिकाणी मात्र कोसोगणती वनराया लागतात. शहरे, गावे, खेडी यांच्या पिछाडीस आमराया असून आंबा, फणस, चिंच इत्यादी मोठ्या वृक्षांची लागवड केलेली असते. ही मोठी झाडे म्हणजे विश्रांतीस्थाने असून, माल घेऊन जाणारे व्यापारी त्याखाली थांबतात. 'रेकालेम'[४] शहरात मी एक वृक्ष पाहिला. त्याखाली आम्ही चांगले तीनशे वीस घोडे, पागेत असल्याप्रमाणे एका रांगेत बांधून उतरलो होतो. सर्व प्रदेशभर लहानलहान झाडेही किती तरी आढळून येतात. या राज्यात शेतीची मशागत सर्वत्र चांगली होते. जमीनही सुपीक असून गाई, म्हशी, बकरी इत्यादी पाळीव प्राण्यांचे प्रमाण भरपूर आहे. वन्य आणि घरी पाळले जाणारे पक्षी यांची संख्याही आमच्या भागात आहे, त्यापेक्षा इकडे जास्त आहे. तांदूळ, मका, द्विदल धान्ये याबरोबर आमच्या भागात होत नाही. अशा इतरही धान्याची मुबलक पैदास इथे होते. कापसाचे पीक तर अफाट आहे. धान्याची पैदास विपुल आहे. कारण लोक स्वत: ते खातात आणि इकडे बार्लीचा दुसरा प्रकार नसल्याने घोड्यांनाही ते खाऊ घालतात. गहू भरपूर होतो आणि तोही चांगल्या प्रतीचा. सर्वत्र दाट वस्तीची शहरे, गावे आणि खेडी आहेत. शहरे, गावे फार शक्तिशाली होतील या भीतीने राजाने त्यांना भोवती फक्त मातीचे कोट बांधण्याची परवानगी दिलेली आहे. राज्याच्या सरहद्दीला लागून असलेल्या शहरांना मात्र सभोवती दगडी तट बांधण्याची परवानगी असते, इतरांना नाही. त्यामुळे लहान गावांना नसले तरी शहरांना मात्र किल्ले कोट बांधलेले असतात.

हा सगळाच प्रदेश सपाट असल्याने इतर भागांपेक्षा इथे वारे जास्त जोराने वाहतात. इथे पेरलेल्या आणि नंतर काढलेल्या बियांपासून तेल करतात. तेल काढण्यासाठी खास यंत्राचा - घाण्याचा - वापर होतो. विस्तीर्ण असलेल्या या देशात नदी, नाले त्या मानाने कमी असल्याने पाण्याची अडचण भासते. पावसाळ्यात पाण्याचा साठा करणारे तलाव बांधून लोक त्यावर आपली गुजराण करतात. इतर काही झरे असणारे तलावही आहेत. पावसाळी पाणी साठवणाऱ्या तलावांपेक्षा यांचे पाणी जास्त चांगले असते. बरेच झरे आटून जातात. लोक मग त्यांच्या तळाशी खड्डे खोदून, मिळेल तेवढ्या पाण्यावर काम

४ 'रेकालेम' म्हणजे राचळूळी असले पाहिजे. रेकालेम शहर पाइशच्या हंपी मार्गावर नव्हते. ते पेनुगोंडेजवळील एक गांव आहे. पाइश वर्णन करतो ते झाड वडाचे असले पाहिजे.

भागवतात. पोर्तुगाल किंवा 'आमच्या हिंदुस्थान' सारखा हिवाळा [५] इकडे नसतो. फक्त वर्षाकाठी कमीजास्त होणारी वादळे असतात. त्यामुळेच इकडे पाण्याचा दुष्काळ असतो. तलावांचे पाणी बहुतेक गढूळ असते. खास करून ज्या तलावांना झरे नाहीत त्यांचे तर असतेच. तेथील सोसाट्याचे वारे, धूळ आणि पाणी पिणारी गाय, बैल, म्हैस इत्यादी कित्येक लहानमोठी गुरेढोरे - यांच्यामुळे पाणी कधीही न निवळता गढूळ राहाते. या देशात गायी, बैलांची हत्या करीत नाहीत हे लक्षात घ्या. बैल है आपल्याकडील खेचरांसारखेच भारवाही जनावर आहे. माल वाहून नेण्याचे काम ते करते. इकडील लोक गायी, बैलांची पूजा करतात आणि त्यांच्या मूर्ती करून देवळात बसवतात. बरेचसे बैल (पोळ) देवाच्या नावाने मोकळे सोडलेले असतात. हे बैल गावभर मोकळे फिरतात. त्यांना कोणीही हात लावत नाही. या भागात गाढवे आहेत पण ती लहान असून, इतर कोणत्याही कामापेक्षा धुतलेले कपडे [६] वाहून नेण्यासारख्या किरकोळ कामासाठी परीट लोक त्यांचा वापर करतात. अगोदर सांगितलेल्या डोंगरराजीला समांतर असा तीनशे ग्राओचा [७] समुद्रकिनारा या राज्याला आहे. हा समुद्रकिनारा याच राज्याच्या मालकीचा असलेल्या बालाघाट आणि कॉरामॉडेल इथपर्यन्त जातो. रुंदीला तो एकशे चौसष्ट ग्राओ आहे. एक ग्राओ म्हणजे आपल्याकडील दोन लीग भरतात. या हिशेबाने समुद्रकिनारा सहाशे लीगसूचा भरतो. भटकळ ते ओर्या [८] पर्यन्त राज्याची रुंदी तीनशे चोपन्न लीग भरते.

या राज्याची सरहद्द एकीकडे बंगालपर्यन्त भिडलेली आहे तर पूर्वेकडे ओरिया राज्यापर्यन्त. उत्तरेकडे दख्खनची रियासत असून, त्यात यादिलचाओ [९] आणि ओझेमेलुको [१०] यांची राजवट आहे. गोव्याचे आदिलशहाशी युध्द चालू आहे. यांचे कारण गोवा शहर मुळात त्यांचे होते. आम्ही ते आता घेऊन टाकले आहे.

---

५. पाइशला म्हणावयाचे ते असे, की हिंदुस्थानच्या या भागात पावसाळा असा काही नाही. त्याचे हे म्हणणे अंशतः खरे आहे कारण हंपी, पेनुकोंडे हा भाग कोरडा असून, पाऊस तिथे फार कमी पडतो. उलट पश्चिम किनारपट्टीवर गोव्यात तो भरपूर असतो. युरोपात आपल्या भारताप्रमाणे पावसाळा नसतो. हिवाळ्यातच त्यांच्याकडे पाऊस पडतो आणि हवामान वाईट असते.

६. दक्षिणेत फक्त परीट लोकच गाढवाचा उपयोग मळके कपडे तलावाला नेण्यासाठी आणि धुतलेले कपडे घरी परत आणण्यासाठी करतात.

७. ग्राओ हा शब्द कोस याचा समानार्थी असावा. एक कोस म्हणजे अडीच मैल किंवा काही जणांच्या मते २० फर्लांग होय. हे अंतर सुमारे १८ किलोमीटर भरते.

८. ओडिया, ओरिसा.

९. विजापूरचा आदिलशहा.

१०. अहमदनगरचा सुलतान निझाम-उल-मुल्क.

अगोदर वर्णिलेले ओरिया राज्य नरसिंगच्या राज्यापेक्षाही मोठे आहे असे म्हणतात. त्याची हद्द बंगालला लागून असून, त्या दोहोंमध्ये लढाई चालू आहे. ती हद्द तशीच पुढे पेगू आणि मलक्का समुद्रापर्यंत[११] गेलेली आहे. ती कंबाया आणि दख्खनच्या राज्यापर्यन्त पोहोचली असून, तिचा विस्तार पर्शियापर्यन्त भिडलेला आहे, अशी विश्वसनीय माहिती मला मिळाली. तेथील लोक उजळ रंगाचे असून, सुदृढ अंगकाठीचे आहेत. तिथल्या राजाकडे बराच खजिना, मोठी फौज आणि किती तरी हत्ती आहेत. कारण या प्रदेशात हत्ती खूप आढळतात. मला माहितगारांच्या कडून हे कळाले. त्यांच्या मते इतर कोणताही दुसरा राजा या राजाइतका श्रेष्ठ नाही. तो मूर्तिपूजक आहे.

आता आपल्या विषयाकडे वळू. विस्तार टाळण्यासाठी मी नरसिंग राज्यातील शहरे, गावे, खेडी याविषयी लिहिणार नाही. फक्त 'दारचा'[१२] या शहराविषयी लिहितो. कारण इतर ठिकाणी क्वचितच दिसेल अशी एक वास्तू इथे आहे. या शहराला तटबंदी आहे, पण ती दगडाची नाही. याचे कारण मागेच सांगितले आहे. (पोर्तुगीज) हिंदुस्तानकडे असणाऱ्या पश्चिम बाजूस, या शहराभोवती एक सुंदर नदी वाहते. तर पूर्वेकडील बाजूस सपाट मैदान आहे. तटाला लागून शहराचा खंदक आहे. या दार्चा शहरात एक देवालय आहे. मी आधी उल्लेख केला ती वास्तू हीच. ती इतकी सुंदर आहे, की अशी चांगली इमारत जवळपास बऱ्याच अंतरापर्यन्त क्वचितच आढळेल. मंदिराची इमारत गोल, अखंड पाषाणाची आहे. प्रवेशद्वाराचे सुतारकाम उत्तम असून, परिप्रेक्ष्याची सर्व कला तिथे दिसून येते. यात बऱ्याच मूर्ती कोरलेल्या असून, त्या चांगल्या हातभर पुढे आलेल्या, उठावदार अशा आहेत. चोहोबाजूंनी स्पष्ट दिसणाऱ्या या मूर्तींचे कोरीव चेहरे आणि इतर अवयव इतके चांगले आहेत, की इतरत्र तसे सापडणे जवळपास अशक्यच होय. प्रत्येक मूर्ती पानांच्या सजावट कामात उभी केलेली आहे. देवळाचा वरचा भाग रोमन धर्तीचा असून, इतक्या उत्कृष्टपणे बांधला आहे, की यापेक्षा जास्त चांगले काम शक्यच नाही. याशिवाय मंदिराच्या पुढे एक छोटासा मंडप आहे. मंडप पूर्ण दगडी खांबावर उभा असून, ते खांब आणि तळाचा भाग इतके चांगले घडवलेले आहेत, की जणू इटालीत बनवले असावेत. सर्व उभ्या आडव्या तुळया पाषाणाच्या असून, त्यात लाकूडकाम थोडेदेखील नाही. मंदिराच्या आत तसेच भोवतालीही अशीच दगडी फरशी घातलेली आहे. सर्व गाभाऱ्याभोवती याच दगडाची

---

११. मलाक्काचा समुद्र. पाइशाला पोर्तुगीज वसाहत असलेल्या मलाया द्वीप - खंडातील मलाक्का ठाऊक होते.

१२. पाइशच्या वृत्तांतात 'दार्चा' निरनिराळ्या पध्दतीने लिहिले गेले आहे असे सेवेल लिहितो. काही ठिकाणी ते 'आर्चा' असून इतर ठिकाणी 'लार्चा' आहे. ते आर्चा असेल, तर हरपनहळ्ळी तालुक्यातील अरसीकेरे आहे असे म्हणता येईल. हरपनहळ्ळीपासून आग्नेयेकडे १० मैलांवर ते आहे. चालुक्य-होयसळा शैलीत बांधलेले नीलांबेश्वराचे एक मंदिर तिथे आहे.

जाळीदार रचना असून, शिवाय भोवताली भक्कम भिंत आहे. चिरेबंदी अशी ही भिंत शहराच्या तटापेक्षाही जास्त चांगली आहे. मंदिराला तीन भव्य सुंदर प्रवेशद्वारे आहेत. मंदिराकडे तोंड असणाऱ्या पूर्व बाजूच्या प्रवेशद्वारात लहानमोठ्या, ठेंगण्या ओवऱ्या आहेत. या ओवऱ्यात काही जोगी बसलेले असतात. याच आवारात लाल दगडाची बरीच लहान लहान देवळे बांधलेली आहेत. जहाजाच्या डोलकाठी[१३] सारखा एक दगड इथे मोकळ्या जागेत उभा आहे. त्याच्या तळाशी चौथरा असून, वरच्या मोकळ्या बाजूस तो अष्टकोनी होत जातो. मला याचे नवल वाटले नाही. कारण रोममधील सेंटपीटरच्या चर्चचा कळस मी पाहिलेला आहे. तो इतकाच किंवा या पेक्षाही उंच आहे.

ही मंदिरे म्हणजे लोकांची प्रार्थनास्थळे असून, त्यात मूर्तीची प्रतिष्ठापना केलेली असते. मूर्ती विविध प्रकारच्या असतात. उदा. स्त्री - पुरुषांच्या आकृती, बैल, माकडे, इत्यादी. इतर बऱ्याच मूर्ती म्हणजे केवळ गोल दगड असतात. त्यांची पूजा केली जाते. दार्चाच्या या मंदिरात पुरुषाचे धड आणि हत्तीचे तोंड[१४] असलेली एक मूर्ती आहे. सोंड आणि दात असलेल्या या मूर्तीला प्रत्येक बाजूस तीन भुजा असून, सहा हात आहेत. भुजांपैकी चार अगोदरच नष्ट झाल्या आहेत,[१५] असे सांगितले जाते. बाकीच्या भुजा जातील तेव्हा प्रलयनाश होईल असा लोकांचा विश्वास असून, ते या भविष्यवाणीला दृढपणे चिकटून आहेत. मूर्तीला रोज नैवैद्य असतो कारण देव प्रत्यक्ष खातो असे समजले जाते. नैवैद्य देतांना मूर्तीपुढे स्त्रियांचे नृत्य होते. या स्त्रिया देवळाला वाहिलेल्या (देवदासी) असतात. त्या देवाला अन्न इत्यादी आवश्यक वस्तू देतात. या स्त्रियांना झालेल्या मुलीही देवदासीच ठरतात. यांचे चारित्र्य स्वैर असते. शहरातील चांगल्या भागात प्रमुख मार्गावर त्या राहातात. हे इतर शहरांच्या बाबतीतही खरे आहे. अशा स्त्रियांच्या वस्तीतील घरे उत्तम प्रतीची असतात. अधिकारी आणि श्रीमंतवर्गाची अंगवस्त्रे म्हणून राहणाऱ्या या स्त्रियांना बराच मान मिळतो. कोणताही सद्गृहस्थ, काहीही ठपका न येता यांच्याकडे उघडपणे जाऊ शकतो. या स्त्रियांना राजाच्या अंतःपुरातही प्रवेश असतो. त्या तिथे राजस्त्रियांमध्ये राहून त्यांच्यासमवेत तांबूल सेवन करतात. इतर कोणाही व्यक्तीला हे करता येत नाही, मग तिचा दर्जा कितीही मोठा असो. हा विडा म्हणजे मिरवेल किंवा आपल्या देशातील आयाव्हिसारख्या वनस्पतीचे पान असते. हे पान येथील लोक नेहमी खातात. त्यांच्याबरोबर तोंडात सुपारी धरतात. ही आपल्याकडील मेडलर फळासारखी पण जास्त टणक असते. ती श्वासदुर्गंधी घालवते

---

१३. मंदिराच्या प्रवेशद्वारी असलेल्याध्वजस्तंभाचा हा उल्लेख आहे.

१४. गणेश, विनायक.

१५. मूर्ती भंगलेली असतानाही तिची पूजा होत असे हे विशेष होय. कारण प्रथेप्रमाणे भंगलेल्या मूर्तीची पूजा होत नसते. पण स्थान पुरातन आणि बऱ्याच काळासाठी जागृत असेल तरच फक्त अशी पूजा होऊ शकते, असे धर्मग्रंथ सांगतात.

आणि अनेक तऱ्हेने गुणकारी असते. खाण्याचे रिवाज आपल्यापेक्षा निराळे असलेल्या या लोकांना ती अनेक तऱ्हेने उपयुक्त आहे. काही लोक मांसाहारी आहेत, पण ते गाय, डुक्कर सोडून इतर सर्वप्रकारचे मांस खातात. त्यांचेदेखील दिवसभर पान खाणे चालूच असते.

या दार्चा शहरापासून बिसनाग पुढे १८ कोसांवर आहे. नरसिंग राज्याची ही राजधानी असून, राजाचे वास्तव्य तिथे सदोदित असते. दार्चा ते बिसनाग मार्गावर अनेक शहरे आणि तटबंदी असलेली गावे आहेत. बिसनागच्या दोन कोस अलीकडे उंच टेकड्यांची एक मोठी रांग लागते. शहरात जाण्यासाठी या पहाडांच्या खिंडीखेरीज दुसरा मार्गच नसल्याने त्यांना प्रवेशद्वारे म्हटले जाते. डोंगरांची ही रांग चोवीस कोसांपर्यन्त शहराभोवती वर्तुळाकार अशी पसरली आहे. त्यांच्या आत अशाच आणखी काही पहाडी रांगा आहेत. त्यांनीही शहराभोवती कडे केलेले आहे. मध्ये जिथे म्हणून मोकळे, सपाट मैदान आहे तिथे भक्कम तट उभारले आहेत. त्यामुळे बाहेरील खिंडीतून येणारा मार्ग सोडल्यास इतर कोणत्याही मार्गाने ही डोंगरांची रांग ओलांडता येत नाही. या मार्गात लहान लहान खंदक खणलेले असून, अगदी मोजके सैनिकदेखील त्यांचे रक्षण करू शकतात. टेकड्यांच्या रांगा थेट शहराच्या आतपर्यन्त गेलेल्या आहेत. मध्ये जागोजागी सपाट मैदान असून, तिथे भातशेते आणि बागबगीचे आहेत. त्यात भात पिकतो. तसेच नारिंगी, संत्रे, लिंबू, मुळा यांचीही लागवड होते. याशिवाय लेट्यूस आणि कोबी सोडल्यास आपल्या पोर्तुगालप्रमाणे इतर भाजीपाल्याचीही पैदास होते. डोंगरराजीत अनेक तलाव असून, त्यांचे पाणी या पिकांना दिले जाते. डोंगरावर जंगल फारसे नाही. आहेत ती लहान झाडेझुडपे. हिरवेगार असे फारसे नाहीच. हे डोंगर तसे चमत्कारिक दिसतात असे म्हणावे लागते. त्यांचा दगड पांढरा असून, या दगडांचे मोठमोठे खंड एकमेकावर असे रचले गेले आहेत, की ते जणू अधांतरी असल्यासारखे वाटतात. शहर या डोंगरांच्या मध्यभागी असून, त्यांनी वेढलेले आहे.

डोंगरांच्या या रांगा दख्खनपर्यन्त पसरलेल्या असून, आदिलशाही राज्याला तसेच राचोलला[१६] भिडलेल्या आहेत. राचोल हे पूर्वी नरसिंगच्या राज्याच्या ताब्यात होते. त्यासाठी बऱ्याच वेळा युध्द होऊन अखेरीस नरसिंगच्या राजाने ते घेतले. तसे पाहू जाता डोंगरांच्या या रांगामुळे या दोन राज्यांत कधीही एकी न होता युध्द चालू असते. डोगरांच्या रांगा ओरिसाच्या बाजूनेही आहेत पण यांच्यापेक्षा त्या निराळ्या आहेत. कारण आपल्या देशातील डोंगराप्रमाणे त्यांच्यावरही झाडेझुडपे, हिरवळ आहे. फारशा उंच नसलेल्या या डोंगरराजीत मोठी, सपाट मैदाने आहेत. या दोन राज्यांच्या पूर्व टोकाला घनदाट जंगल आहे. त्यात मोठे वृक्ष नाहीत, पण गच्च झाडेझुडपे आहेत. मोठमोठे हिंस्र पशू असलेल्या या निर्बिड अरण्याची जणू एक मजबूत तटबंदीच असून, ती दोन्ही

---

१६. रायचूर, पूर्वी हैद्राबाद राज्यात असलेले हे शहर आता कर्नाटकात आहे.

राज्यांचे संरक्षण करते. जंगलात एका राज्यातून दुसऱ्या राज्यात जाण्याच्या ठराविक वाटा आहेत. सरहद्दीजवळील या खिंडीवर नरसिंगच्या राजाने हाताखाली फौज असलेला एक कप्तान नेमला आहे. ''पोर्तुगीज हिंदुस्तान'' च्या बाजूस मात्र मी अगोदर सांगितली ती सोडल्यास अशी काही व्यवस्था नाही.

गोव्याहून इकडे येणारे लोक पश्चिमेकडून ज्या बाजूने येतात तिथे डोंगराच्या खिंडीजवळ राजाने वेशीच्या आत एक भक्कम शहर [१७] वसवले आहे. शहराला मजबूत तट असून, बुरूज आहेत. प्रवेशद्वारेही मजबूत असून, त्यांना लागून बुरूज आहेत. हे सगळे काम इतर शहरांपेक्षा निराळे म्हणजे पक्क्या दगडाचे आहे. इतके चांगले आणि मजबूत काम इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल. शहरात इकडच्या घर्तीप्रमाणे बैठ्या छपराच्या सुंदर इमारतींच्या रांगा आहेत. व्यापारी लोकांची विशेष वस्ती असून, त्यांची संख्या बरीच आहे. कारण प्रतिष्ठित व्यापाऱ्यांनी इकडे येऊन राहावे म्हणून राजाने त्यांना विशेष सवलती दिल्या आहेत. या जागी पाण्याचा सुकाळ आहे. शिवाय राजाने एक तलावही इथे बांधून काढला आहे. हा तलाव लहान तोफेच्या टप्प्यात यावा इतका रुंद असावा असे मला वाटते. डोंगरांच्या मुखाशी हा तलाव बांधलेला असून, दोन्ही बाजूंनी येणारे पाणी त्यात जमा होते. शिवाय डोगराच्या बाहेरील बाजूने घातलेल्या तीन कोस लांबीच्या नळाद्वारे येणारे पाणीदेखील इथेच जमा होते. हे पाणी तुडुंब भरून लहानशा नदीत वाहणाऱ्या एका तलावातून आणले जाते. तलावात तीन कोरीव मूर्तीकाम केलेले दगडी खांब आहेत. [१८] वरच्या अंगाला असलेल्या नळाशी हे खांब

---

१७. हम्पीच्या पश्चिमेस असलेले नागलपूर. कृष्णदेवरायाचा पुरोहित रंगनाथ दिक्षित याने हे शहर राजमाता नागलदेवी हिच्या सन्मानार्थ वसवून त्याला नागलपूर असे नाव दिले. राजमातेच्या स्मृतीप्रीत्यर्थ नागेश्वर आणि नागशयनी अशी दोन मंदिरे, तसेच नागसमुद्र नावाचा एक तलावही बांधण्यात आला.

आता जिथे अनंतशयनगुडी आहे, तिथे पूर्वी साले तिरूमलेरायनपट्टण नावाचे गाव होते. राजपुत्र तिरूमलेरायवरून हे नाव पडले.

आजच्या होसपेट शहराचा काही भाग, जिथे आता धरण झालेले आहे, पूर्वी कृष्णदेवरायने बांधला होता. आपली प्रिय पत्नी तिरूमलादेवी हिच्यावरून त्याने शहराला तिरूमलदेवी आम्मनपट्टण असे नाव दिले.

कोणत्या उपनगरातून आपण राजधानीत प्रवेश केला हे पाहिजे इथे सांगत नाही.

१८. हरिहरमार्गे होसपेटमध्ये प्रवेश करताना हा तलाव आजही दिसतो. तो आता आटून गेलेला असून, शेतीखाली आला आहे. पण सुंदर कोरीव स्तंभ अजूनही तिथे आहेत. तीन स्तंभ असल्याचे पाइश लिहितो.पण मूर्तीकाम असलेले दोनच स्तंभ आहेत. बाजूच्या तिसऱ्या स्तंभावर कोरीव मूर्तीकाम नाही. नळ आता नाहीत. पण ते टाकण्यासाठी केलेली व्यवस्था आजही दिसून येते.

जोडलेले असून, त्याद्वारे बागा आणि भातशेती यांचे सिंचन होते. एक टेकडी खोदवून राजाने या तलावासाठी जमीन मोकळी करून घेतली. तलावाचे बांधकाम चालू असताना मी पाहिले. पंधरा ते वीस हजार मजूर काम करीत असताना मुंग्यासारखे दिसत होते. त्यांची संख्या एवढी मोठी असल्यामुळे पायाखालील जमीनदेखील दिसत नव्हती. सर्व कामाची वाटणी राजाने आपल्या लष्करी अधिकाऱ्यांमध्ये करून दिलेली होती. हाताखालील मजूर कसून काम करतील याची जबाबदारी त्यांच्याकडे होती. त्यामुळे तलावाचे काम संपून पूर्ण करण्यात आला.

हा तलाव दोन-तीन वेळा फुटला म्हणून राजाने ब्राह्मणांना बोलावून देवास कौल लावून तलाव वारंवार फुटण्याचे कारण शोधण्यास सांगितले. ब्राह्मणांनी देव कोपला आहे असे सांगून नर, अश्व, महिषी यांचा बली दिल्यास तो संतुष्ट होईल असे सांगितले. हे ऐकताच राजाने मंदिरात साठ माणसे आणि काही अश्व व महिषी बली देण्यात यावेत अशी आज्ञा केली. त्याप्रमाणे ताबडतोब बली देण्यात आले.

हे ब्राह्मण आपल्याकडील फ्रायरसारखे आहेत. त्यांना, विशेषतः पुरोहितांना आणि विद्वानांना इकडे पवित्र, पूज्य मानतात. राजाच्या पदरी बरेच ब्राह्मण आहेत, पण ते सरकारचे असून, शहरे, गावे येथे अधिकारी म्हणून काम करतात. इतर ब्राह्मण व्यापारी आहेत तर इतर काही वडिलोपार्जित संपत्ती, शेती, मळे, बागा यावर निर्वाह करतात. देवळांची व्यवस्था पाहाणारे ब्राह्मण विद्वान असून, प्राणीहत्या करीत नाहीत. हे मांसाहारही करीत नाहीत, इतके की तांबड्या रंगाचे अन्नही सेवन करीत नाहीत, कारण त्याला ते रक्त समजतात. मी उल्लेख केलेल्या ब्राह्मणांपैकी इतर काही ईश्वरोपासना करतात, उपास - तापास, व्रतवैकल्ये करतात. त्यांनाही मांसाहार वर्ज्य असून, ते भाज्या, भात, लोणी आणि फळे असा आहार घेतात. ते विवाहित असून, त्यांच्या बायका अतिशय सुंदर आहेत. गौरवर्णी, मर्यादाशील असलेल्या या स्त्रिया घराबाहेर फारशा पडत नाहीत. राज्यातील सर्वात गौरवर्णी स्त्री-पुरुष ब्राह्मण जातीतच दिसून येतात. इतर जातीत त्यांची संख्या फार कमी आहे. ब्राह्मण म्हणवणारे या देशात खूप आहेत. पण त्यांची जीवनपध्दती वर उल्लेखिलेल्या ब्राह्मणांपेक्षा अगदी निराळी आहे. खऱ्या ब्राह्मणांवर राजाची श्रध्दा असून, तो त्यांचा मान राखतो. त्यांच्यावर त्याची मर्जी असते.

आपल्या आवडत्या राणीच्या प्रेमाखातर राजाने हे शहर वसवले असून, तिचे नावही त्याला दिले आहे. शहर मैदानात वसवलेले असून, त्याभोवती रहिवाशांनी सोयीप्रमाणे लहानमोठे बगीचे केलेले आहेत. राजाने शहरात एक मंदिर बांधले असून, त्यात मूर्तीची स्थापना केली आहे. मंदिराचे बांधकाम चांगले असून, त्यात इकडच्या पध्दतीने बांधलेल्या काही विहिरीही आहेत. इकडे आपल्याकडल्याप्रमाणे अनेक मजली घरे

नसतात. ती एकमजली असून, बैठ्या छपराची[१९] असतात. त्यांचे बुरूजही आपल्यापेक्षा निराळे आहेत. घरांना खांब असून, आतबाहेर मोकळ्या पडव्या, ओसऱ्या आहेत. गरज भासल्यास लोक तिथे राहू शकतात. त्यामुळे इकडची घरे राजवाड्यासारखी दिसतात. राजमहालांभोवती तट असून, आत अनेक वाडे आहेत. राजवाड्याला दोन प्रवेशद्वारे असून, तेथे पहारा असतो. सरदार, लष्करी अधिकारी आणि काम असलेल्या लोकांखेरीज इतरांना आत मज्जाव आहे. दोन प्रवेशद्वारांमध्ये मोकळे पटांगण असून, त्याभोवती देवड्या आहेत. लष्करी अधिकारी आणि इतर सन्माननीय पाहुणे आतून राजाचे बोलावणे येईपर्यन्त या देवड्यात वाट पाहत बसून असतात.

राजा मध्यम उंचीचा, गौरवर्णी, सुदृढ बांध्याचा, सडपातळ नव्हे, तर स्थूलसा - असा आहे. त्याच्या तोंडावर देवीचे वण आहेत. त्याचा सर्वत्र दबदबा असून, वृत्तीने तो आनंदी, उल्हासित असा आहे. परकियांचे तो सन्मानपूर्वक स्वागत करून, त्यांचा दर्जा कोणताही असला तरी त्यांची आस्थेने विचारपूस करतो. तो श्रेष्ठ असून, न्यायी आहे. पण कधी कधी मात्र त्याला क्रोधाचे झटके येतात. त्याची संपूर्ण बिरूदावली अशी ''कृष्णराय महाराय, राजराजेश्वर, हिंदुस्तानातील नृपांचा नृपती, त्रिसागराधिपती, भूमंडाधिपती.'' त्याची बिरूदावली अशी असल्याचे कारण म्हणजे - तो दर्जाने इतर कोणत्याही राजापेक्षा श्रेष्ठ असून, शिवाय त्याच्या अधिपत्याखाली प्रचंड भूप्रदेश आणि सैन्य आहे. एवढ्या सर्वगुणसंपन्न राजाला मिळालेली बिरूदावली त्याच्या योग्यतेच्या मानाने कमीच म्हणावी लागेल. या राजाचे ओरिसाच्या राजाशी नेहमी युध्द असे. शेवटी त्याने ओरिसावर चढाई करून अनेक शहरे, गावे जिंकली, त्यांची धूळधाण केली, सैन्य, हत्ती यांची दाणादाण केली. आणि ओरिसाच्या राजपुत्रास कैद केले. या राजपुत्राला बऱ्याच काळासाठी बिसनागात ठेवले होते. तिथेच तो पुढे मरण पावला. शेवटी शांततेसाठी ओरिसाच्या राजाने तह केला. आणि त्या तहानुसार आपली मुलगी बिसनागच्या राजाला दिली. तीच आता त्याची पत्नी आहे.

राजाला तीन कायदेशीर बायका असून, त्याच तीन प्रमुख आहेत. कारण फक्त या तीन राण्यांचेच पुत्र राज्याचे कायदेशीर वारस ठरतात. तिघींनाही पुत्र झाले तर हे लागू आहे. एकीलाच मुलगा झाला तर मग तो कोणत्याही राणीचा असला, तरी राज्याचा वारस होतो. राजांच्या या तीन राण्यांपैकी एक ओरियाच्या राजाची मुलगी असून, दुसऱ्या दोघी त्याचा मांडलिक असलेल्या श्रीरंगपट्टणच्या राजाच्या मुली आहेत. आणखी एक पत्नी पूर्वी गणिका होती. तारुण्यात असताना, राजा होण्यापूर्वी त्याने तिला ठेवलेले होते. आणि गादीवर आल्यानंतर लग्न करण्याचे वचन तिने त्याच्याकडून घेतले

१९. पाइशला म्हणावयाचे आहे, की पोर्तुगलाप्रमाणे हिंदुस्तानात मोठ्या अनेक मजली इमारती नाहीत. आजही हंपीच्या अवशेषात एकमजली घरेच दिसून येतात.

होते आणि अशारीतीने ही गणिका त्याची पत्नी झाली. तिच्या प्रेमाखातर त्याने हे नवीन शहर वसवले ज्याचे नाव होत . . . (मूळाबरहुकूम) . . . या प्रत्येक राणीचा निराळा महाल असून, प्रत्येकीच्या तैनातीस दासदासी, नोकरचाकर, स्त्री अंगरक्षक आहेत. सर्व नोकर स्त्रिया आहेत. या ठिकाणी पुरुषांना मज्जाव आहे. फक्त महालांवर पहारेकरी म्हणून हिजडे असतात. राजाच्या मर्जीतील उच्चपदस्थ वृध्द पुरुष सोडल्यास या स्त्रिया इतर कोणाही पुरुषांच्या दृष्टीस पडत नाहीत. जेव्हा त्यांना बाहेर जावयाचे असते तेव्हा पडद्याने आच्छादित केलेल्या पालखीत त्यांना घेऊन जातात. त्यामुळे त्या कोणाच्याही दृष्टीस पडत नाहीत. पालख्यांबरोबर चांगले तीनशे ते चारशे हिजडे असतात आणि इतर सर्व लोक लांब अंतरावर उभे राहतात. प्रत्येक राणीकडे भरपूर पैसा आणि तेवढ्याच प्रमाणात बाजुबंद, बांगड्या, मोती, रत्ने इत्यादी ऐवज असल्याचे आम्हाला सांगण्यात आले. प्रत्येक राणीजवळ साठ दासी असून, त्यादेखील हिरे, मोती, माणके यांनी भरगच्च सजलेल्या असतात असे म्हणतात. यांना आम्ही नंतर पाहिले आणि आश्चर्यचकित झालो. त्या कुठे आणि कशा पाहिल्या हे पुढे येईलच. या दासी धरून अंतःपुरात बारा हजार स्त्रिया आहेत असे म्हणतात. यामध्ये ढाल - तलवार चालवणाऱ्या, कुस्ती खेळणाऱ्या, तुतारी, शिंग इत्यादी आपल्यापेक्षा वेगळी असलेली वाद्ये वाजवणाऱ्या अशा स्त्रिया आहेत. तसेच भोई आणी परीट कामासाठीदेखील बायकाच आहेत आणि राजाकडील व्यवस्थेप्रमाणेच इथेही अंतःपुरात सर्व कामाची व्यवस्था आहे. एवढेच, की ती सर्व कामे बायकाच करतात. तिन्ही पट्टराण्यांमध्ये तंटा किंवा नाराजी होऊ नये म्हणून प्रत्येकीला सर्व गोष्टी सारख्या प्रमाणात मिळतात. तिघींमध्ये स्नेहभाव असून, त्या स्वतंत्र राहतात. यावरून एवढे लोक राहणारे वाडे सामावणारे हे आवार किती मोठे असेल आणि त्यातील रस्ते व गल्ल्या कशा असतील याची कल्पना येईल.

खुद्द राजा महालातच पण वेगळा राहतो. आपल्या कोणत्याही राणीस भेटण्याची इच्छा झाल्यास तो हिजड्याकरवी तसा निरोप पाठवून तिला बोलावून घेतो. राणी राहते तिथे अंतःपुरात हिजडा जात नाही. दारावरील स्त्रीरक्षकांना तो राजाचा संदेश असल्याचे सांगतो. नंतर राणीची एखादी वरिष्ठ दासी येऊन काय निरोप आहे ते पाहते आणि मगच राणी राजाकडे येते किंवा राजा राणीकडे जातो आणि इतरांना काहीही सुगावा लागू न देता तो पाहिजे तेवढा वेळ राणीच्या सान्निध्यात राहतो. हिजड्यांपैकी काही राजाच्या खास मर्जीतले आहेत. ते राजाच्या शयनगृहातच झोपतात. त्यांना पगारही भरपूर मिळतो.

हा राजा रोज सूर्योदयापूर्वी उठून पाऊण शेर 'जिंजेली' तेल पितो. आणि हेच तेल सर्वांगास लावून, लंगोट कसून भारी वजनाचे मातीचे मुदगल फिरवतो, नंतर घामाने तेल आटेपर्यन्त तलवारीचे हात करतो आणि यानंतर पदरच्या एखाद्या मल्लाबरोबर

कुस्ती खेळतो. या व्यायामानंतर तो घोड्यावर बसून मैदानाच्या या टोकापासून त्या टोकापर्यन्त भरधाव दौड करतो ती पहाट फुटेपर्यन्त. कारण हा सर्व व्यायाम सूर्योदयापूर्वी होतो. नंतर त्याचे स्नान होते. त्याच्या मर्जीतला, त्याला पूज्य असलेला एक धनवान ब्राह्मण त्याला स्नान घालतो. शूचिर्भूत होऊन तो राजवाड्यातील मंदिरात जातो आणि इकडील प्रथेप्रमाणे पूजाअर्चा करतो. त्यानंतर तो एक व्हरांड्याच्या[२०] आकाराच्या इमारतीत जातो. तिला अनेक खांब असून, ते अगदी वरच्या टोकापर्यन्त किनखापाने मढवलेले आहेत. त्याचप्रमाणे तिच्या भींतीही चित्रांनी सुशोभित केल्या आहेत. मंडपाच्या दोन्ही बाजूस दोन सुबक अशा स्त्रीमूर्ती आहेत. या ठिकाणी तो शहराचा कारभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांसमवेत कामकाज पाहतो, त्यांच्या मर्जीतल्या लोकांशी संभाषण करतो. तेमेरसा[२१] हा वृध्द त्याच्या सर्वांत मर्जीतला असून, राजाच्या खाजगीत त्याचा दबदबा आहे. सर्व सरदार त्याला राजाइतकाच मान देतात. या लोकांशी यथायोग्य संभाषण झाल्यानंतर बाहेर देवडीवर वाट पाहणाऱ्या सरदारांना आणि सेनाधिकाऱ्यांना राजा आत बोलावून घेतो. ताबडतोब आत येऊन ते राजास कुर्निसात करतात आणी राजापासून दूर अंतरावर भितीच्या कडेने बसतात. एकमेकांत ते बोलत नाहीत तसेच पानही खात नाहीत. हात अस्तन्यांमध्ये घालून, नजर खाली लावून बसतात. राजाला कोणाशी बोलावयाचे झाल्यास दुसऱ्या एका माणसाकरवी तो बोलतो. नंतर राजाने ज्याला बोलण्यास सांगितले आहे तो नजर उचलून त्या माणसाला उत्तरे देतो आणि पुन्हा पहिल्या स्थितीत बसतो. राजा बाहेर जाण्याची आज्ञा देईपर्यन्त ते याच स्थितीत बसून असतात. बाहेर जाण्यापूर्वी राजाकडे वळून ते सर्व जण त्याला प्रणाम करतात. आदबीचा सर्वश्रेष्ठ प्रकार असणाऱ्या या प्रमाणात दरबारी लोक आपले हात डोक्यावर जास्तीत जास्त उंच नेऊन जोडतात. राजाला प्रणाम करण्यासाठी ते दररोज जातात.

आम्ही या देशात आलो तेव्हा राजाचे वास्तव्य या नवीन शहरातच होते. आम्हा साऱ्या पोर्तुगीज मंडळीना समवेत घेऊन क्रिश्तोव्हावं द फिगैरेदु राजाच्या भेटीस गेला. आमच्या रिवाजानुसार आम्ही सुरेख, भरजरी पोषाख केले होते. राजाने क्रिश्तोव्हांव द फिगैरेदु चे यथोचित स्वागत केले आणि संतुष्ट वृत्तीने त्याच्याशी बोलला. फिगैरेदुच्या भेटीने राजास एवढा आनंद झाला आणि त्याच्याकडे त्याने एवढे लक्ष दिले, की तो जणू त्याच्या खाशा मंडळीपैकीच एक होता. बरोबरच्या आम्हा सर्वांवरही त्याने मेहरबानी केली. आम्ही राजाच्या अगदी जवळ असल्यामुळे त्याने सर्वांशी हस्तांदोलन केले. आम्हाकडे किती पाहावे असेच जणू त्याला झाले होते. क्रिश्तोव्हांव द फिगैरेदुने मग कॅप्टन मेजरने दिलेले खलिते राजास दिले, तसेच बरोबर आणलेल्या वस्तूंचा नजराणाही दिला. त्यामुळे राजाला फार संतोष वाटला. इतरही काही चीजांबरोबर नजराण्यामध्ये

२०. एक प्रकारचा मंडप जिथे राजा अधिकाऱ्यांची भेट घेई

२१. तिम्म अर्स.

बाजाची पेटी होती. विशेषत: तिच्यामुळे राजाला फार संतोष वाटला. राजाने शुभ्रवस्त्र परिधान केले होते. त्यावर गुलाबपुष्पांचे पिवळे जरीकाम होते. कंठात अनमोल रत्नांचा हार होता. गॅलिसिअन शिरस्त्राणाप्रमाणे डोक्यावर जरतारी टोपी होती आणि तिच्यावर तलम रेशमी कापडाची पगडी गुंडाळलेली होती. राजा अनवाणी होता. तो असेल तिथे कोणीही जोडे घालून येत नाही. इकडे जवळपास सर्वच लोक अनवाणी हिंडतात. जोड्यांची टोके अणकुचीदार असतात. इतर काही जोडे असे आहेत, की त्यांना फक्त तळवेच असतात. तळवे पायात राहावेत म्हणून वर कातडी पट्ट्या असतात. इटालीतील चित्रे आणि मूर्ती यात दिसून येणारी प्राचीन रोमन लोकांची जोडे घालण्याची पध्दत जशी होती तशीच ही दिसते. क्रिश्तोव्हांव द फिगैरेदुला निरोप देतेवेळी राजाने त्याला एक भरजरी अंगरखा आणि स्वत:च्या डोक्यावर होती तशी टोपी यांची भेट दिली. बरोबरच्या आम्हा इतर सर्व पोर्तुगीजांनाही त्याने सुंदर आकृतीचे भरतकाम केलेली वस्त्रे भेट दिली. अशा भेटी देणे ही राजप्रथाच आहे. त्या स्नेहभावाचे प्रतीक म्हणून दिल्या जातात.

राजाने क्रिश्तोव्हांव द फिगैरेदुला निरोप दिल्यावर आम्ही सर्व जण विजयनगरला आलो. नवीन शहरापासून हे सुमारे कोसभर लांब आहे. या ठिकाणी चांगल्या वाड्यात आमची उतरण्याची व्यवस्था करण्यात आली होती. इथे अनेक सरदार, सेनाधिकारी आणि राजप्रतिनिधी क्रिश्तोव्हांव द फिगैरेदुला भेटण्यास आले. राजाने फिगैरेदुकडे बरीच बकरी, कोंबडी, मध आणि लोण्याचे 'कलोई' [२२] (घडे) तसेच इतर अनेक खाद्यपदार्थ पाठवले. क्रिश्तोव्हावं द फिगैरेदुने या सर्व वस्तू लगेच बरोबर आणलेले लोक आणि शिपाई मंडळींना वाटून टाकल्या. राजाने त्याच्याशी प्रेमपूर्वक संभाषण केले आणि पोर्तुगालच्या राजकारभाराविषयी माहिती विचारली. या माहितीने त्याला बराच आनंद झाला असे दिसले.

नव्या शहरापासून ते विजयनगरपर्यन्त एक भालाभर रुंद असा रस्ता केलेला आहे रस्त्याच्या दुतर्फा घरे आणि सर्वतऱ्हेचा माल विकणारी दुकाने यांच्या रांगा आहेत. रस्त्याच्या बाजूस झाडे लावलेली आहेत. वाटसरूंना सावली मिळावी यासाठी राजाने ही झाडे लावण्याची आज्ञा केली होती. तसेच याच रस्त्यावर राजाने एक सुंदर दगडी देवालय [२३] बांधले आहे. शिवाय सेनाधिकारी आणि मोठेमोठे सरदार यांनी बांधून घेतलेली इतरही देवळे आहेतच.

---

२२. हा 'भांडे' अशा अर्थाचा कानडी शब्द 'कोळग' असेल काय?

२३. हा उल्लेख अनंतपदनाम किंवा अनंतशयन गुडी देवळाचा असावा असे स्युअलला वाटते. काही शिलालेखानुसार राजाला देव प्रसन्न होऊन १९ जुलै १५१८ साली तिरूमलेराय या पुत्राची प्राप्त झाली. तेव्हा १५२४ (शके १४४६) मध्ये हे देवालय बांधण्यात आले. पुत्रजन्मानंतर म्हणजे १५१८-१९ मध्ये राजाने हे देऊळ बांधवून घेतल्याची शक्यता आहे. यावरून पाइश याच सुमारास विजयनगरला पोहोचला असे आपल्याला म्हणता येते.

बिसनाग शहराच्या वेशीपर्यन्त अगोदर सर्वांत आधी प्रवेशद्वार असलेला, शहराभोवती पसरलेला तट लागतो. हा तट भक्कम दगडी कामाचा आहे. सध्या काही ठिकाणी त्याची पडझड झालेली आहे. या तटात काही ठिकाणी बुरूज [२४] आहेत. तर काही ठिकाणी तटालगत खंदक असून, त्यात पाणी आहे. ज्या ठिकाणी तटाची बांधणी उतारावर आहे तिथेही पाणी आहे. तटापासून काही अंतरावर संरक्षणाची अजून एक व्यवस्था करण्यात आली आहे. काही उंच अणकुचीदार दगडाचे सुळके जमिनीत पुरण्यात आले आहेत. ते जवळपास छातीभर उंचीचे आहेत. रुंदीला ते चांगले दीड हात असून, तेवढ्याच अंतरावर जमिनीत उभे केलेले आहेत. खाली मैदानातून सुरू होणारा हा तट नंतर एका टेकडी किंवा खडकाळ जमिनीपर्यन्त जाऊन पोहोचतो. शहराचा आतील भाग येथून बऱ्याच अंतरावर असून, मध्ये भात शेते आणि बगीचे आहेत. यांना मिळणारे मुबलक पाणी दोन तलावांतून येते. हे पाणी बाहेरच्या मुख्य तटातून आत आणले जाते. झऱ्यांमुळे तलावात पाणी भरपूर असते. त्यामुळे या भागातही बरेच बगीचे, ताडाच्या राया आणि घरे आहेत.

शहराच्या मुख्य वेशीकडे परत येताना मार्गावर एक जलाशय लागतो. त्याच्या पुढे भजबूत दगडी बांधकामाचा तट आहे. वेशीपुढे हा तट वळतो. वेशीच्या दोन्ही बाजूस दोन मजबूत बुरूज आहेत. मुख्य वेस मोठी आणि सुंदर आहे. आत गेल्यानंतर दोन लहान देवळे लागतात. त्यापैकी एक देवळाच्या आवारात बरीच झाडे आहेत. मुख्य वेशीचा तट सर्व शहराला वेढा घालून आहे. पुढे गेल्यानंतर अजून एक प्रवेशद्वार आणि तट लागतो. ही तटबंदीदेखील पहिल्या तटाच्या आत असून, सगळ्या शहराभोवती पसरत आहे. इथून राजमहालापर्यन्त रस्ते जातात. रस्त्यावर सुंदर घरांच्या रांगा असून, सेनाधिकारी आणि इतर धनवान प्रतिष्ठित लोकांची घरे आहेत. दिसण्यास सुंदर अशा आकृती आणि शोभिवंत काम या घरांवर केलेले असते. मुख्य रस्त्याने पुढे गेले, की एक मोठा दरवाजा लागतो. त्याच्या आत राजमहालासमोरील मोठे पटांगण आहे. त्याच्या समोरच दुसरा एक दरवाजा असून, तिथून शहराच्या दुसऱ्या भागात रस्ता जातो. या पटांगणाच्या पलीकडे माल घेऊन जाणारी वाहने, गाड्या इत्यादी असतात. शहराच्या मध्यभागी हे पटांगण असल्याने सर्वांना सोयीचे आहे असे म्हणावे लागेल.

राजवाड्या भोवतीदेखील मजबूत तट असून, त्यातील आवार लिस्बनच्या किल्ल्यापेक्षाही अधिक मोठे आहे.

असेच पुढे गेल्यानंतर दुसऱ्या दरवाज्याकडे जाताना दोन्ही बाजूस दोन देवळे दिसतात. यापैकी एका देवळाच्या दाराशी दररोज बऱ्याच बकऱ्यांचा बळी दिला जातो.

---

२४. पोर्तुगीज भाषेत 'फोर्टालेझा' चा अर्थ लहान किल्ला असा होतो. स्युअलने त्याचे केलेले 'दुर्ग' हे भाषांतर अचूक वाटत नाही.

या शहरात हिंदू लोकांच्या उपयोगासाठी किंवा बाजारातील विक्रीसाठी बकरी मारली जात नाहीत. ती फक्त मंदिरातच प्रवेशद्वारी मारली जातात. गाभाऱ्यातील मूर्तीला बकऱ्याचे शिर आणि रक्त वाहतात.प्रत्येक बकऱ्यामागे एक चक्रम म्हणजे आपल्या फर्दिंगसारखे एक नाणे द्यावे लागते.

बकऱ्यांचा बळी देताना देवळाचा जोगी (पुजारी) हजर असतो. बकरीचे मुंडके कापताच बली दिल्याचे चिन्ह म्हणून तो शिंग वाजवतो. हे जोगी कसे आहेत याविषयी मी पुढे सांगणार आहेच.

देवळाजवळच विजयरथ आहे. त्यावर कोरीव मूर्तीकाम आणि नक्षीकाम केलेले आहे. उत्सवप्रसंगी वर्षातून एकदा तो शहरातील ज्या रस्त्यावरून जाऊ शकेल तिथून ओढून नेतात. रथ खूप मोठा असून, कोपऱ्यावर तो वळवता येत नाही.

पुढे गेल्यानंतर एक प्रशस्त आणि सुंदर राजमार्ग लागतो. त्याच्या दुतर्फा सुंदर घरांच्या रांगा असून, मध्यंतरी मी अगोदर वर्णन केले तसे रस्ते आहेत. घरे अर्थातच ऐपत असणाऱ्या श्रीमंत लोकांचीच आहेत. या रस्त्यावर व्यापारी, सौदागर, राहतात, त्यांच्या दुकानात हिरे, मोती, माणके, पाचू, कापड आणि जगातला इतर पाहिजे तो माल विकत मिळतो. रोज सायंकाळी बाजार भरतो. बाजारात नेहमीचे घोडे, तट्ट तसेच संत्री, लिंबू, द्राक्षे अशी सर्वतऱ्हेची फळफळावळ आणि लाकूड विकावयास असते. सर्व बाजारमाल रस्त्यातच विक्रीसाठी मांडलेला असतो. या रस्त्याच्या दुसऱ्या टोकाशी पुन्हा एक वेस असणारा तट आहे. हा तट दुसऱ्या प्रवेशद्वाराच्या तटाला मिळालेला आहे. अशा रीतीने राजवाड्याचा तट सोडून या शहराला तीन कोट आहेत. हा दरवाजा ओलांडून गेल्यावर लागणाऱ्या रस्त्याला कारागिरांची वस्ती आहे. तिथेही बऱ्याचशा वस्तूंची विक्री होते. या रस्त्यावर दोन मंदिरे आहेत. अशी मंदिरे प्रत्येक रस्त्यावर दिसून येतात. कारण ही आपल्याकडील कारागीर आणि सौदागर यांच्या धर्मसंघासारखी असतात. पण मुख्य आणि मोठी मंदिरे मात्र शहराबाहेर आहेत. याच रस्त्यावर क्रिश्तोव्हांव द फिगैरेदु राहात असे. दर शुक्रवारी इथे बाजार भरतो आणि त्यात बरीच डुकरे, कोबड्या, समुद्राचे वाळवलेले मासे आणि इतर अनेक गोष्टी की ज्यांची नावे मला माहीत नाहीत यांची विक्री होते. अशा तऱ्हेचा बाजार दररोज शहराच्या वेगवेगळया भागात भरत असतो. या रस्त्याच्या टोकाला म्हणजे शहराच्याच हद्दीवर मुसलमान लोकांची वसाहत आहे. यातील काही मुसलमान इथलेच मूळचे रहिवासी असून, ते राजाच्या रक्षक दलात नोकरीत आहेत. राजाकडून त्यांना पगार मिळतो. या शहरात अनेक देशाचे आणि वंशाचे लोक पाहावयास मिळतात. याचे कारण येथील व्यापारपेठ, विशेषतः हिरे, जवाहिर यांची व्यापारपेठ, हे होय.

हें शहर किती मोठे आहे याविषयी मी इथे काही लिहीत नाही. कारण अमुक एक

ठिकाणावरून ते संपूर्णपणे पाहता येत नाही. पण एका टेकडीवर चढून मी खाली पाहिले तेव्हा त्याचा बराच मोठा भाग दृष्टीस पडला. अनेक डोंगरांच्या रांगामध्ये शहर पसरलेले असल्यामुळे ते मला पूर्ण दिसू शकले नाही. पण मी जेवढे तिथून पाहिले तेवढे रोमइतके मोठे दिसले आणि दृष्टीला अतिशय रमणीय. त्याच्या आत पुष्कळशा झाडांच्या राया, बागबगीचे आणि या बागबगीच्यांना पाणी देणारे नळ आणि पाट दिसत होते. मध्येमध्ये तलाव आहेत. राजवाड्याजवळ ताडांची राई असून, इतर फळझाडांच्या बागा आहेत. मुसलमानांच्या वसाहतीखाली लहानशी नदी आहे. तिथेही अनेक बागबगीचे आहेत. त्यात मुख्यतः आंबा, फणस, सुपारी, लिंबू, संत्री यांची झाडे इतक्या दाटीने वाढतात, की सर्व भाग गर्द अरण्यासारखा दिसतो. पांढऱ्या द्राक्षवेलीही तिथे आहेत. शहरात खेळवलेले सर्व पाणी शहराबाहेरील तटाजवळच्या दोन तलावांतून येते.

या शहराची लोकसंख्या इतकी अमाप आहे, की ती कल्पित वाटेल या भीतीने मी नोंदवून ठेवत नाही. पण एवढे मात्र नक्की, की रस्तोरस्ती आणि गल्लोगल्ली लोकांची, हत्तींची इतकी गर्दी असते की, एखादी घोडदळ किंवा पायदळाची फौज आली तरी तिलाही त्यातून मार्ग काढणे अशक्य व्हावे.

अन्नधान्याची समृध्दी या शहराइतकी जगात कुठेही नाही. तांदूळ, गहू, कडधान्ये, मका, वाटाणा, मूग, डाळी, हरभरा याखेरीज इकडे उगवणाऱ्या आणि लोकांचे खाद्य असणाऱ्या इतर धान्याचाही मुबलक साठा या शहरात आहे. धान्यांच्या किमतीही कमी आहेत. इतर धान्याइतका गव्हाचा वापर इकडे होत नाही. कारण मुसलमान लोक सोडल्यास बाकीचे लोक तो फारसा खात नाहीत. पण मी सांगितलेल्या गोष्टी तुम्हास पाहावयास मिळतील. येथील रस्ते आणि बाजार ओझे लादलेल्या असंख्य बैलांनी गजबजलेले असतात. त्यांच्यातून वाट काढून जाता येत नाही. काही रस्त्यावर तर एवढे बैल असतात, की ते निघून जाईपर्यन्त वाट पाहावी लागते किंवा मग दुसऱ्या रस्त्याने जावे लागते. इकडे कोंबड्यांची पैदास बरीच आहे. *फवाअ* म्हटल्या जाणाऱ्या आणि *व्हिटेमच्या* बरोबरीने असणाऱ्या एका नाण्यास शहरात तीन कोंबड्या मिळतात. शहराबाहेर ती एका व्हिटेमला चार मिळतात.

या देशात तितर पक्षी बरेच आहेत. पण आपल्याकडील तितरांसारखे नाहीत. ते इटालीतील 'इस्टानीस' पक्ष्यांसारखे आहेत.

हे तितर पक्षी तीन प्रकारचे आहेत. पहिल्या प्रकारच्या तितरांना पोर्तुगालमधील तितरांप्रमाणे लहान नखे असतात. दुसऱ्या प्रकारच्या तितरांना प्रत्येक पायास चांगली बोटभर लांबीची व जाडीची दोन तीक्ष्ण नखे असतात. तिसरा प्रकार हा रंगीत तितरांचा असतो. बाजारात हे भरपूर असतात. शिवाय लावे, ससे इत्यादी वनपक्षी आणि बदकांसारखे दिसणारे पाणपक्षी यांचीही रेलचेल असते. बाजारात हे जिवंत विकावयास

आणतात आणि ते अतिशय स्वस्त आहेत. कारण *व्हिटेमला* सहा ते आठ तितर आणि कधी कधी एक किंवा दोन ससे मिळतात. इतर पक्षी तर गिऱ्हाईकाला मोजता येणार नाहीत एवढे मिळतात. कारण मोठे पक्षीच ते एवढे स्वस्तात देतात, की पारवे, कबुतरे आणि इतर साधारण पक्ष्यांकडे लक्षही देण्यासही तुम्हाला फुरसत नसते. पारवे दोन प्रकारचे असतात, काही पोर्तुगलकडील पारव्यांप्रमाणे तर काही कस्तुर पक्ष्यांएवढे मोठे. कबुतरे एका *फवाओला* बारा किंवा चौदा मिळतात, त्यांची किंमत इतर पक्ष्यांएवढीच असते. रोज इकडे बकरी मारतात त्यांची संख्या तर अगणित असते. कारण बकऱ्यांचे मांस विकणाऱ्या खाटकांची दुकाने रस्तोरस्ती आहेत. शिवाय हे मांस इतके स्वच्छ आणि भरपूर असते, की डुकराच्या मांसासारखे असते. डुकराचा भाव एका फानमला चार-पांच असा असतो. लिंबाची आवक, तर एवढी आहे, की त्यांच्यापुढे आपल्या पोव्होस येथील लिंबे काहीच नाहीत. याखेरीज गोड, आंबट संत्री, वांगी आणि इतर फळभाज्या यांची आवक एवढी प्रचंड आहे, की मती गुंग व्हावी. या शहराचे वैशिष्ट्य म्हणजे इतर शहरांप्रमाणे इथे खाण्याच्या जिनसांचा तुटवडा कधीच नसतो. सर्व वस्तू इथे भरपूर प्रमाणात मिळतात. लोणी, तेल यांचा भरपूर प्रमाणात होणारा खप याचाही उल्लेख येथे केला पाहिजे. काळजीपूर्वक पाळलेल्या गाई, म्हशीची या शहरातली इतकी संख्या इतरत्र क्वचितच आढळेल. इकडे डाळिंबेही भरपूर असून, त्यांचा दर एका *फानमला* दहा तर द्राक्षांच्या घडाचा दर एक *फानममागे* तीन असा आहे.

शहराच्या उत्तरेकडे एक मोठी नदी [२५] असून, तिच्यात मासे बरेच आहेत. मात्र ते खाण्यासारखे नाहीत. शिवाय या नदीत असेही काही हे की जे ........... (मुळाबरहुकूम), इतर बऱ्याच लहान नद्या या नदीला येऊन मिळाल्यामुळे तिचे पात्र मोठे झाले आहे.

आता या नदीच्या काठावर झालेल्या वसाहतीविषयी सांगतो. ''सेनागुंदिम' [२६] नावाचे शहर इथे वसविण्यात आले आहे. पूर्वी ते राज्याचे राजधानीचे शहर होते असे सांगतात, आता मात्र तिथे फारच थोडे लोक राहतात. आजही त्यांच्याभोवतीची तटबंदी मजबूत, सुस्थितीत अशी आहे. प्रवेशासाठी दोन वाटा असणाऱ्या दोन डोंगराच्या रांगामध्ये हे शहर आहे. राजाच्यावतीने तेथे एक सेनाधिकारी राहातो.

टोकऱ्यासारख्या [२७] गोल आकाराच्या नावामधून नदी ओलांडून लोक या शहरात येतात. या नावा आतून वेताच्या व बाहेरून चामडे मढवलेल्या असतात. पंधरा वीस

---

२५. हीच प्रसिध्द तुंगभद्रा नदी होय.

२६. अनेगोंदी

२७. विठ्ठलाच्या मंदिराशेजारी 'तलारीघाट' नावाचे ठिकाण आहे. आजही तिथे लोक पाइशने वर्णन केले आहे तशा नावातून नदी ओलांडताना दिसतात.

माणसांची वाहतूक त्या एका वेळेला करू शकतात. गरज भासल्यास त्यातून घोडे आणि बैलही नेता येतात. पण बहुतेक हे प्राणी पोहत पलीकडे जातात. विशिष्ट वल्ह्यांनी या नावा वल्हविल्या जातात इतर नावांप्रमाणेच या गोलाकार नावा सरळ नाहीत, वर्तुळाकार फिरत जातात. या राज्यात जेथे म्हणून नदी आलांडावी लागते तेथे अशाच नावा वापरल्या जातात. दुसऱ्या प्रकारच्या नावा नाहीत.

शहरात काही ठिकाणी जिवंत बकरी विकली जातात. शहराभोवतीच्या शेतात बकऱ्या भरपूर दिसून येतात. शिवाय गाय, बैल, शेळ्या, कोकरेही चरत असतात. हे दृश्य फार सुंदर दिसते. मोठाले बोकड असून,, त्यांना वेसण बांधतात. तसेच खोगीरही घालतात. त्यांच्यावर तसेच बकऱ्या व एडक्यांवर लहान मुले बसलेली दिसतात.

शहराच्या तटबंदीबाहेर उत्तरेकडे तीन अतिशय सुंदर देवळे आहेत. त्यापैकी एक विटेलाचे[२८] असून, नागुंदिम[२९] शहराच्या बाजूस आहे. दुसऱ्या देवळाचे नाव आओपेरादिनार[३०] असून, ते फार पवित्र समजले जाते. दूरदूरचे यात्रेकरू येथे येतात.

देवळाच्या पूर्वाभिमुख मुख्य प्रवेशद्वाराच्या समोर एक प्रशस्त मार्ग[३१] असून, त्यावर सुंदर ओवऱ्या आहेत. यात्रेकरू येथे मुक्कामास थांबतात, उच्च कुळातल्या लोकांना उतरण्यासाठी घरेही आहेत. याच मार्गावर राजाचा एक महाल असून, दर्शनास आल्यानंतर त्याचे वास्तव्य तिथे असते. पहिल्या प्रवेशद्वारापाशी एक डाळिंबाचे झाड आहे. या प्रवेशद्वाराचा गोपूर उंच असून, त्यावर स्त्री, पुरुष यांच्या आकृती तसेच शिकाऱ्यांची चित्रे रांगेने सभोवार कोरलेली आहेत. वरच्या बाजूस गोपूर जसा निमूळता होत जातो तसा या चित्रांचा आकारही कमी होत जातो. हे प्रवेशद्वार ओलांडून आत गेले की, एक मोठे पटांगण आणि नंतर गोपूर असलेले, पण आकाराने लहान असे दुसरे एक प्रवेशद्वार लागते. दुसरे प्रवेशद्वार ओलांडून आत गेल्यावर खांब असलेल्या ओवऱ्या दिसून येतात. या पटांगणाच्या मध्येच मुख्य देऊळ आहे

---

२८. विठ्ठल मंदिर.

२९. अनेगोंदी.

३०. आओपेरदिनार म्हणजे पंपतीश्वर मंदिर असणार हे निःसंशय. विजयनगर शहराच्या हद्दीवर तीन मंदिरे असल्याचे पाइश म्हणतो. पण त्याने उल्लेख मात्र दोन मंदिरांचा केला आहे. नंतरच्या परिच्छेदात त्याने केलेले वर्णन हंपीच्या विरुपाक्ष मंदिराला लागू पडते.

३१. हा मार्ग आज हंपी बाजार म्हणून ओळखला जातो. मंडपाचे भग्न अवशेष आजही तेथे दिसतात. रस्त्याच्या टोकाला राजनिवासासारखी दिसणारी एक सुंदर वास्तू आहे. ती फारशी मोठी नसल्याने मी त्याला राजमहाल म्हणणार नाही. पण पाइश म्हणतो त्याप्रमाणे कृष्णदेवराय हंपीस आल्यावर त्याचे निवासस्थान म्हणून याचा उपयोग होत असावा.

महाद्वाराच्या समोर चार स्तंभ आहेत. यापैकी दोन स्तंभांना सोन्याचा मुलामा दिलेला तांब्याचा पत्रा आहे. दुसऱ्या दोनवरील मुलामा कालमानाने निघून गेला असल्यामुळे तांब्याचा पत्रा दिसून येतो. देवळाच्या प्रवेशद्वाराला अगदी लागून असलेला स्तंभ आताच्या कृष्णदेवरायने उभा केला आहे. बाकी इतर त्याच्या अगोदरच्या राजांनी चढवलेले आहेत. महाद्वाराची बाहेरील थेट छतापर्यंतची बाजू सोन्याचा मुलामा दिलेल्या तांब्याच्या पत्र्याची आहे. छताच्या दोन्ही बाजूस वर वाघासारख्या दिसणाऱ्या प्राण्याच्या आकृत्या कोरलेल्या आहेत. त्यांनादेखील मुलामा चढवलेला आहे. मंदिरात प्रवेश करताच त्याला आधार देणाऱ्या खांबामध्ये लहान लहान कोनाडे केलेले तुम्हाला दिसतात. त्यात असणारे दिवे रोज रात्री लावतात असे मला सांगण्यात आले. या दिव्यांची संख्या अडीच ते तीन हजार असावी. पलीकडे गाभारा असून, तो एखाद्या चर्चच्या तळघराप्रमाणे आहे. त्याच्या दोन बाजूस दोन दरवाजे असून, वास्तूच्या गाभाऱ्याचा हा भाग एखाद्या चॅपेलप्रमाणे दिसतो. येथेच मुख्य देवतेची पूजा होते. गाभाऱ्यात जाण्यापूर्वी तीन दरवाजे लागतात. गाभाऱ्यावर घुमट असून, आत प्रकाश येण्याची सोय नसल्याने तो नेहमीच अंधारात असतो. त्यामुळे त्यात सतत दिवे तेवत असतात. पहिल्या दरवाजापाशी पहारेकरी असून, ते ब्राह्मण पुजाऱ्याशिवाय इतर कोणासही आत जाऊ देत नाहीत. मला मात्र त्यांनी आत जाऊ दिले कारण मी त्यांच्या हातावर काही चिरीमिरी ठेवली. प्रत्येक दोन दरवाजांमध्ये देवांच्या लहान लहान मूर्ती आहेत. मुख्य देवाची मूर्ती म्हणजे कोणतीही आकृती न कोरलेला गोल दगड आहे. त्याची फार भक्तिभावाने पूजा होते. गाभाऱ्याबाहेरील भाग सोन्याचा मुलामा दिलेल्या तांब्याच्या पत्र्याने मढवलेला आहे. मंदिराच्या मागील बाजूस, मी अगोदर उल्लेख केला आहे त्या ओवऱ्यांजवळ पांढऱ्या संगमवरी पाषाणाची, भुजा [३२] असलेली एक लहान मूर्ती आहे. तिच्या एका हातात ....... आहे. आणि दुसऱ्या हातात खड्ग आहेत. बाकी इतर हातात पवित्र आयुधे आहेत. पायाशी महिष असून, त्याला मारण्यास आणखी एक मोठ्या आकाराचा प्राणी मदत करीत आहे. या मंदिरात तुपाचा एक दिवा नेहमीच जळत असतो. मुख्य मंदिराभोवती छोटी छोटी देवळे बरीच असून, तिथेही पूजाअर्चा चालते.

दुसरी मंदिरेही याच पध्दतीने बांधलेली असली तरी हे मंदिर मुख्य असून, सवात जुने आहे. सर्व मंदिराभोवती बरीच घरे आणि वृक्ष असलेल्या बागा आहेत. पुजारी ब्राम्हण या बागात भाजीपाल्याची पैदास करतात. मंदिरातील देवांचा उत्सव असला, की चाकांवर

---

३२. चित्रभानू वर्षी सिंगराजूने प्रतिष्ठापना केलेल्या दुर्गादेवीच्या मूर्तीचे पाइश इथे वर्णन करीत आहे. ही मूर्ती 'ग्रनाईट' दगडाची आहे. इतरत्र काही ठिकाणी हंपीचे मोठे शिलाखंड हे मांढरे आहेत, असे पाइश म्हणतो. वस्तुतः ते करडे आहेत. त्यामुळे पाइशला पांढरे म्हणजे काय म्हणावयाचे हे कळत नाही. हंपीच्या विरुपाक्ष देवळात षडभुजा दुर्गेची एकही मूर्ती आज नाही. पाइशने उल्लेखिलेल्या पश्चिमकडील बाजूस दुर्गेची एक मूर्ती आहे पण तिला सहापेक्षा अधिक हात आहेत.

चालणारा विजयरथ तिथे ओढून आणतात. रथाच्या या मिरवणुकीत नर्तकी, तसेच वाद्ये वाजवणाऱ्या स्त्रिया असून, रथातून देवाची मूर्ती समारंभपूर्वक रस्त्यावरून नेली जाते. कोणत्या तऱ्हेने रथयात्रा काढली जाते हे मी सांगत नाही कारण मी शहरात होतो त्या काळात एकही रथोत्सव झाला नाही. शहरात इतरही अनेक मंदिरे आहेत, पण पाल्हाळ टाळण्यासाठी मी त्यांच्याविषयी लिहीत नाही.

आपल्याप्रमाणेच या मूर्तिपूजक लोकांचेही सणासुदीचे दिवस असतात. याशिवाय काही उपासाचे दिवसही असतात. त्या दिवशी ते दिवसभर उपास करून मध्यरात्री [३३] जेवतात. मुख्य उत्सवाच्या दिवशी स्वतः राजा नव्या शहरातून बिसनागला येतो. कारण बिसनाग राज्याची राजधानी असून, उत्सव येथेच साजरे करण्याचा रिवाज आहे. या उत्सवासाठी राज्यातील सर्व नर्तिका तसेच इतर राजे, सेनाधिकारी, अमीर, उमराव यांना त्यांच्या लवाजम्यासह बोलावणे असते. लढाईवर गेलेले किंवा जिथे शत्रूच्या हल्ल्याचा धोका आहे अशा ओरिया किंवा यायलकोच्या दूरवरच्या प्रदेशातील लोकांना मात्र अर्थातच या उत्सवास हजर राहता येत नाही. हे सेनाधिकारी हजर राहू शकत नसले तरी मी नंतर सांगणार आहे त्या प्रसंगांना मात्र त्यांच्यावतीने काही वकील हजर असतात.

हा उत्सव १२ सप्टेंबरला [३४] सुरू होतो आणि नऊ दिवस चालतो. तो राजवाड्यातच होतो.

राजवाड्याची रचना अशी : याचे एक प्रवेशद्वार मी सांगितलेल्या त्या मोकळ्या पटांगणाच्या बाजूस आहे. या दरवाजावर एक बराच उंच असा गोपूर असून, त्याच्या बाजूस दालने आहेत. अगोदर वर्णिल्याप्रमाणे या दरवाजाबाहेरील कोट सर्व राजवाड्याला वेढून आहे. प्रवेशद्वारागशी हातात चामड्याचे चाबूक आणि लाठी घेतलेले द्वाररक्षक उभे असतात. सेनाधिकारी, वरिष्ठ अधिकारी तसेच प्रमुख सुरक्षा अधिकाऱ्याचा परवाना असलेले लोक यांच्याशिवाय इतर कोणालाही हे द्वाररक्षक आत सोडत नाहीत. हा दरवाजा ओलांडून आत जाताच एक मोकळे पटांगण लागते. त्यानंतर पहिल्या दरवाजासारखाच दुसरा एक दरवाजा लागतो. तेथेही द्वारपाल आणि पहारेकरी असतात. यातून आत गेले, की पुन्हा एक मोठा मोकळा चौक लागतो. त्याच्या दोन्ही बाजूस दालने असून, तेथे सेनाधिकारी, सरदार इतर प्रमुख उत्सव पाहण्यासाठी असतात. चौकाच्या उत्तरेकडील डाव्या बाजूस एक मोठी एक मजली इमारत आहे.

---

३३. भाद्रपद बहुला अष्टमी म्हणजे कृष्णाजन्माष्टमी होय. पाइशने हा उत्सव पाहिला असावा.

३४. हा सण म्हणजे दसरा असून, तो १२ सप्टेंबर १५२० रोजी आला होता. पाइश त्या दिवशी विजयनगरात असल्यामुळे त्याने हा उत्सव पाहिला असावा.

बाकी इतर इमारतीदेखील अशाच आहेत. ही इमारत हत्तीच्या आकाराच्या आणि इतर अनेक चित्रे कोरलेल्या खाबांवर उभी आहे. इमारतीचा दर्शनी भाग मोकळा असून, एका दगडी जिन्याने लोक वर जातात. इमारतीच्या खाली सभोवार चिरेबंदी फरशी असून, उत्सव पाहण्यासाठी आलेले काही लोक तिथे उभे राहतात. ओरियाच्या राजास जिंकून युध्दावरून परत आल्यावर कृष्णदेवरायाने हा राजवाडा बांघला म्हणून त्यास विजयमहाल म्हणतात.. चौकाच्या उजव्या बाजूस अरुंद पण लाकडी मचाणे बांधलेली होती. ती भींतीच्या तटावर जात एवढी उंच होती. त्यांच्या वरच्या बाजूस लाल हिरवी मखमल लावलेली असून, सर्वत्र खाली-वर सुंदर कापडाने ही मचाणे सजवलेली होती. हे कापड लोकरीचे होते असे समजू नका. कारण या देशात लोकर होत नाही. हा कापडा तलम सुताचा होता. ही लाकडी मचाणे एकूण अकरा असून, फक्त उत्सवासाठीच ती उभारण्यात येतात. एरवी नाही. दरवाजासमोरील दोन वर्तुळाकार आकारात सोन्या-मोत्याचे व जवाहिराचे अलंकार घातलेल्या नर्तिका होत्या. चौकाच्या पूर्वेकडील दरवाजासमोर तसेच मध्यभागी विजयमहालासारख्या अजून दोन इमारती आहेत. त्यांच्यावर जाण्याला दोन सुरेख घोटीव दगडाचे जिने आहेत. पैकी एक मध्यभागी असून, दुसरा टोकाला आहे. या इमारतीचे सर्व खांब, भिंती आणि छत भारी कापडाने मढवलेल्या आहेत. भिंतीवरील कापडावर बेलबुटीचे नक्षीकाम केलेले आहे. या इमारतींना एकावर एक असे दोन चबुतरे आहेत. चबुतऱ्यांवर शिल्पकाम सुंदर असून, त्यांच्या बाजूवर कोरीव काम आहे. या चबुतऱ्यांवर राजाच्या मर्जीतील लोकांची मुले आणि त्यांच्या पदरचे हिजडे उत्सव पाहण्यासाठी येतात. यापैकी वरच्या चबुतऱ्यांवर, राजाच्या जवळ क्रिस्ताव्हो-दि-फिगैरेदुला याला बसवले होते. आम्हीही त्याच्या बरोबर होतो. सगळा उत्सव आणि समारंभ नीट दिसेल अशा ठिकाणी क्रिस्ताव्हो-दि-फिगैरेदुला बसवण्यात यावे, अशी राजाची आज्ञा होती. राजवाड्यातील विविध मार्गांचे वर्णनही आताच करतो. नसता ते राहून जाईल. मी सांगितलेल्या राजवाड्यात राजा, त्याच्या राण्या आणि त्यांच्या दासी यांचे वास्तव्य असते. या दासीची संख्या बारा हजार असून, त्यांच्या निवासस्थानांना जाण्यास त्यांना स्वतंत्र रस्ते आहेत. विजयमहल आणि हा राजवाडा यांना जोडणारा एक दरवाजा असून, त्यातून दोन्हीकडे जा-ये होते. राजवाड्याच्या आतील भागात एकूण चौतीस रस्ते आहेत.

आता पुन्हा उत्सवाकडे वळतो. विजयमहालामध्ये राजाचे कापडी पूजागृह [३५] आहे. याचे दार बंद असते. आतमध्ये मूर्तीची प्रतिष्ठापना केलेली असते. दुसऱ्या इमारतीत जिन्यासमोर मध्यभागी एक उंचवटा असून, त्यावर एक सिंहासन आहे.

---

३५. कर्नाटक राज्यातील पूजेचे हे वैशिष्ट्य आहे. आजसुध्दा दसऱ्याचे उत्सव साजरे करताना तीन कापडी बाजू असलेले पूजागृह बनवतात. श्रीफल असलेले सुशोभित कलश लक्ष्मी आणि सरस्वती या देवतांचे प्रतीक असते. पूजा धनलक्ष्मी आणि सरस्वती या देवतांची होते.

सिंहासन चौकोनी असून, त्यावर छत्र आहे. बसण्यासाठी त्यात मध्यभागी खोलगट अशी बैठक आहे. सिंहासन लाकडी असून, रेशमी कापडाने मढवलेले आहे. त्याला सोन्याचे सिंह बसवलेले असून, रेशमी कापडामधील जागेत सोनेरी पत्र्यावर माणिक-मोती तसेच मोत्याच्या झालरी लावलेल्या आहेत. सिंहासनाच्या चारी बाजूस सुवर्णाकृती कोरलेल्या आहेत. या आकृतीवर जडावाचे काम केलेले आहे. या सिंहासनावर एक सोन्याची मूर्ती बसवलेली आहे. मूर्तीभोवती गुलाब आणि इतर फुलांची सजावट आहे. सिंहासनाच्या एका बाजूस ओट्यावर एक मुकुट ठेवलेला आहे. मुकुट उंचीला वीतभर असून, रत्नखचित आहे. त्याचा वरचा भाग गोल असून, त्यात माणिक, मोती आणि इतर जवाहिर यांचे खच्चून जडावकाम केलेले आहे. मुकुटाच्या शिरोभागी एक फारसा गोल नसलेल्या सुपारीएवढा मोती बसवलेला आहे. दुसऱ्या बाजूस असाच एक रत्नखचित तोडा[३६] ठेवलेला आहे. हा तोडा म्हणजे एक राजचिन्ह असून, तोदेखील मोती, माणिक, अनमोल पन्ने, हिरे वगैरे रत्नांनी खच्चून भरलेला आहे. जाडीला तो साधारणत: एका माणसाच्या दंडाएवढा येईल. या सर्वांसमोर, ओट्याच्या कोपऱ्यावर गाद्या घालून केलेली बैठक असून, उत्सवकालात राजा तिथे असतो. उत्सव साजरा होतो तो असा :

पहाटेच राजा विजयमहालात येऊन देवघरात जातो. तिथे ब्राम्हण असतात. राजा इथे पूजापाठ उरकून घेतो. पूजागृहाबाहेर त्याच्या मर्जीतले लोक असतात आणि चौकात नर्तिकांचे नृत्य चालू असते. चौकाभोवतीच्या ओवऱ्यात उत्सव पाहण्यासाठी आलेले सेनाधिकारी, सरदार आणि वरिष्ठ अधिकारी असतात. चबुतऱ्याखालच्या अंगास देखणे, शृंगारलेले अकरा घोडे असतात. त्यांच्यामागे असेच सजवलेले चार सुंदर हत्ती उभे असतात. पूजागृहातून राजा बाहेर येतो. त्याच्याबरोबर हातात पांढऱ्या गुलाबपुष्पांची एक टोपली घेतलेला ब्राम्हण असतो. हा ब्राम्हण मसनदीवर बसलेल्या राजाजवळ जातो. राजा टोपलीतून तीन ओंजळी फुले घेऊन ती घोडयावर[३७] टाकतो. नंतर तो धूपदान हाती घेऊन धूपारती करतो. घोडयांची ही धूपारती झाल्यावर तो हत्तींचीही अशीच पूजा करतो. राजाची ही पूजा झाल्यावर ब्राम्हण टोपली घेऊन खाली येतो आणि उरलेली फुले सर्व घोडयांवर वाहतो. हे झाल्यावर तो पुन्हा राजाकडे जातो. राजा नंतर मुख्य मूर्तीजवळ जातो. तो आत जाताच तंबूचे पडदे उचलावेत तसे पूजामंडपाचे पुढील बाजूचे पडदे उचलतात. राजा तिथे स्थानापन्न होतो. राजासमक्ष चोवीस रेडे आणि एकशे पन्नास बकरी यांचा बळी देवतेला दिला जातो. रेडे आणि बकरी यांची मुंडकी मोठया कोयत्यांनी एका झटक्यात कापतात. मुंडकी उडवण्याचे हे काम एका

---

३६. महान योध्दे किंवा कलावंत हा वापरतात. याला ''वीरापेंडे'' म्हणतात.

३७. मूळ शब्द 'कॅव्हालो' हा एकवचनी आहे. हा घोडा प्रातिनिधिक स्वरुपाचा असतो. राजा या घोड्यावर फुले टाकतो. आणि उरलेली पुष्पांजली ब्राम्हण करतो.

माणसाकडे सोपवले असून, त्याचा हात कधी चुकत नाही. प्राण्यांचा बळी देणे झाल्यावर राजा बाहेरील मोठया इमारतींकडे जातो. तेथील उंचवट्यावर ब्राम्हणांची गर्दी जमलेली असते. राजा चढून वर येताच गर्दीतील राजाजवळ असणारी मंडळी त्याच्यावर दहा-बारा गुलाब पुष्पांचा वर्षाव करतात. नंतर राजा इमारतीच्या वरच्या बाजूने मंदिराला प्रदक्षिणा घालून येतो. त्यानंतर आपला मुकुट जमिनीवर ठेवून तो मूर्तीपुढे साष्टांग नमस्कार घालतो. त्यानंतर उठून तो इमारतीच्या आतील भागात असलेल्या बागेत (किंवा भिंतीने बंदिस्त असलेल्या जागेत) जातो. तिथे थोडासा अग्नी पेटवलेला असतो असे म्हणतात. या अग्निकुंडात तो नवरत्ने आणि सुवासिक द्रव्ये यांची पूड टाकतो. हे झाल्यावर तो मंदिराकडे परततो. आत जाऊन तो काही काळ तिथे थांबतो. त्याचवेळी दुसऱ्या दारातून त्याला जवळ असणारी, मर्जीतली काही माणसे आत येतात आणि त्याला प्रणाम करतात. त्यानंतर घोडयांवर पुष्पवर्षाव केला होता त्या जागी तो जातो. तिथे तो पोहोचताच सर्व सरदार, सेनाधिकारी आणि वरिष्ठ अधिकारी पुढे येऊन त्याला प्रणाम करतात. इच्छेनुसार काही जण त्याला नजराणे देतात आणि आल्या पावलानीच पाठ न वळवता ते मागे जातात. प्रत्येक जण मग आपापल्या घरी जातो. मी अगोदरच वर्णिलेल्या दोन इमारतीच्या मध्ये असलेल्या पटांगणातील दरवाजाने राजा आपल्या महालात जातो. नर्तिका आणि नर्तक यांचा देवळापुढील आणि मूर्तीपुढील नाच मात्र नंतर बराच वेळ चालू राहतो. नऊ दिवस दररोज पहाटे असा समारंभ चालू असतो. रोज तो वाढत्या प्रमाणावर साजरा होतो.

आता पुन्हा उत्सवाकडे वळतो. दुपारच्या प्रहरी सर्व जण राजवाडयात येतात. सर्वांना ते एकावेळी आत सोडत नाहीत. (आम्हाला त्यांनी दरवाजामधील पटांगणात जाऊ दिले.) फक्त मल्ल, नर्तिका, आणि श्रृंगारलेले हत्ती आत जातात. हत्तीवर रंगीबेरंगी वस्त्रे घातलेले आणि हाती ढाल बरच्या घेतलेले माहूत असतात. आत जाताच ते आखाड्याभोवती गोल असे आपापल्या जागी उभे राहतात. इमारतीच्या मध्यभागी असलेल्या जिन्याजवळ नर्तिकांसाठी मोकळी जागा सोडलेली असते. तिथे मल्ल जातात. इतर बरेचसे लोक म्हणजे ब्राम्हण, राजाच्या मर्जीतल्या लोकांची मुले, तसेच त्यांचे त्यांचे नातेवाईक इमारतीसमोरील प्रवेशद्वाराशी उभे असतात. यातील सरदारांची तरुण मुले राजाची सेवा करणारी असतात. जमलेल्या गर्दीत गोंधळ होऊ नये म्हणून राजवाडयातील अधिकारीवर्ग फिरत असतो. लोकांना आपापल्या जागी नीटपणे बसण्यास ते सांगतात. निरनिराळ्या दालनांना स्वतंत्र प्रवेशद्वारे आहेत. त्यामुळे निमंत्रितांखेरीज इतर कोणासही आत येता येत नाही.

सालवितिनिका (साळुव तिम्म) हा राजाचा प्रधान आहे. तो स्वत: आत येऊन सर्वच देखरेख ठेवतो. साळुव तिम्माने राजाचे लालनपालन करून त्याला राजपद मिळवून दिले होते. त्यामुळे राजा त्याला पित्यासमान मानतो. जेव्हा त्याच्याशी बोलायचे असेल

तेव्हा राजा त्याला आदराने व वडिलकीचा मान ठेवून संबोधितो. सर्व सेनाधिकारी आणि सरदार त्याला प्रणाम करतात. असा हा साळुव तिम्म उत्सव चालतो त्या रिंगणाच्या जवळ एका दरवाजापाशी उभा राहून हुकूम देऊन प्रत्येक गोष्टीची तजवीज करून घेत असतो.

ही सर्व व्यवस्था झाल्यानंतर राजा पुढे येऊन मी अगोदर उल्लेख केला आहे, त्या सिंहासनाच्या उंचवट्यावर विराजमान होतो. राजचिन्हेही तिथेच असतात. तेथे आत असणारे सर्व जण त्याला प्रणाम करतात. हे आटोपताच मल्ल खाली बसतात. कारण त्यांना खाली बसण्याची परवानगी असते. इतर कोणालाही - मग तो कितीही मोठा उमराव असो - राजाज्ञेशिवाय बसता येत नाही. तसेच राजासमोर बसण्याची आणि विडा खाण्याची परवानगीदेखील मल्ल आणि नर्तकी यांच्याखेरीज इतरांना नसते. स्थानापन्न होताच राजा कुटुंबियातील इतर तिघा-चौघांना त्याच्या समवेत बसण्याची आज्ञा करतो. या व्यक्ती स्वतः राजे असून त्यांच्या मुली राजाला दिलेल्या आहेत. या राजांपैकी प्रमुख म्हणजे सिरगपट्टाओ [३८] तसेच मलबारच्या सरहद्दीवरील भूप्रदेश यांचा राजा कुमारविरया [३९] हा होय. तो राजापासून काही अंतरावर रांगेत बसतो. इतर सर्व जण राजाच्या पाठीमागे बसतात.

राजाने यावेळी पांढरी वस्त्रे परिधान केलेली असून, त्यावर गुलाबपुष्पांची कलाबतु केलेली असते. त्याच्या अंगावर सर्व अलंकार असतात. राजाचा पोषाख नेहमीच असा पांढरा असल्याचे मी पाहिले आहे. त्याच्याभोवती त्याचे हुजरे, हाती पानदान, तलवार आणि राजचिन्हे घेऊन उभे असतात. मूर्ती असलेल्या सिंहासनाभोवती बरेच ब्राह्मण घोड्याच्या शेपटीपासून बनवलेल्या चौऱ्या ढाळीत असतात. या चौऱ्या रंगीत असून, त्यांच्या मुठीवर सोन्याचे काम केलेली असते. या चौऱ्यांना फार मोठा मान असतो. अशा चौऱ्या राजावरही ढाळतात.

राजा बैठकीवर बसताच बाहेर प्रतीक्षा करणारे सेनाधिकारी, सरदार आपल्या दर्जानुसार एकानंतर एक असे आपल्या प्रमुखांसह आत येतात. राजाजवळ येऊन ते त्याला प्रणाम करतात आणि मी मागे सांगितले आहे त्या दालनात परत जातात. हे सरदार येऊन गेल्यावर हाती भाले आणि ढाली घेतलेले पलटणीचे कप्तान आणि तिरंदाजांचे कप्तान येतात. हत्ती समोरील आखाड्याच्या भोवती असलेल्या जागी हे अधिकारी उभे राहतात. हे राजाचे अंगरक्षक होत. हत्यार धारण करणाऱ्या इतर कोणालाही आत किंवा राजाजवळ जाता येत नाही. हे रक्षक आपापल्या जागी उभे राहतात. नर्तकींचा नाच सुरू होतो. यापैकी काही कलावंतीणी मी अगोदर वर्णन केले

---

३८. श्रीरंगपट्टण.

३९. कुमार वीरय्या.

आहे, त्या प्रवेशद्वाराजवळ तयार केलेल्या गोल सज्जामध्ये जाऊन बसतात. या स्त्रियांच्या अंगावरील आभूषणांचे वर्णन व्यवस्थितपणे करता येईल. ही आभूषणे म्हणजे मोती, माणके, हिरे यांनी जडवलेले सोन्याचे कंठे, हातावरील बाजूबंद आणि वाक्या, कंबरपट्टे आणि पायातील पैंजणे, तोरड्या हे होत. या व्यवसायातील स्त्रियांजवळ एवढी संपत्ती आणि दागदागिने असावेत ही गोष्ट नवलाची म्हणावी लागेल. यांच्यापैकी काहीना तर जमिनी इनाम देण्यात आल्या आहेत. त्याखेरीज त्यांच्याकडे पालख्या आणि अगणित दासी आहेत. या शहरातील अशाच एका गणिकेजवळ एक लक्ष *परदाओ* आहेत, असे सांगण्यात येते. मी पाहिले त्यावरून हे खरे असेल असे वाटते.

नंतर मल्लांच्या कुस्त्या सुरू होतात. त्या आपल्याकडील कुस्त्यांपेक्षा वेगळ्या आहेत असे वाटते. पण तरीदेखील त्या खेळतांना हे मल्ल एकमेकांवर प्रहार करतात, इतके, की त्यामुळे डोळ्यांना इजा होते, दात पडतात आणि चेहरा विद्रूप होऊन जातो. काही मल्ल बेशुध्द पडतात तेव्हा त्यांचे मित्र त्यांना घेऊन जातात. काही वेळा ते एकमेकांना कुशलतेने चीत करतात. या मल्लांचे उस्ताद आणि पंच असतात. ते आखाड्यात उभे राहून पहिलवान बरोबरीचे आहेत, की नाही हे पाहतात. तसेच कुस्ती निकाली झाली किंवा नाही हे पाहून इनामाची व्यवस्था करतात.

अशारीतीने तिसरा प्रहर म्हणजे कुस्त्या आणि गणिकांचा नाच याचा असतो. पण सूर्य मावळताच बऱ्याच मशाली व पोत पेटवण्यात येतात. त्या आखाड्याभोवती अशा ठेवतात, की दिवसासारखा लख्ख उजेड पडतो. इतकेच नव्हे, तर भिंती, तट आणि राजा असतो ती जागा, इथेही मशाली पेटवून ठेवलेल्या असतात. सर्व मशाली लागताच मग नाना तऱ्हेचे खेळ व सोंगे सुरू होतात. पण खेळ करणारे हे लोक फार वेळ थांबत नाहीत. राजापुढे हजेरी देऊन ते लगेच बाहेर जातात. त्यांच्या नंतर कृत्रिम घोड्यांवर स्वार झालेले काही जण लुटपुटीचे अश्वयुध्द दाखवून जातात. हे कृत्रिम घोडे म्हणजे पोर्तुगालमध्ये कार्पो-द-दिओश या उत्सवानिमित्त वापरण्यात येणाऱ्या लाकडी घोड्यासारखे आहेत. यानंतर पारधी आणि कोळी यांची सोंगे येतात. आपल्या जाळ्यात आखाड्यातील लोकांना पकडण्याचा लटका ते प्रयत्न करतात. मनोरंजनाचे हे सर्व प्रकार संपल्यानंतर दारूकाम सुरू होते. या आतषबाजीत निरनिराळे बाण, भुईनळे आणि फटाक्यांचे विविध प्रकार उडवण्यात येतात. यातील काही पेटून वर उडताच मोठा आवाज होऊन त्यातील बाण बाहेर फेकले जातात.

दारूकाम संपताच सेनाधिकाऱ्यांचे विजयरथ आत प्रवेश करतात. यापैकी काही रथ परराज्यांत मोहिमेवर असलेल्या लष्करी अधिकाऱ्यांनी पाठवलेले असतात. हे रथ आत प्रवेश करतात ते असे : साळुव तिम्माचा रथ सर्वांत पुढे येतो. त्यानंतर आपापल्या दर्जाप्रमाणे इतर सरदार, अधिकारी यांचे रथ येतात. यापैकी काही रथ मौल्यवान कापडाने सुशोभित केलेले असून, त्यावर नर्तिका आणि इतर स्त्री-पुरुषांच्या आकृती

काढलेल्या असतात. काही रथांना मजले असतात. हे सर्व क्रमाक्रमाने राजापुढे जाऊन परत येतात. रथ निघून जाताच लागोलाग नंतर शृंगारलेले घोडे आणतात. त्यांना राजध्वजाच्या रंगाच्या तलम झुली घातलेल्या असतात. त्यांच्या गळ्यात व डोक्यावर गुलाबपुष्पांचे हारतुरे असून, लगामाला सर्वत्र सोनेरी रंग दिलेला असतो. या सर्व घोडयांच्या पुढे जो घोडा असतो त्यावर दोन राजछत्रे असतात. इतर घोडयांपेक्षा याला अधिक शृंगारलेले असते. एक मोतद्दार हाती लगाम धरून त्याला आणतो. याही घोड्यांचा आघाडीला असाच एक सजवलेला घोडा ऐटदार वळणे घेत दुडक्या चालीने असा चालतो. येथील सर्वच घोड्यांना अशाप्रकारचे प्रशिक्षण दिलेले असते. एवढया थाटामाटाने आणलेला हा घोडा राजाचा असून, राज्यारोहणाच्या समयी याच घोड्यावर बसून त्याला शपथ घ्यावी लागते. पुढे गादीवर येणाऱ्या राजांनाही याच घोड्यावर आरूढ होऊन शपथ घ्यावी लागणार. यदाकदाचित हा घोडा मेला तर त्याऐवजी ते दुसरा आणतात. एखाद्या राजाला अश्वारूढ होऊन शपथ घेण्याची इच्छा नसेल तर त्याला हत्तीवर आरूढ होऊन घ्यावी लागते. या हत्तीलाही मग या घोड्याइतकाच मान मिळून त्याची बडदास्तही तशी राखली जाते.

अशारीतीने मिरवणारे घोडे मैदानाभोवती दोन वेळा गोल फिरून मैदानाच्या मध्यभागी एकामागे एक असे सहा-सात रांगामध्ये उभे राहतात. त्या सर्वांची तोंडे राजाकडे असून, आघाडीला खुद्द राजाचा घोडा असतो. घोडे अशारीतीने उभे करतात, की त्यांच्यामध्ये आणि प्रेक्षकांत गोल मोकळी वाट असते. घोडे असे उभे राहून सर्वत्र शांतता होताच राजाचा सर्वांत वरिष्ठ ब्राह्मण इतर दोन ब्राम्हणांसह राजमहालातून येतो. त्यांच्या हातात श्रीफल ठेवलेला कलश, तांदूळ आणि फुले असतात. इतर दोघांजवळ पाण्याचा कलश असतो. राजाभिमुख असलेल्या घोड्यांना प्रदक्षिणा घालून तो ब्राह्मण पुन्हा राजमहालात परत जातो

हे संपताच राजमहालातून हाती छड्या घेतलेल्या पंचवीस-तीस द्वारपालिका बाहेर येतात. त्यांच्या खांद्यावर चाबूक असतो. त्यांच्या मागोमाग लगेच पुष्कळसे हिजडे आणि नंतर तुतारी, सनई,[४०] ढोल व तंतुवाद्ये[४१] वाजवणाऱ्या स्त्रिया येतात. ही वाद्ये आपल्याकडील वाद्याहून वेगळी आहेत. या स्त्रियांच्या पाठोपाठ सुमारे वीस चोपदार स्त्रिया येतात. त्यांच्या हातात चांदीचे दंड असतात. या चोपदार बायकांच्या मागून ज्या स्त्रिया येतात त्यांचा वेष असा : त्यांच्या अंगावर भरजरी आणि तलम रेशमी कपडे असतात. डोक्यावर उंच टोप्या[४२] असून, त्यांच्यावर मोत्यांचे तुरे लावलेले असतात.

---

४० वाद्याला कासी म्हणतात

४१. हे वाद्य म्हणजे बहुधा एकतारी असावी, पण तसे निश्चितपणे सांगता येत नाही.

४२. कन्नडमध्ये याना ''कुलाई'' (एक प्रकारची टोपी) म्हणतात.

गळ्यामध्ये मोत्यांच्या अनेक माळा असून, शिवाय सोनेरी कंठे असतात. त्या कंठयामध्ये हिरे, माणके, मोती बसवलेले असतात. हातामध्ये अनेक जडावांची कंकणे असून, दर उघड्या दंडावर बाजूबंद, वाक्या असतात. सोनेरी जडावकाम केलेल्या कंबरपट्ट्याखाली रत्नखचित मेखला एकाखाली एक अशा मांड्यापर्यन्त रुळतात. याखेरीज पायात पैंजण, तोडे असूनदेखील रत्नखचित असतात. पैंजणे, तोडे हे तर इतर दागिन्यांपेक्षाही अधिक मौल्यवान असतात.

लहानशा जुलकुंभाएवढे सुवर्णपात्र या स्त्रियांच्या हातात असते. या सुवर्णपात्राच्या आत केलेल्या वर्तुळाकार खाचांमध्ये मेणाने मोती चिकटवलेले असतात. या सर्वांच्या आत दिवा[४३] पेटवून ठेवलेला असतो. या स्त्रियांची संख्या साठ असावी. त्या सर्व तरुण, सुंदर असून, सोळा ते वीसच्या दरम्यानच्या असतात. क्रमाक्रमाने एकानंतर एक अशा त्या पुढे येतात. एकेकीच्या अंगावर असणाऱ्या अलंकाराचे मूल्य कोण करू शकेल ? अंगावरील आभूषणे, कंकणे यांचा न सहन होईल एवढा भार काही जणींना झालेला असतो. इतका की तैनातीस असणाऱ्या इतर बायका त्यांना आधार देतात. अशारीतीने सजलेल्या या स्त्रिया, घोडयांना तीन प्रदक्षिणा घालून राजमहालात परत जातात. या बायका आणि त्यांच्या सोबतीस असणाऱ्या इतर जणी या सर्व राणीच्या तैनातीतील वरिष्ठ दासी असतात. नवरात्राच्या उत्सवातील नऊही दिवशी प्रत्येक राणीने आपल्या दिमतीतील स्त्रियांना अशारीतीने सजवून, शृंगारून एकेक दिवशी पाठवण्याचा रिवाज आहे. राजप्रथा आणि परंपरेनुसार सरकारी अधिकारी नऊ दिवसांच्या उत्सवाची व्यवस्था आपापल्यात वाटून घेतात. त्याप्रमाणे या सजवलेल्या स्त्रिया दररोज येऊन आपल्या आभूषण शृंगाराचे आणि वस्त्रांचे सानंद प्रदर्शन करतात.

या स्त्रियांच्या पाठोपाठ घोडेही रवाना होतात. त्यानंतर येतात हत्ती, मोडेने प्रणाम करून तेही परत जातात. एवढे झाल्यावर महालाच्या कडेशी असलेल्या एका दरवाजाने राजाही निघून जातो. नंतर ब्राह्मण मंडळी उत्सवमूर्तीस उचलून विजयमंडपाकडे नेतात. तिथे मी आधी उल्लेख केला तो पूजामंडप आहे. राजा आतून प्रवेशून या पूजामंडपात येतो आणि मूर्तीजवळ जाऊन पूजाअर्चा आणि प्रार्थना करतो. त्यानंतर अजून अधिक रेडे, बकरी, यांना आणतात. पहिल्याप्रमाणेच त्यांचा बळी देण्यात येतो आणि मग कलावंतीणीचा नाच सुरू होतो. रेड्याबकऱ्यांचा बलीविधी होताच राजा भोजनासाठी महालात जातो. राजाने नऊ दिवस उपास केलेला असतो. इकडे सर्व जण नवरात्रात उपास करून उत्सव संपल्यावरच शेवटी पारणे फेडतात. त्यांची उपास सोडण्याची वेळ मध्यरात्र असते. मूर्तीसमोरचा नाच मात्र नंतरही बराच वेळ चालू राहतो.

---

४३. हे आरतीचे वर्णन आहे.



विरूपाक्ष मंदिराचे पूर्व गोपुर. हे मंदिराचे मुख्य प्रवेशद्वार आहे





हंपी येथील विठ्ठलपुरातील विठ्ठलमंदिर (पश्चिमदर्शन)

हंपी येथील कृष्णपुऱ्यातील कृष्णमंदिर





हंपी येथील रामचंद्र मंदिर, दक्षिण बाजू : रामायणातील दृश्ये

विठ्ठल मंदिरातील शिल्परथ





पाइशने वर्णिलेल्या मडपातील एक खांब

बखरकारांनी वर्णिलेला होस्पेटच्या वाटेवरचा प्रचंड तलाव (आता लागवडीखाली आहे.)

असा हा उत्सव नऊ दिवस चालतो. शेवटच्या दिवशी अडीचशे रेडे आणि चार हजार बकऱ्यांचा बळी दिला जातो.

उत्सव संपल्यानंतर राजा त्याच्या फौजेची पाहणी करतो. ही पाहणी होते ती अशी : राजाज्ञेने शहरापासून एक कोसभर अंतरावर मक्का या तलम कापडाचा एक तंबू उभारण्यात येतो. तंबूची ही जागा नेहमी ठरलेली असते. या तंबूमध्ये उत्सवमूर्ती ठेवण्यात येते. राजप्रसादापासून ते या तंबूपर्यन्तच्या मार्गावर विविध सेनाधिकारी आपल्या दर्जानुसार आपापल्या फलटणीसह क्रमाने खडी ताजीम देतात. सैनिक रांगेने उभे असतात. पण ही केवळ एकच रांग नसून, एकामागे एक असणाऱ्या दोन तीन रांगा असतात. मागे तलाव असेल तर त्याच्याभोवती वर्तुळाकार हे सैनिक उभे असतात. रस्ता अरुंद असेल तर जवळच्या मोकळ्या मैदानात आणि जेथे टेकड्या, उंचवटे असतील तेथे उतारावर खडे असतात. अशारीतीने सैनिक उभे नाहीत अशा टेकड्या, मैदाने तुम्हाला दिसणारच नाहीत. सर्वांत पुढे पायदळाचे सैनिक, त्यांच्यामागे घोडदळाचे आणि सर्वांत मागे हत्तीदळाचे सैनिक उभे असतात. प्रत्येक दलाचा अधिकारीदेखील आपापल्या पलटणीसह उभा असतो. शहरात असणारे सैन्य छपरे, गच्ची असे उभे राहणे साहजिकच शक्य नसते. हे सैन्य मग शहराच्या तोंडाशी उभारलेल्या लाकडी मचाणांवर उभे राहाते अशारीतीने शहरात आणि शहराबाहेर सर्वत्र सैन्यच सैन्य दिसते.

आता मी त्यांच्या हत्यारांचे आणि साजांचे वर्णन करतो. घोडदळातील सैनिक उत्तम तऱ्हेने सजवलेल्या घोडयांवर स्वार झाले होते. घोडयांच्या कपाळावर चांदीच्या किंवा सोन्याचा मुलामा दिलेल्या पट्टया होत्या. या पट्टयांना पिळदार, रंगीबेरंगी अशा रेशमी झालरी होत्या. त्यांच्या लगामांनाही अशाच वळीव झालरी होत्या. इतर काही घोडयांना मक्केच्या मखमलीचा साज चढवलेला होता. ही मखमल विविध रंगांची असून, नक्षीकाम व झालरीने युक्त असते. काही घोडयांवर रेशीम, सॅटीन यांच्या झुली असतात तर इतर काही घोडयांचा साज चीन, पर्शिया येथील भरजरी कापडाचा बनवलेला होता. काही घोडेस्वारांनी मुलामेदार पत्र्याची रत्नजडित चिलखते घातली असून, त्यांना लहान मोत्यांच्या जाळीदार झालरी होत्या. काही घोडयांच्या डोक्यावर सर्पाकृती किंवा इतर अनेक मोठया प्राण्यांच्या आकाराची शिरोभूषणे लावलेली होती. घोडेस्वारांच्या अंगावरील पोषाख शंखाकृती काठ असलेला अंगरखा असून, तो जरीचा, मलमलीचा किंवा रेशमी होता. हे अंगरखे पक्क्या चामड्याच्या थरांचे केलेले असून, त्यावर मजुबतीसाठी शिवाय लोखंडी पत्राही असतो. त्यातील काही पत्र्यांना आतून, बाहेरून सोन्याचा मुलामा असतो तर काही चांदीचे बनवलेले असतात. त्यांच्या शिरस्त्राणाचे काठ मानेपर्यन्त पोहोचतात, तसेच संरक्षणासाठी पुढे दोन्ही बाजूस पट्टया असतात. ही शिरस्त्राणेही अंगरख्याप्रमाणेच मजबूत व भारी असतात. गळ्यावरील संरक्षक कवच

मुलामा दिलेले असते तर काहींच्या बाबतीत ते सोन्या-चांदीचा मुलामा दिलेल्या पट्ट्या कापडात बसवून तयार केलेले असते. काहीची ही संरक्षक कवचे आरशासारख्या चकचकीत पोलादी पत्र्यांची बनवलेली असतात. स्वारांच्या कमरेला तलवारी खोचलेल्या असून, हातात फरशी, तसेच सोनेरी, रुपेरी टोक असलेले भाले, बरच्या असतात. सर्व घोडेस्वारांच्या डोक्यावर छत्र्या असून, त्या नक्षीकाम केलेल्या भरजरी, मखमली कापडाच्या असतात. घोड्यांवर रेशमी वस्त्रे घातलेली असून, ती विविध रंगांची असतात. स्वार फडकवतात ती निशाणे पांढऱ्या किंवा रंगीत पिसाऱ्यांची[४४] असतात. ही घोड्याच्या शेपटीपासून तयार केलेली असून, त्यांना मोठा मान असतो. हत्तीवर ही झालरी असलेल्या मखमली, जरतारी झुली घातलेल्या असून, शिवाय इतरही रंगीबेरंगी वस्त्रे भरपूर घातलेली असतात. वस्त्रांना दोन्ही बाजूला लावलेल्या घंटानादाने आसमंत भरून जातो. हत्तींच्या गंडस्थळावर राक्षसमुखाची किंवा इतर अनेक मोठ्या प्राण्यांची चित्रे चितारलेली आहेत. चुणीदार अंगरखा घातलेली तीन-चार माणसे हत्तीच्या पाठीवर बसलेली असून, त्यांच्या हातात ढाली, बरच्या असतात, जणू काही ते स्वारीसाठी सज्ज झालेले आहेत. पायदळाविषयी सांगावयाचे म्हणजे टेकड्या व दऱ्याखोऱ्या भोवती त्यांच्या इतक्या तुकड्या उभ्या होत्या, की त्यांचे वर्णन अतुलनीय ठरेल. या तुकड्यातील सैनिकांचे पोषाख इतके मौल्यवान कापडाचे होते, की ते कोठून येते हे मला ठाऊक नाही. तसेच या पोषाखाच्या विविध रंगांचे वर्णन करणेही कठीण आहे. ढालाईतांच्या ढालीवर सोनेरी किंवा रुपेरी फुले काढलेली आहेत. इतर काहीच्या ढालीवर वाघ अथवा अशा मोठ्या प्राण्यांच्या आकृती कोरलेल्या आहेत. काही जणांच्या ढालींवर चांदीचे जाळीदार नक्षीकाम केलेले आहे, तर काहीच्या ढाली या निरनिराळ्या रंगांच्या आहेत. काहीच्या काळ्या आहेत. काही ढालीना दिलेली झिलई इतकी चकचकीत आहे, की त्यात आरशाप्रमाणे पाहून घ्यावे. काहींच्या तलवारीवरील नक्षीकाम, मीनकाम इतके भारी आहे की, त्याचा नमुना तुम्हाला इतरत्र सापडणे कठीण. तीरंदाजाविषयी सांगावयाचे म्हणजे त्यांच्या धनुष्याला सोन्या-चांदीचे पत्रे बसवलेले असतात किंवा त्यावर उत्तम झिलईकाम केलेले असते. त्यांचे बाण नीटनीटके असून, त्यांना पिसे लावलेली असतात. त्यांच्या कंबरेला जंबिये आणि फरशा अडकवलेल्या असतात. त्यांचीही टोके आणि दांड्या सोन्या-चांदीच्या असतात. त्यानंतर आपापल्या दर्जाप्रमाणे व क्रमाने उभे असतात बंदूक व कडाबिनी घेतलेले सैनिक. जाड अंगरखा घातलेले हे शूर सैनिक उभे असलेले दृश्य फार प्रेक्षणीय दिसते. याच पाहणीसाठी उभे असलेल्या मुसलमान सैनिकांविषयी न विसरता लिहिले पाहिजे. त्यांच्याही हातात ढाली, बरच्या, तुर्की तीरकमठे, भाले तसेच विविध बरनाळे इत्यादी

---

४४. चवरी. उत्सवासाठी आलेल्या सेवकांजवळ छत्र, चामर आणि चवऱ्या आहेत.

दारूकामाची अस्त्रे होती, अशी हत्यारे चालवता येणारे हे लोक पाहून मला खूपच आश्चर्य वाटले.

मी अगोदर वर्णन केलेल्या मुख्य घोड्यावर आरूढ होऊन राजा राजवाड्याबाहेर पडतो. त्याने परिधान केलेल्या शुभ्र वस्त्रांचा उल्लेखही यापूर्वी आलेलाच आहे. लाल मखमली कापड लावलेली सोनेरी राजछत्रे त्याच्या दोन्ही बाजूस धरलेली असतात. त्याच्या अंगावर असणारी आभूषणे अशा खास प्रसंगी वापरावयाची असतात. ज्याने कधी अशा प्रकारचे अलंकार घातलेले आहेत त्यालाच या नृपाधिपतीने घातलेल्या आभूषणांची कल्पना करता येईल. शिवाय त्याच्यासमवेत असणाऱ्या मांडलिकांचे व सरदारांचे वैभव काय वर्णावे ? मला तर ते करता येणार नाही आणि असे केले तरी ते विश्वसनीय वाटणार नाही. घोड्यांना घातलेली चिलखते म्हणजे धातूच्या पत्र्याची होती. त्यांचेही वर्णन मला करता येणार नाही. काही घोडे मला नीटपणे पाहता आले नाहीत. खरे म्हणजे मी जे पाहिले त्याचा यथायोग्य वृतांत देणे निष्फळच ठरेल. कारण घोड्यावरून जात असताना माझी मान सारखी इकडून तिकडे वळत होती, इतकी, की देहभान हरपून आपण मागच्यामागे पडतो की काय, असे मला वाटत होते. या मिरवणुकीच्या सजावटीचे व तिच्या खर्चाचे आश्चर्य वाटण्याजोगे नाही. कारण या देशात संपत्ती भरपूर आहे आणि सर्व सरदार व इतर प्रमुख श्रीमंत आहेत.

मी अगोदर सांगितल्याप्रमाणे राजाच्या पुढे शृंगारलेले हत्ती चालले होते. तसेच सोन्या, रत्नांचे नक्षीकाम केलेली खोगिरे घालून सजवलेले वीस घोडेही त्याच्यासमोर चालत होते. जणू आपल्या मालकाचे सर्व वैभव व शान ते दाखवीत होते. राजाच्या शेजारीच एक डोलारा होता. लिस्बनमध्ये कार्पो-द-दिओश सणाच्या दिवशी वापरतात तसा तो डोलारा होता. हा आकाराने मोठा असून, त्याला सोन्याचा मुलामा दिलेला होता. तो तांब्याचा अथवा चांदीचा केलेला असावा असे मला वाटले. प्रत्येक बाजूस आठ अशी सोळा माणसे तो वाहून नेत होता. शिवाय इतरही अनेक माणसे आळीपाळीने त्याला हात लावीत होती. मी उल्लेख केला ती उत्सवमूर्ती या डोलाऱ्यातून नेली जात होती. या सर्व लवाजम्यासह राजा आपल्या सैनिकांची पाहणी करत चालला होता. त्याला पाहताच सैनिक त्याचा जयघोष करून आपल्या ढालीवर हाताने आघात करीत. घोडे खिकाळत आणि हत्ती चित्कार करीत. त्यामुळे शहर आता उलथून पडते की काय असे वाटे. तोफा, बंदुकीच्या सलामीच्या प्रचंड आवाजाने दऱ्या, टेकड्या व धरणी कंपायमान झाली. नळे आणि तोफा यांची मैदानात होणारी आतषबाजी विस्मयकारक होती. सर्व जग तिथे एकवटल्यासारखे वाटत होते.

हा थाट व धामधूम राजा मी अगोदर उल्लेख केला त्या तंबूशी येईपर्यन्त चालू होता. तंबूत प्रवेश करून राजाने नेहमीची पूजाअर्चा आणि प्रार्थना केली. राजा पुढे निघून जाताच फौजा आपल्या जागेवरून हलल्या असे समजू नका. उलट तो जाईपर्यंत त्या

आपापल्या ठिकाणी निश्चल उभ्या होत्या. पूजाअर्चा आटोपताच अश्वारूढ होऊन राजा आपल्या मार्गानेच शहरात परतला. तो जातानाही सैनिकांचा जयघोष न कंटाळता चालू होता. राजा पुढे जाताच सैनिक शिस्तबध्द पावले टाकत रवाना होत. टेकड्यांच्या माथ्यावर व उतारावर असलेले हे सैनिक जयघोष करून ढालींवर आघात करत आणि आपले असंख्य तीरकमठे परजत खाली येत. त्या दृश्याचे वर्णन मी काय करावे ? माझे भान हरपले. आपण स्वप्नात असून, समोर काही अद्‌भुत दृश्य पाहत आहोत असे मला वाटले. त्यानंतर फौजा मैदानात असलेल्या आपल्या तंबू व डेऱ्यात परतल्या. त्या तंबू-डेऱ्यांची संख्याही भरपूर होती. सर्व सेनाधिकारी राजमहालापर्यन्त राजासमवेत होते. नंतर तेथून ते आपापल्या ठिकाणी एवढ्या श्रमानंतर विश्रांती घेण्यासाठी गेले. आता मला तुम्हाला सांगावेसे वाटते, की राजाजवळ जय्यत असे दहा लाख सैन्य आहे. यात ३५,००० चिलखती पायदळाचा समावेश होतो. हे सर्व त्याच्या पदरी नोकरीस असून, गरज पडेल तेव्हा कोठेही रवाना करता यावे या दृष्टीने तो त्यांना एकत्र सुसज्ज ठेवतो. बिसनागमध्ये असताना आपल्या समुद्रकिनारी[४५] असलेल्या भागात राजाने अशीच एकदा फौज पाठवली ते मी पाहिले. या फौजेत पायदळातील बराच भरणा असलेले १,५०,००० सैनिक आणि ५० सेनाधिकारी होते. राजाजवळ हत्तीही भरपूर आहेत. राज्याच्या सरहद्दीवर असणाऱ्या तीन राजांना जेव्हा आपली सत्ता व सामर्थ्य दाखवावयाचे असेल तेव्हा राजा मैदानात वीस लाख सैनिकांची फौज खडी करतो असे म्हणतात. या कारणानेच या भागात त्याचा सर्वात जास्त दरारा आहे. फौजेत इतके लोक गुंतल्यामुळे राज्यात माणसांचा तुटवडा पडतो असे समजू नये. उलट राज्याची आबादी अशी आहे, की एकही माणूस काढून घेतला असे वाटत नाही. याला कारण असंख्य मोठमोठे व्यापारी, मजूर आणि व्यापारीउदिमात काम करणारे अनेक लोक इथे आहेत. शिवाय शेतीचा व्यवसाय करणारे, त्याचप्रमाणे मोठ्या संख्येने असणारे ब्राह्मणही आहेत. हे ब्राह्मण सर्व मूर्तिपूजक देशात असतात. ते प्राण्यांची हिंसा व मांसाहार करीत नाहीत. लढवय्येपणाही त्यांना फारसा रुचत नाही.

तुम्ही म्हणाल की या राजाचा महसूल किती ? एवढ्या सर्व फौजेला तनखा देता येईल असा त्याचा खजिना किती असेल ? शिवाय यांच्या पदरी सरदार उमराव असून, यापैकी बहुतेकांना स्वत:चा महसूल असतो तो निराळाच. याचे उत्तर असे : हाताखाली लष्करी तुकड्या असणारे हे सेनाधिकारी त्याच्या राज्यातील सरदार असतात. ते जमीनदार असून, राज्यातील शहरे, गावे, खेडी त्यांच्या ताब्यात असतात. त्यापैकी काही सरदार, सेनाधिकाऱ्यांचे उत्पन्न सालिना दहा ते पंधरा लाख परदाओ आहे. इतर काही जणांचे एक लक्ष, काहींचे दोन लक्ष तर काहींचे तीन किंवा पाच लक्ष परदाओ आहे.

---

४५. बहुधा हा संदर्भ केतावरमच्या युध्दाचा असावा. हे समुद्रकिनारी असून, नूनीश ज्याचा कात्यूर म्हणून उल्लेख करतो ते हेच होय.

प्रत्येकालाच उत्पन्न असल्याने राजाने त्या उत्पन्नाच्या प्रमाणात प्रत्येकाकडे पायदळ, घोडदळ व हत्तीदळ यांच्या किती फलटणी असाव्यात हे ठरवून दिलेले आहे.

केव्हाही आणि कोठेही मोहिमेवर जायचे असेल तर त्यासाठी या लष्करी पलटणी नेहमीच सुसज्ज असतात. अशा रीतीने राजाजवळ लक्षावधी खडे सैन्य तयार असते. सेनाधिकारी सैनिकांचा तनखा देत असल्यामुळे आपल्या हाताखालील पलटणीची व्यवस्था उत्तम ठेवून तो तिला मेहनत घेऊन जय्यत तयारीत ठेवतो. पाहणीच्या वेळी असतील तेवढे उमदे, तरणेबांड लोक दिसत होते. मित्रा, हतबल होईल असा एकहीजण मला दिसला नाही. पलटणीची व्यवस्था पाहण्याखेरीज प्रत्येक सेनाधिकाऱ्याला राजास आपली सालिना रक्कम अदा करावी लागते. शिवाय राजाचे स्वतःचे पगारी लष्कर असते. त्यांचा तनखा त्याच्या खजिन्यातून होतो. त्याचे स्वतःचे आठशे हत्तींचे दळ असून, शिवाय त्याच्या मार्गामध्ये पाचशे घोडे आहेत. या हत्ती-घोड्यांचा खर्च त्याच्या बिसनाग शहराच्या महसुलातून होतो. शिवाय हत्ती-घोड्यांची देखभाल करणाऱ्या सेवकवर्गाचाही तनखा असतो तो निराळाच. हा खर्च किती अवाढव्य असेल याची कल्पना तुम्हाला आता येईल. शिवाय यावरून शहराचे उत्पन्न किती प्रचंड असेल याचाही अंदाज बांधता येईल.

बिसनागच्या राजाचे पाच मांडलिक राजे असून, खेरीज मोठा महसूल असलेले अनेक सेनाधिकारी व सरदार आहेत. जेव्हा राजाला पुत्र किंवा कन्या संतती होते तेव्हा राज्यातील सर्व सरदार त्याला पैसे आणि मोल्यवान जवाहिर नजराणा म्हणून देतात. दरवर्षी राजपुत्राचा वाढदिवस असेल त्या दिवशी नजराणा देण्याची प्रथा ते चालू ठेवतात.

वर वर्णिलेला नऊ दिवसांचा उत्सव संपताच ऑक्टोबर महिन्याच्या सुरुवातीस त्याच्या पहिल्या अकरा दिवसांनंतर, पुन्हा दुसरे उत्सव सुरू होतात. या काळात प्रत्येकजण आपापल्या आवडीनुसार नवे, भरजरी सुंदर कपडे घालतो. सर्व सेनाधिकारी आपापल्या सैनिकांना नवीन, रंगीबेरंगी वस्त्रे देतात. ही वस्त्रे, प्रत्येकाला त्याच्या आवडीचा रंग व शिलाई यानुसार मिळतात. याच दिवशी ते राजाला मोठमोठ्या भेटी देतात. असे म्हणतात, की या दिवशी राजाला ते पंधरा लक्ष सुवर्ण *परदाओचा* नजराणा देतात. एक *परदाओ* म्हणजे तीनशेसाठ *रेइश* होतात.. या हिशोबाने एकूण किती *रेइश* होतात हे काढता येईल. त्यांचे नववर्षही याच दिवशी सुरू होते हे सांगावयास पाहिजे. नववर्षाचा सण साजरा करून ते परस्परांना भेटी देतात. याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही, कारण आपल्याकडील नववर्षालाही ही प्रथा पाळली जाते. या महिन्याच्या

पौर्णिमेपासून त्यांचे नववर्ष सुरू होते आणि ते महिनेही या चांद्रमासानुसार[४६] मोजतात.

आणखी सांगायचे म्हणजे वर्षापासून इथे एक प्रथा पाळली गेली आहे. या प्रथेनुसार गादीवर आलेल्या सर्व राजांनी एक खजिना निराळा सांभाळून ठेवलेला आहे. राजा मरण पावताच या खजिन्याला सीलबंद करून ठेवण्यात येते ज्यायोगे तो इतरांना पाहता येत नाही. नंतर गादीवर आलेले राजेसुध्दा हा खजिना उघडत नाहीत किंवा उघडता येत नाहीत किंवा त्यात काय आहे हे जाणून घेण्याचा प्रयत्न करीत नाहीत. आत्यंतिक अडीअडचणी खेरीज हा खजिना कधी उघडला जात नाही. अशारीतीने अडचण भासल्यास राज्याची गरज या खजिन्यातून भागवली जाऊ शकते. हल्लीच्या राजाने आपला खजिना अगोदरच्या राजांपेक्षा निराळ्यारीतीने सांभाळला आहे. तो दरवर्षी त्यात एक कोटी *परओची* भर घालतो आणि त्यातील एकही *परदाओ* आपल्या घरगुती खर्चासाठी घेत नाही. त्याच्या अंत:पुरात दासी-सेविका मिळून बारा हजार स्त्रिया आहेत हे मी अगोदर सांगितलेच आहे. या अंत:पुराचा आणि शिवाय त्याचा स्वत:चा खर्च वजा जाता बाकी तो शिल्लक ठेवतो. या सर्वांवरून राज्याचे एकूण वैभव आणि राजाने जमा केलेला खजिना यांची कल्पना तुम्हाला येईल.

आता *परदाओ* म्हणजे काय हे कोणाला माहीत नसेल तर सांगतो. *परदाओ* म्हणजे सोन्याचे गोल नाणे असते. हिंदुस्थानात हे राज्य सोडून इतरत्र कोठेही ते नाही. त्याच्या एका बाजूवर दोन आकृती उठवलेल्या असतात तर दुसऱ्या बाजूवर ते नाणे काढणाऱ्या राजाचे नाव असते. या राजाने काढलेल्या नाण्यांवर एकच आकृती असते. हे नाणे सर्व हिंदुस्तानात चालते. अगोदर सांगितल्याप्रमाणे, एक *परदाओ* म्हणजे तीनशेसाठ *रेइश* होतात.

सर्व उत्सव संपताच राजा नवीन शहरास रवाना होतो. हे शहर त्याने स्वत: बसविल्यामुळे तेथे वास्तव्य करणे त्याला विशेष आवडते याचा मी मागेच उल्लेख केलेला आहे. राजाने हे शहर दोन वर्षांत वसवले. सर्व नागरिकांनी राजाचे समारंभपूर्वक स्वागत केले, रस्तोरस्ती भरजरी पताका लावण्यात आल्या होत्या. तसेच अनेक विजयकमानी उभारण्यात आल्या होत्या. या शहरात राजाने आपल्या खाशा पलटणींची पाहणी केली आणि नववर्ष दिनानिमित्त सर्वांना तनखा वाटला. सालिना तनखा देण्याचा इथे प्रघात आहे. राजवाड्यातील अधिकारीवर्ग तपासणीचे काम करून प्रत्येकांचे नाव व त्याच्या चेहऱ्यावरील किंवा अंगावरील खाणाखुणा यांची नोंद करतो. ही माणसे संरक्षक दलाची

४६. हे दिवाळीचे वर्णन आहे. नवीन वर्ष दिवाळसणास सुरू होते. आजही जुन्या म्हैसूर राज्यात दिवाळी नसली तरी दसरा मात्र थाटाने साजरा होतो. पाइशने दसरा व दिवाळी या दोन्ही सणांचे बोलके वर्णन केले आहे.

असून, त्यांचा तनखा एक हजार *परदाओ* असतो. काही जणांचा आठशे, काहींचा सहाशे तर काहीचा त्यापेक्षा कमी-जास्त *परदाओ* असा असतो. पगारीप्रमाणेच दर्जातही फरक असतो. वरचा दर्जा असणारे दोन किंवा तीन घोडे बाळगतात. इतरांना मात्र फक्त एकच घोडा असतो. या दलांचे अधिकारी असतात आणि यापैकी प्रत्येक अधिकारी दर्जा आणि प्रथा याप्रमाणे आपल्या संरक्षक दलास [illegible] देण्यासाठी राजवाड्यावर जातो. राजाच्या या संरक्षक दलात पाचशे घोडेस्वार असून, हत्यारबंद असे ते, राजवाड्याबाहेर पहारा देतात. राजवाड्याच्या आतदेखील दोन ठिकाणी ढाल तलवार घेतलेल्या सैनिकांचा पहारा असतो.

अशा रीतीने राजा नवीन शहरात येता झाल्यावर क्रिस्तोव्हांव द फिगैरेदुने त्याला विनंती केली की, ''बिसनागचा राजप्रसाद पाहण्याची परवानगी त्याला सरकारांनी दयाळूपणे द्यावी. याचे कारण म्हणजे बिसनाग न पाहिलेले अनेक पोर्तुगीज त्यांच्या समवेत आले होते. बिसनाग पाहिल्यानंतर त्या सर्वांना आनंद होईल आणि ईश्वरकृपेने ते जेव्हा आपल्या मायभूमीस परततील तेव्हा इतरांना सांगण्यासारखे काही तरी त्यांच्याजवळ असेल''. राजाने ही विनंती मान्य करून राजप्रसादाचा काही भाग त्यांना दाखवण्यात यावा, अशी आज्ञा केली. कारण अंतःपुरात कोणास प्रवेश नसतो. तेव्हा आम्ही बिसनागला येताच नगर प्रमुख गंदराजो याने आम्हाला ती वास्तू दाखवली. हा गंदराजो [४७] साळुवतिम्माचा भाऊ आहे.

उत्सवासाठी आलेल्या राण्यांच्या तैनातीत असणाऱ्या स्त्रिया ज्या प्रवेशद्वाराने परत जातात त्याचा उल्लेख मी अगोदर केलेलाच आहे. याच प्रवेशद्वारातून आम्ही आत गेलो. त्याच्या समोरच्या बाजूस अजून एक तसेच प्रवेशद्वार आहे. इथे आम्हाला त्यांनी शांतपणे उभे राहण्यास सांगितले आणि आम्ही सर्व किती आहोत ते मोजले. मोजत असतानाच क्रमाक्रमाने त्यांनी एकेकाला नितळ गिलाव्याची फरशी आणि चोहोबाजूस शुभ्र भिंती असलेल्या आतील एका चौकात सोडले. चौकाच्या टोकाशी आम्ही आलो त्या दरवाज्याच्या समोरील बाजूस डावीकडे एक दरवाजा आहे. दुसराही एक दरवाजा होता, जो बंद होता. समोरील दार हे राजाच्या निवासस्थानाचे आहे. या दरवाज्याबाहेर दोन्ही बाजूस जिवंत वाटाव्यात अशा दोन रंगवलेल्या मूर्ती आहेत. उजव्या हाताची मूर्ती राजाच्या समोरील वडिलांची असून, डावीकडील मूर्ती खुद्द राजाची आहे. वडिलांची मूर्ती म्हणजे मुलापेक्षा सुरेख बांधा असलेल्या, सावळ्या सुसंस्कृत अशा व्यक्तीची वाटत होती. दोन्ही मूर्तींवर ते प्रत्यक्ष वापरीत किंवा वापरतात ते पोषाख चढवलेले आहेत. नंतर या दरवाजातून प्रवेश देण्याअगोदर पुन्हा आमची संख्या मोजण्यात आली. त्यानंतर आम्ही एका लहान निवासात प्रवेश केला. त्याचे वर्णन मी आता करतो.

---

४७. हा गंदराजो म्हणजे साळुवतिम्माचा भाऊ गोविंदराज असला पाहिजे.

या निवासात प्रवेश करताच डाव्या बाजूस एकावर एक अशी दोन दालने आहेत ती येणेप्रमाणे : खालचे दालन जमिनीच्या पातळीपेक्षाही खाली आहे. त्याला सोन्याला मुलामा दिलेल्या तांब्याच्या दोन लहान पायऱ्या आहेत. येथून ते थेट वर छतापर्यन्त आतून सोन्याचा पत्रा जोडलेला आहे (नुसता सोन्याचा मुलामा नव्हे) याचा बाहेरील भाग घुमटाकृती[४८] आहे. या निवासस्थानाला चार बाजू असलेली मंडपी असून, ती विणलेल्या वेताची आहे. त्यावर माणिक, हिरे, मोती इत्यादींचे रत्नखचित वा नक्षीकाम केलेले आहे. तिच्यावर दोन सोन्याचे गोल टांगलेले आहेत. या सुवर्णगोलांवरील जडावाचे काम बदामी आकाराचे आहे. त्याच्यामध्ये बारीक मोत्यांचे षट्‌टविणीचे जाळीदार नक्षीकाम केलेले आहे. घुमटावरदेखील असेच गोल आहेत. या दालनात एक पलंग होता. त्याच्या पायावरील नक्षीकाम मंडपीसारखे होते. पलंगाच्या उभ्या-आडव्या दांड्या सोनेरी होत्या आणि त्यावर काळ्या मखमलीची गादी होती. त्यांच्या चोहोबाजूस वीतभर रुंदीचा कठडा असून, त्या कठड्याला मोती लावलेले होते. पलंगावर दोन तक्के असून, इतर कोणतेही आच्छादन नव्हते. वरच्या दालनात काय होते हे मी सांगू शकणार नाही. कारण मी ते पाहिले नाही. मी फक्त उजवीकडील खालचे दालन पाहिले. या प्रासादात कोरीव पाषाणाचे स्तंभ असलेले एक दालन आहे. वरपासून खालपर्यन्त, भिंतीसहित हे दालन हस्तिदंताचे बनवलेले आहे. वरच्या तुळयांना आधार देणाऱ्या खांबावर गुलाब व कमलपुष्पांचे हस्तिदंती काम केलेले आहे. त्याची कारागिरी इतकी चांगली आहे, की असे काम इतरत्र आढळणे कठीण, याच बाजूस या राज्यात येणाऱ्या सर्व लोकांच्या, अगदी आम्हा पोर्तुगीजांपर्यन्त - आयुष्याची घाटणी दाखवणाऱ्या तसबिरी रंगवलेल्या आहेत. अंतःपुरातील राण्यांना यामुळे बाहेरील देशातील रितीरिवाजाची माहिती होते. अंध व भिकारी यांच्यासुध्दा तसबिरी आहेत. इथे दोन सोन्याची सिंहासने असून, पडदे असलेला चांदीचा पलंग आहे. या ठिकाणी मला एक हिरव्या गारेच्या दगडाचा लहानसा तुकडा दिसला. याला फार महत्वाचा समजतात. या पाट्याजवळ म्हणजे राजवाड्याचे प्रवेशद्वार असणाऱ्या कमानीखाली एक कुलूप लावलेला लहान दरवाजा होता. या ठिकाणी आत पूर्वीच्या एका राजाचा खजिना आहे असे आम्हाला सांगण्यात आले.

येथून निघताच आम्ही एका चौकात आलो. प्राण्याच्या झुंजीचा आखाडा असतो. एवढा मोठा हा चौक होता. चौकाचा गिलावा उत्तम असून, मध्यभागी काही लाकडी खांब होते. त्यांच्यावर एक तुळई आडवी टाकलेली असून, ती सोनेरी मुलामा दिलेल्या तांब्याच्या पत्राने मढवलेली होती. तुळईच्या मध्यभागी एकमेकांत कडी अडकवलेल्या

---

४८. पाइश ज्याचे वर्णन इथे करतो आहे तो पद्ममहाल असावा, असे वाटते. हंपीच्या अवशेषात एकावर एक दालने असलेली आणि बऱ्या अवस्थेत असलेली एकच वास्तू आहे. पाइशचे वर्णन थोड्या फार प्रमाणात वास्तूस लागू पडते.

चांदीच्या चार शृंखला होत्या. हा राण्यांचा झोपाळा होय, चौकाच्या तोंडाशी उजव्या अंगास असणाऱ्या चार-पाच पायऱ्या चढून आम्ही वर गेलो तेव्हा आधी वर्णन केला आहे तसाच दुसरा एक महाल होता. इकडच्या इतर घरांप्रमाणे ही इमारतही एकमजली होती. ही घरे माळवदाची असून, वर मजला असला तरी गच्ची असते. घरांची योजना चांगली असते. या ठिकाणी दगडी खांबावर उभा असणारा एक मंडप आहे. याचे छतही दगडी आहे. बाकी सर्व काम लाकडी असून, साऱ्या खांबांना[४९] सोन्याचा मुलामा दिलेला आहे.

या इमारतीच्या तोंडाशी मध्यभागी चार खांबांवर तोलून धरलेली मंडपी आहे. तिच्यावर नृत्य करणाऱ्या स्त्रियांची बरीच चित्रे काढलेली आहेत. इतर लहान लहान आकृती दगडात कोरलेल्या असून, या सर्वांना सोन्याचा मुलामा दिलेला आहे. या शिल्पात उठावदार अशी पर्ण सजावट कोरलेली आहे. पानांच्या खालील बाजूस एक प्रकारचा लाल रंग दिलेला आहे. हा भाग देवळाचा आणि देवमूर्तीसाठी असल्याने त्याचा इतर दुसरा उपयोग करीत नाहीत. मंडपाच्या टोकाशी असलेला दरवाजा बंद असून, येथे देवमूर्ती ठेवलेली होती. उत्सव असेल तेव्हा मूर्ती बाहेर काढून, सोनेरी सिंहासनावर बसवून उत्सवासाठीच असलेल्या मंडपीखाली आणतात. नंतर ब्राह्मणमंडळी येऊन तिची पूजाअर्चा करतात. तसेच कलावंतिणीही नाच करण्यासाठी येतात.

या वास्तूतून खाली उतरून चौकाच्या डाव्या अंगाने पुढे जाताच आम्ही एका बोळात आलो. हा बोळ चौकास समांतर लांबीचा असून, तिथे काही गोष्टी दिसल्या. बोळात जाताच चांदीच्या साखळ्यांनी वर टांगलेला एक झोपाळा आम्हास दिसला. झोपाळ्याचे पाय सोनेरी दांड्यांचे होते. त्यांची कारागिरी अप्रतिम होती. त्याच्या उभ्या-आडव्या दांड्याही सोन्याच्या होत्या, या झोपाळ्यासमोर एक खोली होती. तिथेही असाच चांदीच्या साखळ्यांनी वर टांगलेला दुसरा एक झोपाळा होता. याचेही पाय सोन्याचे होते. पण त्यावर रत्नांचे जडाव काम केलेले होते. त्याच्यादेखील उभ्या-आडव्या दांड्या

---

४९. या ठिकाणच्या मूळ शब्दाचे (Paces) भाषांतर 'ठिकाणे' असेही होऊ शकते. वस्तुःत खरा राजमहाल किंवा अंत.पूर ही दोन्हीही या मंडळींना दाखवण्यात आली नव्हती. जिथे राजा आपल्या राण्यांना भेट देई आणि इतर स्त्रियांना वावर असे अशीच फक्त काही महत्वाची ठिकाणे दाखण्यात आली होती. अनेक खांब असलेले सभागृह विठ्ठल मंदिरातील १०० खांबाच्या सभागृहासारखे असावे. एकंदरीत पाहता हे वर्णन एखाद्या मंदिराचे - बहुतेक करून - विठ्ठल मंदिराचे असावे असे वाटते. पाइशने विठ्ठल मंदिराला भेट दिली तेव्हा स्वरकंपने निर्माण करणाऱ्या अर्धस्तंभांचा सुंदर महामंडप अद्याप बांधण्यात आला नव्हता, हे लक्षात घ्यावयास पाहिजे. देवळास जोडून हा मंडप १५४१ नंतर बांधण्यत आला. मंडपाच्या उत्तरेकडील जिन्यावर असलेल्या शिलालेखावर शके १४८३ प्लव संवत्सरे असा उल्लेख आहे यावरून हे सिध्द होते. या कालोल्लेखाचा इतर तपशील मात्र उपलब्ध नाही.

सोन्याच्या होत्या. या खोलीच्यावर अजून एक लहानशी कोठडी होती. तिच्यात काही ठेवलेले नव्हते, मात्र तिला सोनेरी मुलाम्याने मढवून रंगकाम केलेले होते. या कोठडीपलीकडे, बोळाच्या समोरील बाजूस राजाने खास बांधवून घेतलेले एक दालन आहे. त्याच्या बाहेरील बाजूस हाती धनुष्यबाण घेतलेल्या वीरस्त्रियांचे पुतळे होते. हे दालन रंगवण्याचे काम सुरू झालेले होते. ते इतर दालनांपेक्षा अधिक चांगले होणार आणि भिंती, फरशी यासकट ते सोन्याने मढवले जाणार असे आम्हास सांगण्यात आले. हा बोळ ओलांडून वरच्या एका बोळात पायऱ्या चढून जाताच आम्हाला सोन्याची तीन मोठी पातेली दिसली. ती एवढी मोठी होती, की त्या एकेकात अर्धी गाय शिजवता येईल. याखेरीज चांदीची अशीच पातेली, त्याप्रमाणे सोन्याची इतरही लहान-मोठी भांडी होती. त्यानंतर एका लहानसा जिना चढून दरवाजाने एका इमारतीत आलो. ही इमारत अशी होती : हा मंडप[५०] म्हणजे राजा पाठवी त्या स्त्रियांची नृत्यशाळा होती. ते रुंदीला फारसे नसले तरी लांबीला बरेच आहे. त्याचे सर्व खांब दगडी असून, भिंतीपासून ते हातभर अंतरावर आहेत. दोन खांबांमधील अंतर दीड हात किंवा त्यापेक्षा काहीसे जास्त असावे असे हे खांब[५१] मंडपाभोवती सर्वत्र आहेत. ते अर्धस्तंभ (?) असून, त्याला सोन्याने मढवलेले[५२] कोनाडे (?) आहेत. आधार देणाऱ्या खांबाच्या वरच्या भागावर हत्ती आणि इतर वन्य पशूंच्या विविध आकृत्या कोरलेल्या आहेत. हे काम खुल्या भागावर केले असल्याने आतील भागही दिसतो. आतील भागात वन्यपशूंच्या आकृत्या विवक्षित ठिकाणी कोरून काढलेल्या आहेत. पाठीला पाठ लावलेल्या माणसांच्या आणि इतर विविध प्रकारच्या पशूंच्याही आकृत्या आहेत. दोन खांबांमध्ये आडवा दांडा टाकलेला असून, त्याच्या सपाट पृष्ठभागावर हातभर उंचीच्या वृद्ध पुरुषांच्या मूर्ती कोरलेल्या असून, त्यांना मुलामा दिलेला आहे. प्रत्येक दोन स्तंभामध्ये अशा प्रकारचे

---

५०. हे वर्णन १०० स्तंभांच्या दालनाचे असावे असे वाटते. हा मंडप इ. स. १५१६ (शके १४३८, धातु संवत्सर) मध्ये बांधण्यात आला. पाइश म्हणतो त्याप्रमाणे याचे खांब हातभर किंवा त्यापेक्षा जास्त अंतरावर आहेत. इतर कोणत्याही मंडपाच्या तुलनेने या मंडपातील प्रत्येक खांबावर जास्त नृत्यमुद्रा कोरलेल्या आहेत. लांबीच्या मानाने या मंडपाची रुंदी तितकी नाही. बाहेरून मात्र तो लांबसा वाटतो.

५१. आजसुध्दा या विठ्ठल मंदिराच्या प्राकाराभोवती खांब आणि अर्धस्तंभ दिसतात.

५२. येथून पाइशने सुरू केलेले वर्णन दुसऱ्या एखाद्या मंडपाचे असावे. विठ्ठल मंदिराच्या आग्नेयेकडील कोपऱ्यात तथाकथित कल्याण मंडपात आधारस्तंभाच्या वरच्या बाजूस स्वार आरूढ असलेला सिंह, याली इत्यादी वन्यपशूंच्या आकृती पाषाणात कोरल्या आहेत. हा मंडप उघडा आहे आणि पाइश ज्याला घुमट म्हणतो ते मंडपाचे सुरेख कोरलेले छत असावे. छताला उथळ असा घुमटाकार असून, चार पोपटांच्या चोचीच्या आधाराने टांगणारे उलटे कमळ आहे. हे शिल्प अतिशय सुंदर आहे. मंडपाच्या काही स्तंभांवर आणि शिल्पावर केलेले चित्रकाम आजही दिसून येते.

कोरीव काम केलेला, एखाद्या पटासारखा असणारा पृष्ठभाग आहे. असे कोरीव काम साऱ्या सभागृहात दिसून येते. स्तंभावरील मूर्ती आणि इतर आकृती लहान-मोठ्या आकाराच्या असून, खांबापासून ते वर छतापर्यन्त जात ते शिल्पकाम वीतभर कमीकमी होत घुमटाशी निमूळते होत जाते. घुमटाचे शिल्पकाम अतिशय सुंदर आहे. मूर्ती आणि स्तंभ यांच्यामध्ये पर्णांची नक्षी असून, त्यात पानांच्या पाठीमागे लाल, निळ्या रंगाचे काम केलेले आहे. खांबावरील आकृती हरिण इत्यादी प्राण्यांच्या आहेत. त्यांच्या चेहऱ्यावरील आरक्त वर्ण दिसावा असे त्यांच्यावरील रंगकाम आहे. स्तंभाच्या वरच्या पृष्ठभागावरील तसेच इतरत्र असणाऱ्या गजारूढ मूर्ती या हाती लहान लहान मृदंग असणाऱ्या नर्तिकांच्या आहेत.

या शिल्पपटांमध्ये[५३] नृत्यप्रतिमा अशा प्रकारे दाखवलेल्या आहेत, की प्रत्येक ठिकाणी नृत्याच्या अखेरीस येणारी जी मुद्रा असते ती आहे. हेतू असा, की नृत्य शिकणाऱ्या स्त्रियांना नृत्य संपवताना कोणती मुद्रा घ्यावी हे लक्षात नसेल तर या नृत्यशिल्पाकडे पाहून त्यांना ते लक्षात यावे. यामुळे काय करावयाचे हे त्यांच्या स्मरणात राहते.

या दालनाच्या टोकाला डाव्या बाजूस एक रंगवलेला विश्रांती कक्ष आहे. येथे नृत्य शिकणाऱ्या आपले पाय आणि सर्वांग मोकळे करतात. नृत्याला सुरेखपणा यावा म्हणून शरीर चपल करण्याचे शिक्षण इथे त्यांना दिले जाते. दालनाच्या दुसऱ्या टोकाला नृत्य पाहण्यासाठी राजा बसतो ती जागा आहे. तेथील जमीन व भिती सोन्याने मढवलेल्या आहेत. भितीच्या मध्यभागी बारा वर्षांच्या मुलीची सुवर्णप्रतिमा आहे. नृत्याच्या अखेरीस घेतलेल्या पवित्र्यात उंचावतात तसे तिने हात उंचावलेले आहेत.

यापेक्षा जास्त काही आम्हाला दाखवण्यात आले नाही. अंतःपुरात हिजड्यांखेरीज इतरांना प्रवेश नसतो. त्यांचे वर्णन मी अगोदर केलेलेच आहे. येथून आम्ही आलो होतो. त्याच मार्गाने दुसऱ्या प्रवेशदाराशी परतलो. तिथे पुन्हा आम्हा सर्वांची गणती करण्यात आली.

या बिसनाग शहरातील घरांची संख्या एक लाख आहे, असे म्हणतात. ती बहुतेक एकमजली आणि माळवदाची आहेत. प्रत्येक घराभोवती लहानशी भिंत बांधलेली असते. राजाचे वास्तव्य बहुतेक करून या शहरात असते. शहराच्या उत्तरेस खडकाळ

---

५३. इथे पुन्हा १०० खांबांच्या मंडपातील नृत्यशिल्पांची आठवण होते. या मंडपात केवळ शिव, गणेश यांच्याच नव्हे, तर इतर नरसिंहासारख्या देवांच्याही नृत्यमुद्रा आहेत. एका शिल्पातील नर्तिका आंदळ म्हणून ओळखता येते.

पहाडी आहे. त्यातून नदी वाहते. शहराचा तट[५४] थेट पहाडींपर्यन्त वर पोहोचला आहे. पलीकडच्या बाजूस 'नागंदियम' शहर आहे. त्याला फक्त तीनशे वेशी आहेत. एक नदीच्या बाजूची असून, तेथून टोकऱ्याच्या आकाराच्या नावातून लोक नदी पार करतात. उत्तरेकडील बाजूची दुसरी वेस जास्त मजबूत आहे. तिसरे लहानसे प्रवेशद्वार वायव्येकडे दोन उंच पहाड्यांमध्ये आहे. तिकडील वाट इतकी बिकट आहे की एका वेळेला फक्त एकच स्वार जाऊ शकतो.

बिनसागच्या वायव्येस लागूनच कृष्णापूर[५५] शहर आहे. या लोकांची जवळपास सर्व मंदिरे या शहरात असून, तिथे नित्यनेमाने पूजाअर्चा चालू असते. शहराच्या उत्पन्नाचा सर्व भाग मंदिराच्या खर्चासाठी बांधून दिलेला आहे. हे उत्पन्न एक लाख सुवर्ण परदाओ आहे असे सांगतात. मंदिरे उंच बांधलेली असून, त्यांवर असणाऱ्या सर्व स्त्री-पुरुषांच्या आकृती म्हणजे मिथुनशिल्प आहे.

दक्षिणेकडे सपाट प्रदेशात नागलपूर[५६] गाव वसलेले आहे. या ठिकाणी आदिलशहाने बिसनागला वेढा घातला होता. तेव्हा त्याच्या फौजेचा तळ पडला होता. त्याने ते बेचिराख करून टाकले होते. पण पुन्हा ते बसवण्यात आले. बिसनागपासून ते सुमारे कोसभर अंतरावर आहे.

पूर्वेकडे अर्देगेमा नावाचे शहर आहे. हे नाव राजाच्या पट्टराणीच्या नावावरून देण्यात आले. नवीन असलेले हे शहर राजाने आपल्या राणीच्या प्रेमाखातर वसवले.

---

५४. आजसुध्दा पहाड्यांवर असणारा हा तट दिसून येतो. इथे उल्लेखलेली नदी तुंगभद्रा असून, 'नागंदियम्' म्हणजे अनेगोंदी होय. नदीजवळील वेस आजही अस्तित्वात आहे. अनेगोंदीला जावयाचे असेल तर विठ्ठल मंदिराजवळील तलारिघट्ट या ठिकाणाहून, पाइशने अगोदर वर्णन केले आहे त्या गोलाकार नावेतून जावे लागते. या नावांचा - कळ्यांचा वापर आजही होतो.

५५. हंपी शहरात कृष्णमंदिर आहे त्या भागाचे नाव कृष्णापूर आहे.

५६. राजपुरोहित रंगनाथ दीक्षित याने १५१६ च्या सुमारास बांधलेल्या नागेनहळ्ळीचा हा उल्लेख आहे. रंगनाथ दीक्षिताने या ठिकाणी नागशयन (विष्णू) आणि नगेंद्र (शिव) यांची मंदिरे बांधली. तसेच नागसमुद्र नावाचे तळेही खोदवून घेतले. राजमाता नागलदेवी हिच्या प्रीत्यर्थ त्याने गावाचे नाव नागलपूर असे ठेवले. कृष्णदेवरायाचा अंमल होतातोपर्यंत अदिलशहा नागलपूरपर्यन्त येऊ शकला नाही. नंतरच्या परिच्छेदात पाइशने पूर्वबाजूस असलेल्या अर्देगेमा गावाचा उल्लेख केलेला आहे. पाइश हंपीस आला तेव्हा अर्देगेमा अद्याप बांधण्यात आले नव्हते, तेव्हा नंतरच्या प्रसंगाचा हा उल्लेख म्हणजे नकलनवीसाने घातलेली भर असावी. अर्देगेमा म्हणजे वरदाजम होय. वरदाजम्मपट्टण हंपीच्या पूर्वेस आहे. आपली पट्टराणी वरदाजम्मा हिच्या प्रीत्यर्थ अच्युतरायाने हे नगर वसवले. इथे दोन सुंदर रघुनाथ मंदिरे आहेत: एक पेनुगोंदे वेशीजवळ असून, दुसऱ्याचा उल्लेख चुकीने

पट्टभिराम मंदिर असा करण्यात येतो. हस्तलिखितात असे दिसून येते, की नकलनवीसाने प्रथम नूनीशची संहिता लिहून काढली. आणि त्यानंतर पाइशची. प्रस्तावनेत म्हटले आहे त्याचप्रमाणे नूनीशची बखर लिहून काढल्यानंतर नकलवीस 'एक व्यक्ती सर्व काही सांगू शकत नाही ..... इ.' अशा अर्थाचे पत्र जोडतो. दुसरी संहिता याच पानावर सुरू होते. विजयनगरचा इतिहास, तिथे घडलेल्या घटनांची नकलनवीसाला चांगली माहिती होती. संहिता उतरवून घेत असताना अनवधानाने, कालानुक्रमाचा भंग करून त्याने या शेवटच्या तीन-चार ओळी मध्येच प्रक्षिप्त स्वरूपात घातल्या असल्या पाहिजेत.

# फेर्नाव नूनीश याची बखर

## (इ. स. सुमारे १५३५-३७ साली लिहिलेली)

## प्रकरण १ ले

*इ. स. १२३०[1] साली बिसनागच्या साम्राज्याचा नाश झाला तेव्हापासून तेथे राज्य करीत असलेल्या राजांच्या बखरीची नक्कल व सारांश*

इ. स. १२३०[2] साली हिदुस्थानच्या या भागावर आतापर्यन्त झालेल्या राजांपेक्षा श्रेष्ठतर अशा राजाचा अंमल होता. हा राजा म्हणजे दिल्लीचा सुलतान होय. याने आपल्या सैन्य व शस्त्रबळावर अनेक वर्षे खंबायतच्या राजाशी युध्द केले. त्याच्या गुजराथ प्रदेशाची धूळधाण करून तो घेतला आणि आपल्या राज्यास जोडून टाकला.

हा घेतलेला प्रदेश आणि संपादन केलेला विजय यावर त्याचे समाधान झाले नाही. त्याने पायदळ व अश्वदळ यांची मोठी फौज खडी केली आणि बिसनागच्या राजाशी युध्द

---

१. या ठिकाणी नूनीशला इ. स. १३०८ शी जुळणारा शके १२३० अभिप्रेत आहे, असे म्हणता येईल. १३१०-११ साली होयसळ घराण्याचा तिसरा बल्लाळ आणि दिल्लीचा राजा यांचे युध्द झाले. हे युध्द बारा वर्षे चालले असे नूनीश म्हणतो त्यामुळे शके १३२० किंवा इ. स. १३०८ असे धरल्यास ते चुकीचे ठरू नये. स्युअलने दुरुस्ती सुचवली आहे त्याप्रमाणे १३३० घेतल्यास कोरीव लेखात उल्लेखलेल्या घटनांशी ते साल जुळत नाही. नूनीशला माहिती देणाऱ्याने त्याला परिचित असणारा १२३० शक सांगितला असला पाहिजे. पण नूनीशला बहुधा भारतीय आणि खिस्ती कालगणनेतील फरक माहीत नसल्याने त्याने ऐकलेली माहिती इथे जशीच्या तशी दिली आहे.

२. नूनीश या ठिकाणी तुघलक राजांच्या स्वाऱ्या आणि त्यांनी दक्षिणेतील काही गावांचा केलेला विध्वंस याचा उल्लेख करीत आहे.

करण्याचे ठरवले. त्याला बरेच शत्रू होते. त्यांच्या मुकाबल्यासाठी त्याने आपल्या सेनाधिकाऱ्यांना किल्ल्यांचा ताबा देऊन मागे ठेवले. हे शत्रू म्हणजे त्यावेळी ज्यांच्याशी त्याचे युध्द चालू होते ते बंगाल तसेच शेख इस्माईलच्या राज्यांच्या सरहद्दीवरील तुर्कमान हे होते. हे तुर्कमान लोक रंगाने गोरे असून, अंगाने धिप्पाड आहेत. त्यांच्या देशात घोडे पुष्कळ असतात. याच घोडयांचा वापर दिल्लीच्या राजाने खंबायतशी युध्द करताना करून तो मुलुख उद्ध्वस्त करून टाकला. युध्द करून हे राज्य काबीज केल्यावरही त्याच्याजवळ आठ लक्ष घोडेस्वार शिल्लक होते. या घोडदळानिशी तो बिसनागवर चालून गेला. पायदळाची संख्या इथे देत नाही कारण त्याची गणती करणेच शक्य नव्हते.

बिसनागच्या राजाला जिकून त्याला आपला मांडलिक करण्याच्या हेतूने आपल्या नुकत्याच जिंकलेल्या प्रदेशातून तो बिसनागच्या राज्यात [३] शिरला. बिसनाग राज्याचा प्रदेश त्यावेळी विस्तीर्ण होता. खंबायतचे राज्य सोडून त्याने बालाघाटवर स्वारी केली. बालाघाटचा हा प्रदेश आता आदिलशहाच्या ताब्यात आहे. या स्वारीत त्याने बरीच ठाणी आणि गावे उद्ध्वस्त करून आपल्या ताब्यात घेतली. तिथल्या लोकांनी शरणागती पत्करून आपली संपत्ती आणि जीवित त्यांच्या हवाली केले. त्यांची शस्त्रे मात्र त्याला त्यांच्याकडून काढून घेता आली नाहीत.

बालाघाटचा प्रदेश आपल्या आधिपत्याखाली घेऊन दिल्लीच्या राजाने मग टोकऱ्याच्या आकाराच्या नावांतून दूरी नदी ओलांडली. मार्गात त्याला काहीही प्रतिकार झाला नाही. ही नदी बालाघाटचा प्रदेश [४] आणि बिसनागचे राज्य या दोहोमधील सीमा आहे. या वेळेपर्यन्त बिसनागच्या राज्यात 'नागुंदिम' शहर सोडल्यास इतरत्र लोकवस्ती नव्हती. राजा त्यावेळी 'नागुंदिम' मध्ये होता. जणू आपल्या सर्वनाशाचीच तो वाट पाहत होता. 'नागुंदिम' मध्ये राजा असण्याचे कारण म्हणजे हे शहर मजबूत होते आणि दुसरा किल्ला राज्यात कोठेही नव्हता. 'नागुंदिम' म्हणजे जणू त्याचे लिस्बन होते.

दिल्लीच्या शहाने टोकऱ्याच्या आकाराच्या नावांमधून जी नदी ओलांडली ती आणि शहर यातील अंतर पंचवीस कोसांचे होते. मधला सगळा भाग सपाट प्रदेशाचा होता. पेनोजेला पिण्यासाठी पाणी असल्यामुळे नदीकाठच्या प्रदेशाचा हा मैदानी भाग तळ देण्यासाठी राजाला योग्य वाटला. त्यावेळी उन्हाळा असल्यामुळे पाण्याचे दुर्भिक्ष्य होते. मैदानी भागात जी काही थोडीशी छोटी छोटी तळी होती त्यांचे पाणी त्याच्या बरोबरच्या

---

३. विजयनगरची स्थापना होण्याअगोदरच्या राजकीय स्थितीचा नूनश इथे उल्लेख करतो आहे. होयसळ घराण्यातील तिसरा बल्लाळ हा त्यावेळी जवळपास संपूर्ण दक्षिण भारताचा अधिपती होता. नूनीश ज्याला बिसनाग म्हणतो ते होयसळ साम्राज्य होय.

४. कृष्णा नदी ते कर्नाटकच्या दक्षिण टोकापर्यन्त पसरलेला वरचा प्रदेश.

पलटणी, घोडे, हत्ती यांना दहा दिवसांच्यावर पुरण्यासारखे नव्हते. या कारणासाठी नदीकाठी त्याने काही दिवस मुक्काम केला. नंतर पाऊस पडून एकदा शेते, तळी भरली, की बरोबरच्या प्रचंड फौजेसाठी लागणारे पाणी पुरेसे मिळणार होते.

योग्य वेळ येताच दिल्लीच्या राजाने आपला तळ हलवला आणि नागुंदिम शहरासमोर फौज खडी केली.

दिल्लीच्या राजाने आणलेली प्रचंड फौज आणि त्याचे सामर्थ्य पाहून बिसनागच्या राजाने शहर सोडून जाण्याचे ठरवले. या शहरात प्रवेश दुर्गम होता. शहरालगतच नागुंदी नावाची नदी होती आणि आजही आहे. तिच्यावरूनच शहराचे 'नागुंदिम' हे नाव पडले असे सांगतात. बिसनागचा राजा 'किनमटा'[६] नावाच्या किल्ल्यात पळून गेला. हा किल्ला नदीकाठी असून, त्यात पाणी आणि रसदपुरवठा बराच असला तरी त्याच्याबरोबर असलेल्या पन्नास हजार माणसांना पुरण्याइतका नव्हता. त्यामुळे राजाने आपली निवडक पाच हजार माणसे त्यांच्या पैसा-अडक्यासहित बरोबर घेऊन किल्ल्यात आश्रय घेतला. इतर उरलेल्या लोकांना त्याने राज्यातील आपल्या दुसऱ्या एका किल्ल्यात जाण्यास सांगितले.

सामानसुमानासहित राजाने याप्रमाणे किल्ल्यात आश्रय घेताच दिल्लीच्या राजाने त्याला चोहोबाजूंनी वेढा दिला. या दिल्लीच्या सुलतानाचे आणि राजाचे बारा वर्षांपासून युध्द चालू होते. हा वेढा संपण्यास फारसा वेळ लागला नाही. कारण किल्ल्याच्या आतील लोकांची संख्या बरीच होती आणि त्यामुळे त्यांची रसद लवकरच संपली.

किल्ल्याच्या आतील लोकांचा नाश केल्याशिवाय वेढा उठवावयाचा नाही हा दिल्लीच्या फौजेचा निश्चय पाहून बिसनागच्या राजाने आपल्या सर्व लोकांसमोर भाषण दिले. या भाषणात त्याने दिल्लीच्या राज्याने आपल्या राज्यात केलेल्या विध्वसांचे वर्णन केले. इतकेच नव्हे, तर या विध्वंसाने पुरते समाधान न होऊन त्याने किल्ल्यास वेढा कसा घातला आहे याचेही त्याने वर्णन केले. शिवाय किल्ल्यातील पाण्याचा आणि अन्नधान्याचा पुरवठाही संपला होता. अशा परिस्थितीत मरणाखेरीज दुसरा मार्ग नाही हे

---

५. नागुंदी किंवा अनेगोंदी हे कुमटाच्या राज्याच्या ताब्यात होते. अनेगोंदी हे नाव कसे पडले हे आपणास माहीत नसले तरी या नावाचा आणि नदीचा जिला आज तुंगभद्रा म्हणतात काहींही संबंध नाही हे निश्चित. रामायणात या नदीचा पंपासरस असा उल्लेख आहे.

दिल्लीच्या सुलतानाने अनेगोंदीवर हल्ला करताच अनेगोंदीच्या राजाने पळ काढून कुमटाच्या डोंगरी किल्ल्यात आश्रय घेतला. या किल्ल्याचाच नूनीश 'क्रिनमटा' असा उल्लेख करतो आहे.

त्याने आपल्या सैनिकांना सांगितले. ''नागुंदी शहरातील पन्नास हजारांपैकी तुम्हा पाच हजारांना मी निवडले आहे याचे कारण तुम्हीच खरे जिव्हाळ्याचे मित्र आहात, तेव्हा आतापर्यन्त जिवंतपणी जी स्वामिनिष्ठा दाखवली तीच आता या निकराच्या प्रसंगात दाखवा'' अशी कळकळीची विनंती त्याने आपल्या सैनिकांना केली. आपले सारे राज्य आणि सत्ता यापैकी हा किल्ला व त्यातील सैनिक एवढेच काय ते बाकी उरले असल्याने आज दिल्लीच्या राजाशी अटीतटीने लढावयाचे ठरवले आहे, असे त्याने सांगितले. तेव्हा आपली सर्व भूमी हिरावून घेणाऱ्या शत्रूचा सामना करण्यासाठी शस्त्रास्त्रांनी सिध्द प्राणार्पणाची तयारी ठेवण्याचे आवाहन राजाने त्यांना केले.

हे भाषण ऐकून सर्वांना समाधान वाटले आणि थोडयाच अवधीत त्यांनी शस्त्रास्त्रे हाती घेतली. ते सुसज्ज होताच राजाने पुन्हा एक भाषण केले. तो म्हणाला, ''आपण या युध्दात उडी घेण्यापूर्वी आपल्या बायका, मुले, मुली यांच्याशी आपली लढाई आहे. कारण ते शत्रूच्या हाती पडून शत्रूने त्यांचा वापर करावा हे उचित नव्हे. मी स्वतःच माझ्या बायका मुलांची प्रथम वाट लावतो.'' त्यावेळी ते सर्वजण किल्ल्यापुढे असलेल्या मोकळ्या चौकात उभे होते. तिथेच राजाने स्वतः आपल्या पन्नासच्या वर बायकांना तसेच मुलांना व काही लहान मुलीना आपल्या हाताने ठार केले. इतरांनीही आपल्या बायका आणि ज्यांना लढता येणार नाही अशी लहान मुले यांना याचप्रमाणे बळी दिले.

इतरांना निंद्य वाटतील असे हे विवाहविधी आटोपताच त्यांनी किल्ल्याचे दरवाजे उघडले. दरवाजे उघडताच शत्रू सैन्य ताबडतोब आत घुसले आणि त्याने सर्वांचे शिरकाण केले. यातून फक्त सहा वृध्द माणसे वाचली कारण त्यांनी एका घरात आश्रय घेतला होता. त्यांना पकडून दिल्लीच्या राजासमोर उभे करण्यात आले. ही सहा माणसे कोण आणि ती कशी वाचली याबद्दल राजाने चौकशी केली. ती कोण आहेत हे समजताच राजाला आनंद झाला कारण त्यांच्यापैकी एक राजाचा मंत्री होता, दुसरा खजिनदार होता आणि इतर उरलेले सर्व त्याचे प्रमुख अधिकारी होते. दिल्लीच्या राजाने त्यांना बिसनागच्या राजाच्या खजिन्याबद्दल विचारणा केली आणि मग किल्ल्याच्या तळघरात पुरुन ठेवलेला सर्व खजिना त्याच्या हवाली करण्यात आला. बिसनाग राज्याच्या त्यावेळच्या उत्पन्नाविषयीही त्यांनी माहिती पुरवली. सर्व माहिती काढून घेतल्यानंतर राजाने त्यांना एका सेनाधिकाऱ्यांच्या हवाली केले आणि दुसऱ्या एका सेनाधिकाऱ्याला प्रेते ताब्यात घेऊन ती जाळण्याचा हुकूम दिला. त्या सहा जणांनी विनंती केल्यावरून राजाचे शव सन्मानपूर्वक नागुंदी शहरास नेण्यात आले. त्या दिवसापासून राजघराण्याची स्मशानभूमी म्हणून नागुंदीचा वापर होऊ लागला. तिकडील लोक आजही या राजाची पुण्यात्मा म्हणून पूजा करतात.

# प्रकरण २

## *विजयनगरच्या राजाला ठार करून आणि त्याचे राज्य बळकावून दिल्लीच्या राजाने केलेली व्यवस्था*

दिल्लीच्या राजाने याप्रमाणे आपल्या आकांक्षा पूर्ण केल्या आणि नंतर ज्या गावांनी त्याच्या विरुध्द उठाव केला होता ती जमीनदोस्त करण्याचा हुकूम आपल्या सेनाधिकाऱ्यांना दिला. जे शरण आले त्यांना त्याने अभय दिले. (हिंदू) राजाच्या मृत्यूनंतर तो दोन वर्षे त्या किल्ल्यात राहिला. या अगोदर बारा वर्षे त्याचे या राज्याशी युध्द चालू होते. आपल्या वतनापासून तो फार म्हणजे पाचशे कोसांपेक्षा जास्त दूर होता. त्याची सर्व फौज विखुरलेली होती. इतक्यात त्याने पहिल्यांदा काबीज केलेल्या प्रांतात उठाव झाल्याची बातमी त्याला कळाली. हे समजताच त्याने आपल्या फौजेला बोलावून एकत्र केले. किल्ल्यामध्ये कुठलाही प्रसंग आला तरी संरक्षण व्हावे अशारीतीने अन्नधान्याची भरपूर बेगमी करून ठेवली आणि एनिबेकीमेली[१] नावाच्या एका मुसलमान सेनाधिकाऱ्याकडे राज्याचा ताबा दिला. एनिबेकीमेलीसाठी त्याने फौजेच्या तुकड्या मागे ठेवल्या आणि त्यातील प्रत्येकाला उदारपणाने इनाम जमिनी आणि भारी भेटवस्तू दिल्या. त्यायोगे सर्वांना समाधान झाले आणि आपल्या वतनाला परतण्याची आशा सोडून देऊन त्यांनी तिथेच घरे केली.

---

१. दिल्लीचा सुलतान दक्षिणेत असताना त्याने अगोदर जिंकलेल्या उत्तरेकडील राज्यात बंडाळी माजली. त्यामुळे राज्य सोडून घाईघाईने उत्तरेत जाणे त्याला भाग पडले. एनिबेकीमेली ऊर्फ मलिकनईब याच्या ताब्यात अनेगोंदी देण्यात आले.

# प्रकरण ३

## *दिल्लीचा राजा फौजेसह रवाना झाला आणि त्याने आपल्याबरोबर किल्ल्यात बंदिवान केलेल्या सहा जणांना बरोबर घेतले इ. विषयी*

मिळालेल्या खबरेनुसार दिल्लीचा राजा फौजेसह आपल्या राज्यात रवाना झाला. जाण्यापूर्वी बिसनागच्या राज्याचा कारभार मलिक नबाब याच्या हाती सोपवला. राजा निघून गेल्याची बातमी सर्वत्र पसरली. त्याबरोबर डोंगरात आश्रय घेऊन राहिलेले आणि भीतीपोटी, गावशहरांचे रक्षण व्हावे म्हणून इच्छेविरुध्द स्वामीभक्तीची शपथ घेऊन त्याचे ताबेदार झालेले लोक - या सर्वांनी मलिक नईबाविरुध्द बंड केले आणि त्याच्या किल्ल्यास वेढा घातला. त्यांच्यावर त्याने लादलेले कर देण्यासही त्यांनी नकार दिला. तसेच त्याचा रसदपुरवठाही बंद केला. या प्रदेशात राहून आपल्याला काही फायदा नाही, आपले कोणी ऐकत नाही आणि दिल्लीच्या राजाने पाठवलेली कुमक फार दूर राहिली आहे हे सर्व लक्षात घेऊन मलिकनईबने आपल्या विरुध्द सर्वत्र बंडाळी माजल्याची खबर तात्काळ राजास कळवली. प्रत्येक जण आपापल्या मनाप्रमाणे वागत असून, आपल्या बाजूस कोणीच नाही तेव्हा अशा परिस्थितीत काय करावे याचा योग्य तो निर्णय महाराजांनी घ्यावा अशा अर्थाचा निरोप त्याने राजास धाडला. ही खबर कळताच राजाने सर्वांना मलिकनईबच्या खलित्यातील मजकूर सांगून जमीनदार लोक, बिसनाग राज्याचा अधिकार असणाऱ्या नबाबाच्या आज्ञेत नाहीत, सत्ता हाती येताच प्रत्येक जण मन मानेल तसे स्वतःच राजा असल्याप्रमाणे वागतो, त्यामुळे त्यांच्यात न्याय आणि आज्ञापालन या गोष्टी उरलेल्या नाहीत इत्यादी सर्व माहिती देऊन त्यांच्याशी सल्लामसलत केली. त्याने त्यांना विचारले, की यातून असा कोणता मार्ग काढावा ज्यायोगे एवढे परिश्रम करून, पैसा व प्राण खर्च करून मिळवलेला हा संपन्न भूप्रदेश आपल्या हातून जाणार नाही ? हे ऐकताच सर्व सल्लागारांनी निर्णय घेतला, की राजाने बरोबर आणलेले जे सहा कैदी होते त्यांना ताबडतोब हजर करावे आणि त्यापैकी कोण बिसनागच्या राजाचा रक्तसंबंधी किंवा कोणत्याही प्रकारे नातेवाईक आहे याची विचारणा करावी. अशी चौकशी करण्यात आली तेव्हा राज्यप्राप्तीचा अधिकार असणारा

नात्यातील कोणीही आढळून आला नाही. फक्त एकजण होता तो बिसनागच्या राजाचा पराभव झाला तेव्हा त्याचा मंत्री होता. राजाशी त्याचा नातेसंबंध काहीही नव्हता पण तो त्याचा प्रमुख न्यायाधीश होता. हुजुरांनी राज्य याच्या हाती सोपवावे, असा सल्ला देण्यात आला. आणि या सल्ल्याने राजाला संतोष झाला.

ताबडतोब सहाही कैद्यांना मुक्त करण्यात आले आणि त्यांच्यावर बऱ्याच सन्मानांचा वर्षाव करण्यात आला. त्यांच्यातील जो दिवाण होता त्याला राजा आणि जो खजिनदार होता त्याला दिवाण करण्यात आले. मांडलिक म्हणून राहण्याच्या स्वामिनिष्ठेच्या शपथा त्यांच्याकडून घेण्यात आल्या. आणि ताबडतोब त्यांना त्यांच्या प्रदेशात पाठवण्यात आले. मार्गात त्यांना इजा पोहोचू नये म्हणून त्यांच्याबरोबर बराच फौजफाटा देण्यात आला. ही सहा माणसे जेव्हा नागुंदीस परतून आली तेव्हा त्यांना तिथे उद्ध्वस्त घराचे भग्नावशेष आणि कंगाल लोकांनी [१] वसती केलेली काही ठिकाणे आढळून आली.

लवकरच देवरायच्या (कारण या नावाने तो ओळखला जात होता.) आगमनाची बातमी सर्वत्र पसरली. परधर्मी राजाची गुलामगिरी सहन केलेल्यांना देवरायला राजपद मिळाल्याचे पाहून समाधान झाले. आतापर्यन्त गादीवर आलेले सर्व राजे या देवरायाच्या कुळातील आहेत. सर्वांनी त्याला थाटाच्या मेजवान्या दिल्या, पूर्वीच्या राजाने बळकावलेल्या जमिनी त्याला परत केल्या आणि राजा म्हणून त्याचे आज्ञापालन केले. मलिकनईबलाही [२] हे समजताच आनंद झाला. आपल्या राजाच्या आज्ञेनुसार किल्ला

---

१. दक्षिणेत होयसळ घराण्याच्या तिसऱ्या बल्लाळाचे राज्य होते. मोळाव्या शतकातील काही वाङ्मयात ज्याचा उल्लेख येतो. त्या प्रसिध्द कुमार रामाचा पिता असणाऱ्या कंपिलदेवाचा अंमल त्यावेळी कांपिली आणि कुम्मटा यावर होता. हरिहर आणि बुक्क हे दोघे भाऊ वरंगलच्या राजाच्या पदरी होते आणि यवनांनी ते राज्य खालसा केले तेव्हा हे दोघे कुम्मटा येथे कंपिलदेवाच्या दरबारात चाकरीसाठी आले अशी कथा आहे. कुम्मटाचा पाडाव होऊन तिथला राजा मरण पावताच या दोघाही भावांना कैद करून दिल्लीस नेण्यात आले. राजाने त्यांना दया दाखवून, मांडलिकत्वाची शपथ सक्तीने घ्यावयास लावली आणि नंतर त्यांच्या राज्यास परत पाठवले. दक्षिणेत परत आल्यानंतर या दोघा भावांना नवीन राज्य स्थापन करण्यासाठी परिस्थिती अनुकूल वाटली. स्वतःला स्वतंत्र राजे घोषित करून ते विजयनगरचे राजे झाले. याच सुमारास होयसळ घराण्याच्या तिसऱ्या बल्लाळाने या दोघा भावांविरूध्द लढाया दिल्या पण त्यात त्याचा शेवटी पराभव झाला. अशारीतीने हे दोघे बंधू स्वतंत्र झाले. नंतर त्यांची विद्यारण्य नावाच्या साधूशी गाठ पडली. इतिहासात घडलेल्या प्रत्यक्ष घटनांपेक्षा ही दंतकथा कशी निराळी आहे याचे स्पष्टीकरण प्रस्तावनेत आले आहे.

२. एनिबेकीमेली, मिलेकिर्नीबी, मेलिनेबिकी - हे सर्व नावे मलिकनईबसाठी आलेली आहेत.

आणि राज्य त्याने देवरायच्या हवाली केले. मूळ मालकाच्या हाती राज्य देऊन, तयारी करून तो त्वरेने आपल्या प्रांतास रवाना झाला. तो निघून जाताच गादीवर आलेल्या देवरायाने[३] ज्यांनी उठाव केला होता त्यांना व इतर लोकांना दिलासा दिला, आणि त्यांच्या सुरक्षिततेची तजवीज केली. त्यांच्या सदिच्छा मिळाव्यात म्हणून दयाळूपणे त्यांच्यासाठी अनेक गोष्टी केल्या आणि त्यांच्या गावास व क़िल्ल्यास भेटी देण्यासाठी दौरे काढले. राज्याचा गेलेला भूप्रदेश त्याने सोडून दिला कारण तो पुन्हा मिळवता येणार नाही हे त्यास माहिती होते. कारण या कामासाठी लागणारे सैन्यबळ आता त्याच्याकडे नव्हते. असे युध्द करण्यासाठी काही कारणही नव्हते आणि शिवाय तो आता फार वृध्द झालेला होता.

३. देवराय हे प्रथेप्रमाणे सन्मानदर्शक नाव आहे. परकीय असलेल्या नूनीशला ते राजाचे नाव वाटले. वस्तुतः तो येथे पहिल्या हरिहराविषयी लिहितो आहे.

# प्रकरण ४

## *राजा देवरायने बिसनाग शहर वसवले त्याविषयी*

नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे एके दिवशी राजा शिकारीसाठी नागुंदिम नदीच्या पलीकडच्या तीरावर असणाऱ्या पहाडांमध्ये शिकारीसाठी गेला. या ठिकाणी आता बिसनाग शहर आहे पण त्यावेळी मात्र ती ओसाड जागा [१] असून, तिथे बरीच शिकार चाले. राजाने स्वत:च्या शिकारीसाठी ती खास राखून ठेवली होती. राजाबरोबर शिकारीचे कुत्रे आणि इतर लवाजमा होता. इतक्यात तिथे एक ससा दृष्टीस पडला. पण कुत्र्यांना पाहून भिऊन पळण्याऐवजी त्याने त्यांच्यावर हल्ला केला आणि त्या सर्वांना तो चावला. परिणाम असा झाला, की आपल्याला इजा होईल या भीतीने त्याच्याजवळ जाण्याची हिंमत एकाही कुत्र्याला झाली नाही. हे पाहून राजास मोठा विस्मय वाटला. ज्या कुत्र्यांनी याअगोदर वाघ, सिंहासारख्या प्राण्यांना पकडले होते त्यांचे एका दुर्बल सशाने चावे घ्यावेत याचा अर्थ तो केवळ ससा नसून, त्यात बहुधा काही तरी अद्‌भुत, विलक्षण असावे त्याला वाटले आणि तो लागलीच नागुंदिम शहरास परतला.

नदीपाशी येताच काठावर फिरणाऱ्या एका तपस्व्याशी [२] त्याची गाठ पडली. सशाची हकीगत राजाने या तपस्व्याला सांगितली. त्या तपस्व्याला त्याचा अचंबा वाटला आणि तसेच परत फिरून ही विलक्षण घटना घडली ते ठिकाण त्याला दाखविण्याचे त्याने राजास सांगितले. तिथे पोहोचताच तपस्व्याने राजास सांगितले, की तू इथे राहण्यासाठी राजमहाल उभारून एक शहर वसव. कारण इथे घडलेल्या चमत्काराचा अर्थ असा, की या ठिकाणी वसवलेले शहर जगातील सर्वात मजबूत शहर राहील, ते कोणत्याही शत्रूला जिंकता येणार नाही आणि ते राज्याचे मुख्य नगर असेल. राजाने ते ऐकले आणि त्याच दिवशी नवीन राजमहालाचे काम सुरु झाले. शहराभोवती तट बांधण्याचे कामही हाती घेण्यात आले. हे होताच नागुंदिम शहर सोडून तो इथे राहावयास गेला. थोडयाच अवधीत इतर लोकही नवीन शहरात वस्तीसाठी आले. ज्या

---

१. हे खरे नव्हे. पाहा प्रस्तावना.

२. पाहा प्रस्तावना.

तपस्व्याने त्याला हे बसवण्याची आज्ञा केली होती त्याच्यावरून राजाने शहराचे नाव विद्याजुन असे ठेवले. पण कालांतराने या नावाचा अपभ्रंश होऊन बिसनाग (विजयनगर) असे नाव पडले. त्या तपस्व्याच्या मृत्यूनंतर त्याच्या सन्मानार्थ एक मोठे मंदिर [३] बांधले आणि त्यासाठी बरेच मोठे उत्पन्न लावून दिले. तेव्हापासून राज्यारोहणाच्यावेळी बिसनागच्या राजांना, त्या तपस्व्याच्या स्मृतिप्रीत्यर्थ स्वतःच्या महालात प्रवेश करण्याअगोदर या मंदिरात दर्शनार्थ यावे लागते. तेथे ते प्रार्थना करतात आणि प्रतिवर्षी बरेच उत्सव करतात.

राजा देवरायने [४] सात वर्षे राज्य केले. या कालावधीत इतर काही न करता राज्यात स्थिरस्थावर करून लोकांना दिलासा दिला. तो मरण पावला तेव्हा राज्यात सर्वत्र शांतता होती.

त्याच्यानंतर वारसाहक्काने बुक्कराय नावाचा राजा गादीवर बसला. पूर्वी राज्याची वाताहत झाली तेव्हा बऱ्याच जणांनी उठाव करून जमिनी बळकावल्या होत्या. त्या सर्व त्याने जिंकून घेतल्या आणि आपल्या राज्यास जोडल्या. बंगालच्या हद्दीत लागून असलेले ओरियाचे [५] विस्तीर्ण राज्यही त्याने जिंकून घेतले. त्याने सदतीस वर्षे राज्य केले. त्याचा दरारा जितका होता तितकाच मानही होता. राज्यात सर्व जण त्याची आज्ञा शिरसावंद्य मानीत.

---

३ मंदिर कुठे उभारण्यात आले हे नूनीश सांगत नाही. विद्याशंकराच्या मृत्यूनंतर, त्याच्या नावे एक मंदिर शृंगेरीस बांधण्यात आले होते आणि राजाने त्याला सढळ हाताने देणग्या दिल्या होत्या. आजही हंपीतील विरुपाक्ष मंदिरात विद्यारण्यांची समजली जाणारी समाधी व मूर्ती दाखवतात. शृंगेरीतील एका देवळातही विद्यारण्यांच्या समाधीचा दगड दाखवण्यात येतो.

४. देवराय म्हणजे हरिहर असे नूनीशला म्हणावयाचे असेल तर पहिल्या हरिहराने फक्त सात वर्षे राज्य केले या विधानाचे समर्थन कसे करायचे ? चौथा बल्लाळ १३४५ मध्ये मरण पावल्यावर, १३४६ मध्ये हरिहर स्वतंत्र राजा झाला. आपल्या कर्तृत्वाची जगाला माहिती व्हावी म्हणून त्याने शृंगेरीच्या मठाला काही देणग्या दिल्या. त्याच्यानंतर त्याचा भाऊ, पहिला बुक्क अथवा बुक्कराय गादीवर आला. १३५१-५२ च्या सुमारास बुक्कराय पहिल्या हरिहराला सामील झाला आणि त्यानंतर त्यांचा संयुक्त अंमल सुरु झाला. पहिल्या हरिहराचा शेवटचा कोरीव लेख हा १३५७ चा आहे. कदाचित नूनीशला म्हणावयाचे असेल की हरिहरने सात वर्षे राज्य केले आणि मग बुक्कराय त्याला सामील झाला. पहिल्या बुक्करायाने १३७७ पर्यन्त राज्य केले. नूनीशचा कालनिर्देश इथे चुकला आहे.

५. उदयगिरी हे बुक्कच्या अंमलाखाली होते. ओरियांच्या नव्हे.

राजा बुक्करावाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा 'पुरेयोरे देवराय'[६] गादीवर आला. कन्नडमध्ये याचा अर्थ 'सामर्थ्यशाली स्वामी' असा होतो.

त्याने *परदाओ*[७] हे नाणे पाडले. आजसुध्दा त्या नाण्याला *'पुरेओरे देवराय'* म्हणतात. तेव्हापासून ज्या ज्या राजांनी नाणी पाडली ती ती त्यांच्या नावाने ओळखण्याची प्रथा पडली आहे. या कारणानेच बिसनागच्या राज्यात आज अनेक नावांची *परदाओ* आहेत. मरतेवेळी या राजाने आपल्या पित्याने जेवढे राज्य जिकून ठेवलेले होते तेवढेच मागे ठेवले. इतर काही संपादन केले नाही

या राजाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा अजराय[८] गादीवर आला. त्याने बेचाळीस वर्षे राज्य केले. या कालावधीत त्याचे मुसलमानांशी नेहमी युध्द चालू होते. त्याने गोवा, चौल, दाबूल (दाभोळ), सिलाओ (सिलोन) आणि राज्याची प्रथमतः वाताहत झाली तेव्हा बंडाळी केलेला कारमामडेलचा (कोरोमाडेल) सर्व प्रदेश - हे जिकून घेतले. त्याने इतरही अनेक बऱ्याच गोष्टी केल्या पण त्या इथे नोंदल्या नाहीत.

या राजाने बिसनाग शहरात बरेच कोट, बुरुज बांधले तसेच शहराभोवतींची तटबंदीही नव्याने बांधली. दुसरे म्हणजे शहरात बागबगीचे करता यावेत, असा पाण्याचा पुरवठा नव्हता. त्यामुळे शहरात काहीच नव्हते म्हटले तरी चालेल. जे काही पाणी येई ते नागुंदिम नदीचे होते. आणि तीदेखील शहरापासून दूर अंतरावर होती नदी सोडल्यास, या भागातील सारे पाणी मचूळ, कोणत्याही लागवडीला योग्य असे नव्हते. तेव्हा शहराची वाढ होऊन ते राज्यातील सर्वोतम ठरावे, अशी इच्छा राजास झाली. पाच कोसावर असणारी एक मोठया पात्राची नदी शहरात आणण्याचे त्याने ठरवले कारण त्या योगे शहरास बराच फायदा होईल असे त्याला वाटले. त्या प्रमाणे त्याने केले

---

६. पुरेयोरे देवराय म्हणजे हरिहर देवराय हा एक प्रबल सरदार होता दुसऱ्या हरिहराच्या कारकीर्दीत विजयनगरच्या सीमा समुद्रापलीकडे, सिलोनपर्यन्त पोहोचल्या होत्या. त्याला हरिहरराय देवराय असे म्हणत. या ठिकाणी उल्लेखिलेल्या काही घटना नूनीशने आपला वृतांत लिहिला त्यापूर्वी २०० वर्षे अगोदर घडलेल्या आहेत. नूनीशची माहिती बरोबर नसल्याने इथे बराच घोटाळा झाला आहे. या दुसऱ्या हरिहरने १४०५ पर्यन्त राज्य केले.

७. ''प्रतापगद्यण'' याला समानार्थी असणारा हा पोर्तुगीज शब्द असावा.

८. अजराय हा दुसऱ्या हरिहराचा मुलगा विजय बुक्कराय असावा. तो दोन वर्षेच गादीवर होता. त्याच्यानंतर त्याचा भाऊ पहिला देवराय गादीवर आला व दुसरा बुक्क दक्षिणेतील राज्याचा प्रमुख झाला. पहिला देवराय वीस वर्षे विजयनगरच्या गादीवर होता. शहर सुंदर व्हावे म्हणून त्याने बरेच काम केले. शेतीला पाणी मिळावे म्हणून राज्यात कालवे काढले. नूनीशने इथे केलेले वर्णन दुसऱ्या बुक्कपेक्षा पहिल्या देवरायला अधिक लागू पडते.

मोठमोठ्या शिलाखंडाचे बांध घालून त्याने नदी अडवली. अशी गोष्ट सांगतात, की राजाने एवढा मोठा दगड नदीत टाकला, की फक्त त्यामुळेच तिने राज्याच्या इच्छेनुरुप मार्ग आक्रमिला. या राज्यात हत्ती विपुल आहेत. त्यापैकी काहींना कामास जुंपून हा दगड तिथपर्यन्त ओढून नेण्यात आला. अशारीतीने वळवलेले पाणी मग राजाने त्याला शहरात पाहिजे त्या भागात खेळवले. हा पाणीपुरवठा इतका फायदेशीर राहिला, की रांज्याचे उत्पन्न तीन लक्ष पन्नास हजार *परदाओंनी* वाढले. या पाण्यामुळे शहराभोवती बागबगीचे, आमराया, द्राक्षांचे मळे करण्यात आले. तसेच लिंबू, संत्री, गुलाब आणि इतर अनेक फळ देणाऱ्या झाडांच्या बागाही करण्यात आल्या. आपल्या सर्व वडिलोपार्जित संपत्तीचा वापर राजाने नदी वळवण्यासाठी केला असे सांगतात. हा खर्च खूप प्रचंड होता.

या राजाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा विसराय [९] राज्यावर आला. त्याने सहा वर्षे राज्य केले. पण या काळात उल्लेखनीय असे फारसे काही त्याने केले नाही.

त्याच्यानंतर त्याचा मुलगा देवराओ [१०] गादीवर बसला. त्याची कारकीर्द पंचवीस वर्षांची राहिली. त्याने द्रव्याचा मोठा साठा करवण्याचे ठरवले. पण सतत युध्दात गुंतल्यामुळे जडजवाहिर सोडता, त्याला पंच्याऐंशी कोटीपेक्षा जास्त संपत्ती मिळवता आली नाही, ही रक्कम फार मोठी म्हणता येणार नाही कारण त्याच्या कारकीर्दीत कुलाओ (क्लवलॉन) सिलाओ, पालिआकेट (मद्रासजवळ) पेगू आणि तेनाकरी (तेनासेरिम) येथील राजे आणि इतर अनेक प्रदेश येथून खंडणी जमा होत असे.

या राजानंतर त्याचा मुलगा पिन्नराय [११] गादीवर आला. त्याने बारा वर्षे राज्य केले आणि त्याला ज्योतिषशास्त्रात चांगलीच गती होती. त्याला वाङ्मयाची आवड होती. त्याने बरेच ग्रंथ रचले आणि राज्यात बरेच वटहुकूम जारी केले. त्याच्या कारकीर्दीत त्याच्या पदरी वीस प्रधान होते. इकडील लोकांत ही जागा सहसा एकाच माणसाला मिळते. हा राजा फार विद्वान आणि आपल्या सर्व कर्तव्यात दक्ष असा होता. त्याच्या ठायी असलेल्या गुणांमुळे लोक त्याला पिन्नराय असे म्हणत. कन्नडमध्ये म्हणजे या लोकांच्या भाषेत त्याचा अर्थ 'ज्ञानवंत' असा होतो. या राजाला त्याच्या पुतण्याने

---

९. विसराय म्हणजे विजयराय.

१०. देवराओ म्हणजे देवराय. पण नूनीशने इथे नावाचा घोटाळा केला असला पाहिजे. कारण विजयराज आणि पिन्नराय अथवा प्रौहरदेवराय यांच्यामध्ये कोणीही देवराय झाला नाही. देवराय आणि पिन्नराय यांच्या कारकीर्दीत ज्या घटना घडल्या असे नूनीशला वाटते त्या प्रौहरदेवराय अथवा दुसरा देवराय या एकाच राज्याच्या काळातील आहेत.

११. पिन्नराय आणि देवराय ही दोन्ही एकाच व्यक्तीची नावे आहेत.

दगाबाजी करून मारले. या पुतण्याला आपल्या घरी त्याने आपल्या मुलाप्रमाणे वाढवले होते. पण त्याच पुतण्याने त्याला मारले. या पुतण्याने विवाह करण्याचे ठरवले आणि लग्नाच्या मेजवानीस राजपुत्र उपस्थित असण्याचा मान मिळावा, अशी आज्ञा करण्याची विनंती राजास केली. त्याच्यावरील प्रेमामुळे तसेच त्याचा योग्य तो बहुमान करणे आनंददायक वाटल्यामुळे राजाने आपल्या मुलास लवाजम्यासहित तयार होण्याची आज्ञा केली आणि मंत्री व दरबारी लोकांसहित पुतण्याच्या विवाह समारंभास त्याला पाठवले. पुतण्याने इकडे सर्व तयारी करून ठेवली होती. सर्व लोक आत मेजवानीस बसले असताना तयारीत असलेल्या मारेकऱ्यांनी जंबीये खुपसून त्यांना ठार केले. हे असे काही घडणार याची कोणालाही शंका आली नाही. कारण इकडील प्रथा अशी आहे, की मेजवानीस बसल्यानंतर सर्व अन्न एकाच वेळी वाढून घ्यावयाचे. भोजनास बसलेल्यांसाठी आत वाढपी नसतो. तसेच बाहेरही कोणी उभे करत नाहीत. फक्त मेजवानीसाठी आलेले निमंत्रित असतात. त्यामुळे आत काय घडले याची बातमी या लोकांनी बरोबर आणलेल्या नौकराचाकरासही लागली नाही. राजपुत्र आणि आलेले सर्व दरबारी यांचा खून केल्यानंतर तो पुतण्या घोडयावर बसून अशाथाटाने निघाला, की जणू तो राजाला नजराणा देण्यासाठी जात आहे. राजमहालाच्या देवडीशी येताच त्याने राजाला आपण आल्याचा आणि प्रथेप्रमाणे राजाला देण्यासाठी नजराणा बरोबर आणल्याचा निरोप पाठवला. राजा त्यावेळी अंत पुरात आपल्या स्त्रियांबरोबर आरामात गंमतीने वेळ घालवत होता. त्याने पुतण्याला आत बोलावून घेतले. राजा उभा होता तिथे येताच त्या पुतण्याने नजराणा म्हणून, अगोदरच विषाने माखलेला खंजिर ठेवलेले सुवर्णपात्र त्याला नजर केले. या खंजिराने त्याने राजाच्या अंगावर बरेच वार करून इजा केली. पण इतर कोणाहीपेक्षा राजा तलवार व जंबिया याचे हात करण्यात जास्त प्रवीण होता. त्याने चपळ हालचाल करुन आपल्यावरील वार चुकवले, स्वत ला मोकळे केले आणि जवळची छोटी तलवार काढून पुतण्यास मारले. हे होताच त्याने घोडा तयार करण्याचे फर्मावले, स्वत: त्यावर स्वार झाला आणि पुतण्याचे शिर हाती धरुन त्याच्या घराकडे निघाला. काही तरी दगाफटका झाला असावा आणि राजपुत्र मारला गेला असावा अशी त्याला भीती वाटली. आणि तिथे जाऊन पोहोचताच पुतण्याने केलेली विश्वासघाताची नीच कृत्ये त्याला दिसली. कारण राजपुत्र आणि त्याचे प्रमुख सेनाधिकारी तिथे मरून पडले होते. शक्य झाले असते तर त्या दगलबाजाने आपल्या विरुध्दही हेच केले असते हे त्याच्या लक्षात आले. क्रोधावेगात राजाने जे कोणी दगा करणारे असतील त्यांना भयानक शिक्षा करण्याचे फर्मावले. त्याप्रमाणे शिक्षा करण्यात आल्या. यातून काही निरपराधी लोक होते तेदेखील सुटले नाहीत. स्वत. राजाला गंभीर विषारी जखमा झाल्या होत्या. त्यामुळे तो नंतर सहा महिनेच जगला. सहा महिन्यांनंतर खंजिराच्या विषामुळे तो मरण पावला.

त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा गादीवर आला. त्याचे नाव ........ [१२] गादीवर येताच या राजाने आपले सर्व खजिनदार, मंत्री आणि फडणीस यांना बोलावून राज्याचा महसूल आणि सालिना उत्पन्न याविषयी विचारणा केली. तेव्हा महाराजांचे उत्पन्न दरवर्षी एक कोटी तीस लक्ष सुवर्णमुद्रा असल्याचे सांगण्यात आले. राज्याच्या महसुलाचा एक पंचमांश भाग या राजाने मंदिरासाठी लावून दिला. अशी मंदिरे असलेल्या राज्यात कोणतेही कायदेकानू शक्य नाहीत. इथे फक्त ब्राम्हणांचा - पुरोहितांचा - कायदा चालतो आणि त्यामुळे लोकांना जाच सहन करावा लागतो.

हा राजा मरण पावताच त्याचा पुत्र विरुपाक्ष गादीवर बसला. हा चंगीभंगी, दुर्गणी असून, फार स्त्रीलंपट होता. आपला सारा वेळ तो मद्यपान आणि ऐष करण्यात घालवी. तो आपले सेनाधिकारी किंवा प्रजा यांच्यासमोर कधीही आला नाही. त्यामुळे लवकरच वाडवडिलांनी त्याच्यासाठी जे काही जिंकून ठेवले होते ते तो गमावून बसला. राजाची वागणूक पाहून राज्यातील सर्व सरदार बंड करून उठले. प्रत्येक जण आपल्या जवळ असलेले सर्व काही बळकावून बसला. त्यामुळे आपल्या कारकीर्दीत हा राजा गोवा, चौल, दाबूल आणि राज्याचे इतर मुख्य प्रांत - हे सर्व गमावून बसला. केवळ नशेच्या भरात या राजाने आपल्या बऱ्याच सेनाधिकाऱ्यांना ठार केले. एके रात्री एक सेनाधिकारी आपल्या खोलीत आल्याचे त्याला स्वप्न पडले. दुसऱ्याच दिवशी त्याने त्याला बोलवून घेतले आणि स्वप्नामध्ये त्याने आपल्या खोलीत आपल्याला मारण्यासाठी प्रवेश केला असे सांगून केवळ याच सबबीपायी त्याला ठार करवले. या राजाला दोन तरुण मुले होती. आपल्या बापाचा नीचपणा आणि त्याने ज्या रीतीने राज्य गमावले होते ते पाहून त्यांनी त्याला ठार करण्याचे ठरवले. यापैकी मोठयाने म्हणजे गादीचा वारस असणाऱ्याने हे काम केलेही. नंतर जेव्हा त्याला राज्यावर बसण्याची विनंती करण्यात आली तेव्हा तो म्हणाला, ''अधिकाराने हे राज्य माझे असले तरी ते मला नको कारण बापाला मारून मी करू नये ते महापाप केलेले आहे. अशा कुपुत्राच्या हाती राज्य यावे हे योग्य नव्हे. माझ्या भावाचे हात पितृवधाने रंगलेले नाहीत. यासाठी तुम्ही त्यालाच राज्यावर बसू द्या.'' त्याप्रमाणे व्यवस्था होऊन धाकटा भाऊ राजा झाला. राजपदी येताच त्यांच्या मंत्र्यांनी आणि सेनाधिकाऱ्यांनी त्याला भावाला मारण्याचा सल्ला दिला. कारण ज्या अर्थी त्याने आपल्या बापास मारले होते त्याअर्थी इच्छा झाल्यास तो आपल्या भावासही मारू शकेल. असे एखादेवेळी होऊ शकेल असे वाटून राजाने भावास मारण्याचे ठरवले आणि ताबडतोब तो निश्चय अंमलात आणला. त्याने स्वत:च आपल्या हाताने भावास ठार मारले आणि अशारीतीने अशी नीच कृत्ये करणाऱ्या माणसांचा जो शेवट होतो तोच त्याचा झाला. राजाचे नाव पाद्येवराय [१३] असे होते. भावाला मारल्यानंतर

---

१२. हा मल्लिकार्जुनराय ऊर्फ इम्मदी प्रौढ़देवराय असला पाहिजे.

१३. हा कोण हे ओळखता येत नाही.

त्यानेही बापाप्रमाणेच व्यसनी आयुष्य जगावयास सुरुवात केली. तो स्त्रियांच्या संगतीत सारा वेळ घालवी. राज्यात काय चालले आहे याची त्याला यत्किंचितही पर्वा नव्हती. तो आपल्या दुर्गुणातच बुडलेला असावयाचा. बहुतेक काळ तो राजधानीच्या शहरातच राही. त्याचा नरसिग[१४] नावाचा एक सेनाधिकारी होता. तो त्याच्या नात्यातलाही होता. राजाचा एकूण ढंग पाहून तो जिवंत असणे तसेच गादीवर असणे राज्यासाठी किती धोक्याचे आहे हे त्याच्या लक्षात आले. अजूनही सर्व काही गमावले नव्हते. त्यापूर्वीच राजावर हल्ला चढवून त्याला पदभ्रष्ट करावे, यासाठी त्याने एक योजना अंमलात आणली.

त्याने सेनाधिकारी तसेच राज्याचे प्रमुख अधिकारी यांना योग्य शासन करणारा राजा नसल्याने आपली परिस्थिती कशी वाईट झाली आहे हे लिहून कळवले. तसेच राजाचा एकूण ढंग पाहता आपल्या वाईट कारभारामुळे बापाने गमावले होते त्याहीपेक्षा जास्त या राजाने गमावले तरी आश्चर्य वाटणार नाही असेही लिहिले.

त्यांच्या सदिच्छा मिळाव्यात म्हणून त्या सवाना त्याने भारीभारी भेटवस्तू दिल्या. आपल्याभोवती अशारीतीने बरेच लोक गोळा करून त्याने राजाचे वास्तव्य होते त्या बिसनागवर हल्ला करण्याची तयारी केली. सेनाधिकारी नरसिगने बंड केल्याची, किती लोक त्याला सामील झाले याची त्याचप्रमाणे तो मुलुख काबीज करत येत आहे याचीही खबर राजास देण्यात आली. पण झालेल्या नुकसानीची त्याला जाणीव नव्हती असे दिसले. कारण तिकडे त्याने यत्किंचितही लक्ष दिले नाही, तसेच तो तयारीतही राहिला नाही. उलट खबर आणणाऱ्यांनाच तो वाईट वागवी. त्यामुळे नरसिगच्या फौजेचा एक अधिकारी जेव्हा बिसनागच्या वेशीपर्यन्त येऊन थडकला तेव्हा रक्षणासाठी तिथे एकही शिपाई नव्हता. राजाला तो आल्याची खबर देण्यात आली तेव्हा 'हे शक्यच नाही' असे तो म्हणाला. नंतर हा सेनाधिकारी शहरात शिरला तरीदेखील राजाने म्हणणे हेच, की हे घडणे शक्य नाही. नंतर अधिकारी थेट महालात राजाच्या दालनापर्यन्त आला, वाटेत त्याने तिथल्या काही स्त्रियांनाही ठार केले. सरतेशेवटी राजाचा विश्वास बसला आणि धोका जबरदस्त आहे हे आता लक्षात येऊन तो दुसऱ्या बाजूच्या दरवाजाने शहर आणि राजमहाल सोडून पळून गेला

राजा पळून गेला आहे असे समजताच त्या सेनाधिकाऱ्याने त्याचा पाठलाग करण्याची तसदी घेतली नाही. उलट शहरावर कब्जा मिळवून तिथे सापडलेला खजिना त्याने ताब्यात घेतला. याची खबर त्याने आपला मालक नरसिंग यास दिली. या घटनेनंतर नरसिगलाच राज्यावर बसवण्यात आले. तो शक्तिशाली असून, प्रजेचे

---

१४. हा नरसिंग म्हणजे साळुव नरसिंह होय.

त्याच्यावर प्रेम होते. येथून बिसनागचे राज्य 'नरसिंगचे'[१५] राज्य म्हणून प्रसिध्द झाले.

गादीवर आल्यानंतर लोकांनी त्याची सत्ता कबूल करताच हा राजा मग बिसनागला आला. तेथे त्याने अनेक न्यायदानाची कामे केली. अधिकार नसताना ज्यांनी राजाच्या जमिनी पूर्वी बळकावल्या होत्या, त्यांच्याकडून त्याने त्या काढून घेतल्या. या राजाने[१६] चव्वेचाळीस वर्षे राज्य केले. तो मरण पावला तेव्हा त्याच्या राज्यात सर्वत्र शांतता होती. पूर्वीच्या राजांनी राज्याचा जो प्रदेश गमावला होता तो त्याने परत मिळवला. आरोमझ (ओर्मझ, पर्शिया) आणि अदीम (एडन) येथून त्याने आपल्या राज्यात घोडे मागावून घेतले. यामुळे व्यापारी लोकांना बराच फायदा झाला कारण पाहिजे ती किंमत त्यांना मिळे. घोडे मेलेले असो वा जिवंत, तो त्यांना एक हजार *परदाओला* तीन या हिशेबाने विकत घेई. समुद्रमार्गाने आणताना जी घोडी मरत त्यांची शेपटी राजाला दाखवल्यास तो जिवंत घोड्याची पूर्ण किंमत चुकती करे.

हा राजा मरण पावला तेव्हा राज्यातील तीन किल्ल्यांनी त्याच्या विरुध्द उठाव केला होता. हे किल्ले म्हणजे *राचोल,* आदेगेरी, कोनादोल्गी हे होत. हे तिन्ही त्याला परत घेता आले नाहीत. (राचोल म्हणजे रायचूर, ओदेगेरी म्हणजे उदयगिरी आणि कोनादोल्गी म्हणजे बहुधा कोंदाविद असावी. 'दोल्गि' या शब्दाचा अर्थ डोंगरी किल्ला असा होतो.) हे तिन्ही किल्ले राज्यातले प्रमुख किल्ले असून, त्यांच्याकडे बराच मोठा, संपन्न भू प्रदेश होता. राजा मरण पावला तेव्हा त्याला दोन मुले होती. राज्याचा कारभार नरसनायक पाहत होता. याचाच मुलगा पुढे बिसनागचा राजा झाला. मृत्युपूर्वी राजाने आपला प्रधान नरसनायक[१७] यास बोलावले आणि त्याच्याशी चर्चा केली. तो नरसनायकाला म्हणाला, की, मरते वेळी, मृत्युपत्रानुसार मी राज्य तुमच्या हाती सोपवीन. राजपुत्र वयात येईपर्यन्त तुम्ही कारभार पहावा. तोपर्यन्त राज्याचा सर्व खजिना तुमच्या हातात

---

१५. साळुव नरसिंह आणि त्याच्या नंतर आलेले राजे यांनी १४८६ ते १५०५ पर्यन्त विजयनगरवर राज्य केले. नंतर तुळुव नरसिंह ऊर्फ नरसण्णा नायक गादीवर आला. साळुव नरसिंहाच्या काळात, पोर्तुगीज लोक विजयनगरच्या राज्याला नरसिंगचे किंवा बिसनागचे राज्य असे म्हणत.

१६. सर्व साळुव घराण्याचे विजयनगरावरील राज्य वीस-पंचवीस वर्षांपेक्षा जास्त टिकले नाही. साळुव नरसिंहाचे सत्ताग्रहण आणि अच्युतरायांचे राज्यारोहण यात चव्वेचाळीस वर्षांचे अंतर आहे. नूनीशची माहिती इथे चुकीची आहे.

१७. मृत्युशय्येवर असताना साळुव नरसिंहाने आपला दिवाण तुळुव नरस नायक (ज्याला नूनीश नरसेनानक म्हणतो) यास बोलावून रायचूर आणि उदयगिरी जिंकून घेण्याचे सांगितले. तुळव नायक म्हणजे विजयनगरचा महान राजा कृष्णदेवराय याचा पिता होय

राहिले. तो नरसनायकाला असेही म्हणाला, ''मी तलवारीच्या जोरावर नरसिंगचे राज्य संपादन केले. आता फक्त तीनच किल्ले काबीज करायचे राहिले आहेत. पण ते आता मला शक्य नाही कारण फार उशीर झालेला आहे.'' राजाने नंतर त्याला ''राज्य कारभार चोखपणे चालवून, दोघा राजपुत्रांपैकी जो योग्य असेल त्याच्या हाती राज्य द्यावे.'' असे सांगितले. राजा मरण पावताच दिवाण म्हणून नरसनायकाने काम पाहिले आणि लवकरच त्याने राजपुत्रास गादीवर बसवले. मात्र खजिना, महसूल आणि कारभार या गोष्टी त्याने स्वत: कडेच ठेवल्या.

यावेळी एक सेनाधिकारी होता जो त्याचे वाईट करू इच्छित होता. राजपुत्राला ठार केल्यास नरसनायकाच्या सांगण्यावरून आपण खून केला असे सांगता येईल असे त्याला वाटले. तसे झाल्यास, नरसनायक सर्व राज्याचा कुलमुखत्यार असल्यामुळे या राजद्रोहाबद्दल त्याला देहदंडाची शिक्षा मिळणार. त्याप्रमाणे त्याने सर्व बेत केला. आपल्या एका हुजऱ्याला लाच देऊन त्याने त्यासाठी तयार केले. या हुजऱ्याने एके रात्री तलवारीने राजपुत्रास ठार मारले. राजपुत्राच्या खुनाची बातमी नायकाला कळाली. तसेच हा खून आपण घडवून आणलेला आहे, अशी अफवाही उठल्याचे त्याच्या कानी आले. ताबडतोब त्याने मृत राजपुत्राच्या दुसऱ्या भावास गादीवर बसवले. हा धाकटा भाऊ असून, त्याचे नाव तामाराय[१८] होते. याला गादीवर बसवेपर्यन्त नरसनायकाला त्या सेनाधिकाऱ्याला शिक्षा करता आली नाही कारण नातेवाईक प्रबळ होते. नंतर मात्र एके दिवशी शिकारीला जातो असे सांगून, कुटुंबियांना मागे ठेवून बिसनाग शहराहून तो नागुंदिमहून गेला. नागुंदिमहून तो चोवीस कोसांवर असलेल्या पेनुकोंडे शहरास गेला. तिथे त्याने बरेच हत्ती, घोडे असलेली मोठी फौज खडी केली आणि मग राजा तिम्मरायला आपल्या निघून येण्याचे कारण कळवले. तिम्माअर्सा या सेनाधिकाऱ्याने राजद्रोह करून माजी राजाला म्हणजेच त्याच्या भावाला कसे ठार केले याविषयीची हकीकत त्याने राजा तिम्मरायाला कळवली. ''आपल्या पित्याने राज्याची तसेच आपण उभयता बंधूंची काळजी घेण्याचे काम विश्वासाने माझ्यावर सोपवले होते. सेनाधिकारी तिम्मा अर्साने विश्वासघाताने आपल्या बंधूस जसे मारले तसे तो आपणासही मारेल तेव्हा या दगलबाजाला शिक्षा होणे आवश्यक आहे'' असे राजास सांगितले. पण त्या समयी राजाची त्या सेनाधिकाऱ्यावर बहाल मर्जी होती कारण त्याच्यामुळेच आपणास राजपद मिळाले असे त्याला वाटत होते. त्यामुळे त्याला शिक्षा करण्याऐवजी त्याच्यावर अधिक मेहेरबानी दाखवली आणि दिवाणाविरुध्द त्याचीच बाजू घेतली. हे पाहून नरसनायकाने मोठ्या फौजेनिशी राजावर चढाई केली, त्याला वेढा घातला आणि चार-पाच दिवस चांगलीच भीती घातली. त्याचा निश्चय पाहून राजाने शेवटी तिम्म अर्साला ठार करण्याची आज्ञा दिली. आणि त्याचे शिर नरसनायकाकडे पाठवले. ते पाहून

---

१८. तिम्मराय.

त्याला फार आनंद झाला. नरसनायकाने मग सगळी फौज परत पाठवली व स्वतः शहरात प्रवेश केला. सर्व लोकांनी त्याचे समारंभाने स्वागत केले कारण त्याच्या न्यायवृत्तीमुळे तो लोकांना आवडे.

पुढे काही वर्षे गेल्यानंतर राजा अजून नाबालिग आहे असे पाहून नरसनायकाने त्याला पेनुकोंडे शहरात ठेवण्याचे ठरवले. त्याच्या सुरक्षिततेसाठी त्याने मोठी रक्षकदले बरोबर दिली तसेच सालिना खर्चासाठी म्हणून २०, ००० कृझादोंची व्यवस्था केली. राज्यकारभार मात्र त्याने स्वतःकडेच ठेवला. कारण राजाच्या वडिलांनीच तो त्याच्यावर सोपवला होता. अशी व्यवस्था झाल्यानंतर नरसनायकाने राज्याला फायदेशीर राहतील अशा काही कामासाठी आपण बिसनागला जात आहोत असे सांगितले. हे ऐकून राजाला आनंदच झाला आणि त्याने होकार दिला. कारण तो नसताना आपण स्वतंत्रपणे पाहिजे तसे राहू आणि त्याचा धाक आपणास उरणार नाही असे त्याला वाटले. तेथून बिसनागला आल्यानंतर नरसनायकाने ठरल्याप्रमाणे तिमपानायक[१९] या विश्वासू सेनाधिकाऱ्याच्या ताब्यात २०, ००० शिपायांचे रक्षकदल देऊन त्यास राजाकडे पाठवले. राजाला शहराबाहेर पडू देऊ नये आणि त्याला कोणताही दगाफटका होणार नाही याची काळजी घ्यावी, अशी आज्ञा त्याने केली.

हे सर्व झाल्यानंतर नरसनायकाने बंडाळी केलेल्या बऱ्याच प्रांतावर स्वाऱ्या केल्या, त्यांना जिंकून घेतले आणि त्यांची धूळधाण केली. याच सुमारास काही सेनाधिकाऱ्यांनी त्याला सुचवले, की राजा राज्य करण्यास अयोग्य असल्यामुळे त्याला ठार करावे. पण याला तो काहीच उत्तर देत नसे. काही दिवसानंतर मात्र नायकाने सुचवण्यात आलेल्या राजद्रोहाच्या कृत्याविषयी बराच विचार केला. हा विश्वासघात असला तरी यामुळे आपले वैभव वाढेल आणि आतापर्यन्त ज्या राज्याचे आपण फक्त दिवाण होतो त्याचे सिंहासन आपणास मिळेल असा त्याने विचार केला. एके दिवशी मग ज्या सेनाधिकाऱ्यांनी ही सूचना केली होती त्यांना त्याने बोलावून घेतले आणि आपला हात यात आहे याचा बोभाटा न होता राजास कसे ठार करता येईल याविषयी त्यांच्याशी सल्लामसलत केली. तेव्हा त्यांच्यापैकी एकजण (यांचे नाव कोदेमरेडे असल्याचे नंतर समजले.) म्हणाला, की बोभाटा न होता हे काम, असे पार पाडता येईल. ''आपण मला नाराज आहोत असे भासवून मला ताबडतोब हजर करण्याचा हुकूम द्यावा. मी तो हुकूम धुडकवून लावीन. आज्ञाभंगाच्या या कृत्याबद्दल मला शिक्षा होण्याचा आपण आदेश द्यावा. याने बिथरून जाऊन मी पेनुकोंडयास राजाकडे पळून जाईन आणि त्याला आपल्याविरुध्द चिथावणी देईन. राजाची मर्जी संपादन करून मी अशी काही योजना आखीन, की तो आपल्या विरुध्द वागू लागेल. राजाला यात प्रोत्साहन मिळावे. यासाठी सेनाधिकाऱ्यांची म्हणून काही बनावट पत्रे मी तयार करीन. या पत्रातही सल्ला असेल

---

१९. तिम्मपानायक.

तो हाच, की आपण जिथे स्वतंत्र नसून वस्तुतः कैदी आहोत, अशा शहरातून राजाने बाहेर पडावे. ही पत्रे दाखवून मी राजाला सांगेन, की वस्तुतः ''तुम्ही राज्याचे स्वामी असतानाही तुमचा केवळ ताबेदार असणाऱ्या नरसनायकाने आपल्या हाती सर्व सत्ता ठेवली आहे. त्याने उठाव केला असून, राज्यात आपली ताकद वाढवून तुम्हाला बंदिवान केले आहे.'' असे सांगून मी राजास गुप्तपणे शहर सोडून ज्या सेनाधिकाऱ्याने पत्र पाठवले त्याच्या किल्ल्यात आश्रय घेण्याचे सांगेन. तसेच 'तिथे जाऊन सुसज्ज व्हावे व मोठी फौज खडी करावी म्हणजे तुमचा पक्का मनसुबा इतर सरदार आणि सेनाधिकाऱ्यांना कळताच तेही त्याप्रमाणे वागतील, तुम्हाला मदत करतील आणि नरसनायकावर चढाई करून स्वतःला राजपद मिळावे म्हणून त्याने जिथे तुम्हाला ठेवले आहे तिथेच मग त्याला कैदी म्हणून ठेवतील असे सर्व सांगेन.'' तो सेनाधिकारी पुढे म्हणाला, ''ज्याप्रमाणे राजाचे मन वळवून मी त्याला शहर सोडून जाण्यास भाग पाडीन आणि जात असताना त्याला ठार मारीन.'' नरसनायकाला राजा व्हावयाचे असेल तर हाच एक मार्ग आहे, असे तो म्हणाला.

नरसनायकाला राजद्रोहाची ही योजना आणि त्या सेनाधिकाऱ्याने रचलेले दुष्ट कारस्थान याविषयी ऐकून आनंद झाला. त्याने त्या सेनाधिकाऱ्यावर बरीच मेहेरबानी केली. काही दिवसांनी तो सेनाधिकारी नरसिंग शहरातून निघून गेला. आपण पळून गेलो आहोत, असे त्याने भासवले. तो पेनुकोंडयास आला. तिथे तो पळून आल्याचे सर्वांना समजले. लगेच त्याने ठरल्याप्रमाणे रचलेले कारस्थान अंमलात आणले. दररोज तो राजास एक पत्र दाखवी. ते पत्र कधी एखाद्या किल्लेदाराचे तर कधी दुसऱ्या कोणत्या सैन्यातील अधिकाऱ्याचे असे. पत्रांमध्ये लिहिण्यात आलेला कट राजाच्या लक्षात आला आणि त्यात त्याला देण्यात आलेला सल्लाही त्याला योग्य वाटला. तरी पण प्रधानपदी असणाऱ्या आणि हत्ती, घोडे यांचा मोठा फौज फाटा व खजिना ताब्यात ठेवणाऱ्या नरस नायकाविरुध्द एकदम चढाई कशी करावी आणि त्यांच्या सामर्थ्याचा प्रतिकार कसा करावा हा प्रश्न त्याला पडला, त्यावर तो राजद्रोही सेनाधिकारी म्हणाला, ''महाराज, आपण म्हणता ते खरे आहे. पण ज्यांनी आपणास गादीवर बसवले असे सर्व सेनाधिकारी त्यांच्यावर रोष बाळगून आहेत. तुम्ही चाओदेगिरीला (चंद्रगिरी ही राज्याच्या ऱ्हासप्राप्त काळातील राजधानी होती. तिथल्या किल्ल्यात आश्रय घेण्याचा सल्ला राजाला देण्यात आला कारण तो किल्ला त्यावेळी स्वतंत्र होता.) पोहोचताच हे सर्व सेनाधिकारी न्याय कार्यासाठी म्हणून तुमच्या मदतीस धावतील.'' राजा म्हणाला, ''असे असेल तर माझ्याभोवती असणाऱ्या शहरातील २०,००० शिपायांना पत्ता लागू न देता मला बाहेर कसे पडता येईल ?'' सेनाधिकारी म्हणाला, ''महाराज, याविषयाची आखून ठेवलेली गुप्त योजना तुम्हाला सांगतो, तुम्ही आणि मी दोघेच बागेच्या बाजूने जाऊन शहराच्या तटभिंतीत असणाऱ्या दिंडी दरवाजाने बाहेर पडू. हा दरवाजा मला माहीत आहे. कुठलाही लवाजमा बरोबर नसताना, तुम्हाला एकट्याला पाहून तुम्ही राजे असल्याची

शंका पहारेकऱ्यांना येणार नाही. अशारीतीने आपण शहराबाहेर पडू. तिथे मी घोडे तयार ठेवलेले असतील. त्यावर स्वार होऊन तुम्हास योग्य वाटेल त्या ठिकाणी आपणास जाता येईल.'' राजाला ही योजना आवडली आणि ती अंमलात आणण्याची सर्व व्यवस्था त्याने त्या सेनाधिकाऱ्यावर सोपवली. सर्व गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणे जुळून आल्याचे पाहून हा सेनाधिकारी मग राजाने ज्या बागेच्या बाजूने पळून जावे असे ठरले होते तेथील पहारेकऱ्यांकडे गेला. ही जागा राजमहालालगतच होती. (कारण राजा आपल्या स्त्रियांबरोबर क्रीडेसाठी या बागेत नेहमी जाई. त्यावेळी बागेवर ३०० हत्यारबंद माणसांचा पहारा होता.) पहारेकऱ्यांना तो म्हणाला, ''अमुक एका रात्री, अमुक वेळेस मी येथून जाईन तेव्हा माझ्याबरोबर एक माणूस असेल. त्याला तुम्ही दिसताच ताबडतोब ठार मारा कारण त्याला तसेच पाहिजे. तुम्हाला याचे इनाम मिळेल.'' पहारेकऱ्यांनी सांगितले, की एवढी लहानशी सेवा आम्ही जरूर करू. दिवस मावळताच नंतर तो सेनाधिकारी राजाकडे गेला आणि म्हणाला, ''महाराज, आज जे करावयाचे ठरवले आहे ते उद्यावर ढकलू नका. कारण पळून जाण्यासाठी मी घोडे तयार ठेवले आहेत. आणि तुम्हाला इतक्या सुरक्षितपणे पोहोचण्याची व्यवस्था केली आहे, की तुमच्या जाण्याची बातमी खुद्द अंतःपुरातही कळणार नाही, मग इतरांची काय बात ? चला, महाराज बागेत या. तिथे मी तुमची वाट पाहतो.'' राजाने 'तुम्ही सांगता आहात ते योग्यच, मी येतो'' असे उत्तर दिले. मग रात्र पडली आणि ठरलेल्या घटकेला राजा सावधपणे बाहेर पडला. पण त्याची वाट पाहात बसलेला त्याच्याहीपेक्षा जास्त सावध होता. त्याने पहारेकऱ्यास इशारा केला. बागेत येताच तो दोन पहारेकऱ्यांच्या आड गेला. त्याक्षणी त्यांनी राजावर हल्ला केला आणि त्याला ठार मारले. लगोलग त्यांनी त्याचे प्रेत त्याच बागेतील एका झाडाखाली पुरून टाकले. आपण कोणाला ठार केले हे पहारेकऱ्यांना माहीतच नव्हते. त्या विश्वासघातकी सेनाधिकाऱ्याने त्यांचे आभार मानले आणि बिसहार्डी परत येऊन शहर सोडून जाण्याची तयारी केली. कारण त्यामुळे घडलेल्या गोष्टीचा बभ्रा होणार नव्हता. दुसरे दिवशी सकाळी राजा नाहीसा झाल्याचे लक्षात आले. सर्व शहरभर शोध घेऊनही त्याचा पत्ता लागेना तेव्हा सर्व लोकांची अशी धारणा झाली, की तो कुठे तरी पळून गेला असून तिथून तो नरसनायकाशी युध्द करणार आहे. नायकाला ही बातमी देण्यात आली आणि त्याने खूप दुःख झाल्याचे ढोंग केले. पण इकडे मात्र राजाच्या मृत्यूने राज्यात बंडाळी उद्भवल्यास खबरदारी म्हणून हत्ती घोड्यासहित सर्व सैन्य तयार ठेवले, पण राजा नाहीसा एवढे सोडल्यास तपशीलवार हकिकत त्याला अद्यापि माहीत नव्हती. नंतर मुख्य मारेकरी आला आणि त्याने सर्व कट कसा गुप्तपणे पार पाडला, इतका की ज्यांनी राजास मारले त्यांनाही आपण कोणास ठार करतो आहोत हे ठाऊक नव्हते इत्यादी तपशील सांगितला. नरसनायकाने त्याला मोठे इनाम दिले. इकडे राजाचा पत्ता लागत नव्हता. तेव्हां ज्याच्या हाती सत्तासूत्रे होतीच

त्या नरसनायकालाच नरसिंगचा राजा करण्यात आले.

हा राजा मरण पावला तेव्हा त्यांच्यामागे त्याची पाच मुले होती. त्यांची नावे म्हणजे बुसवल राय, कृष्णराय, तेतराय, रामीगुप्पा आणि औआ मिसिउय्या.[२०]

नरसनायकाच्या मृत्यूनंतर भुजबळरायला राज्य मिळाले ते त्याने सहा वर्षे केले. या कालावधीत तो नेहमी युध्दात गुंतलेला होता. कारण त्याचा बाप मरण पावताच राज्यातील सर्व सेनाधिकाऱ्यांनी त्याच्याविरुध्द बंड पुकारले. पण राजाने लवकरच त्यांचे परिपत्य करून त्यांचा मुलुख आपल्या अंमलाखाली आणला. राज्याची अवस्था पूर्ववत व्हावी म्हणून या काळात राजाने आठ दहलक्ष सोन्याचे *परदाओ* खर्च केले. हा राजा आजारी पडला आणि बिसनाग शहरी असतांना मरण पावला. मृत्यूपूर्वी त्याने आपला प्रधान साळुव तिम्म यास बोलावून घेतले आणि आपला आठ वर्षाचा मुलगा यासही हजर करावे, अशी आज्ञा केली. आपल्या मरणानंतर या मुलालाच गादीवर बसवण्यात यावे, असे त्याने साळुव तिम्मास सांगितले (पण मुलगा अल्पवयीन होता आणि वारसाने त्याचा भाऊ कृष्णराय याचा गादीवर हक्क होता.) तसेच कृष्णरायचे डोळे ताबडतोब काढण्यात येऊन ते आणून दाखवावेत, असेही त्याने साळुव तिम्मास सांगितले. असे करण्यामागे आपल्या मरणानंतर राज्यात कोणताही कलह[२१] राहू नये असा त्याचा हेतू होता. साळुव तिम्मा ती आज्ञा प्रमाण मानून उठला आणि त्याने कृष्णरायास बोलावून घेतले. त्याला एकीकडे एका तबेल्यात तो घेऊन गेला आणि राजाने डोळे काढण्याची आज्ञा केली असून, आपल्या मुलास गादीवर आणण्याचे ठरवले आहे हे सांगितले. हे ऐकून कृष्णराय म्हणाला की, 'मला राज्य नको, अगदी हक्काने मिळत असले तरी नको. एक जोगी, बैरागी म्हणून जगण्याची माझी इच्छा आहे. तेव्हा माझे डोळे काढू नका.' मी राजाचा काहीही अपराध केलेला नाही.' साळुव तिम्माने त्याचे म्हणणे ऐकले. कारण कृष्णराय त्यावेळी वयाने वीस वर्षापेक्षा थोडा जास्त होता. भुजबळरायच्या[२२] आठ वर्षाच्या अल्पवयीन मुलापेक्षा राजा होण्यास (याचे वर्णन नंतर येईलच) हाच योग्य

---

२०. औआमिसिउय्या म्हणजे स्वामी अच्युतराय असणार. कोरीव लेखातून नरसनायकाला चार मुले असल्याचे कळते. भुजबळराय (काही इतिहासकार याला दुसरा नरसिंह म्हणतात) कृष्णराय, रंगराय आणि अच्युतराय. तेतराय म्हणजे कोण हे सांगणे कठीण आहे. कारण हे नाव कुठल्याच कोरीव लेखात किंवा ग्रंथात सापडत नाही.

२१. नूनीश सांगतो आहे ती केवळ दंतकथा आहे. कृष्णदेवराय राज्य करीत असताना भुजबळरायने शके १४९८ धातु संवत्सर अथवा इ. स. १४१६ मध्ये तुळू राज्यावर स्वारी केली, असा उल्लेख शिलालेखामध्ये आहे.

२२. काही शिलालेखात भुजबळरायास विजयनगरचा भुजबळराय असे म्हटले आहे.

आहे, असे साळुव तिम्मास वाटले. एका शेळीचे डोळे त्याने काढवले आणि ते मरणोन्मुख असलेल्या भुजबळरायास नेऊन दाखवले. राजा मरण पावताच मग ज्या कृष्णरायाचे डोळे काढून घेण्यात यावेत, अशी आज्ञा झाली होती तोच कृष्णराय गादीवर आला.

---

रायवाचकामूनुसार भुजबळ नरसिंहाने कृष्णदेवरायाला राजा होता व्हावे यासाठी राजचिन्ह असणारी अंगठी त्याला पाठवली. सौ भार्गवी शिव्डइ यांनी आपल्या अप्रकाशित प्रबंधात या विधानाची चर्चा केली असून, ते बरोबर असल्याचे म्हटले आहे.

# प्रकरण ५

## *गादीवर आल्यानंतर कृष्णदेवरायाने केलेली कामगिरी*

कृष्णराय गादीवर बसला आणि त्याचा अंमल सर्व राज्यात जारी झाला. त्याचा भाऊ भुजबळराय याच्या कारकीर्दीत दिवाण असणारा साळुव तिम्मा त्याचाही प्रधान म्हणून काम पाहू लागला. राज्यावर येताच ताबडतोब कृष्णरायाने आपला पुतण्या आणि भाऊ भुजबळराय यांचे तीन पुत्र यांना चंद्रगिरीच्या किल्ल्यास पाठवले. पुतण्या मरेपर्यंत तिथेच राहिला. स्वत:च्या सुरक्षिततेसाठी राजाने हे केले आणि नंतर दीड वर्ष तो बिसनाग शहरातच राहिला. कोठेही बाहेर गेला नाही. या काळात त्याने राज्यातील परिस्थितीची माहिती करून घेतली आणि आधीच्या राजांचे कागदपत्र पाहिले. या दप्तरात त्याला आपला बाप नरसनायक ज्याचा दिवाण होता त्या नरसिंह राजाचे मृत्यूपत्र सापडले. यात त्याने लिहिले होते की, ''तलवारीच्या बळावर कमावलेल्या आपल्या राज्यावर आपल्या पश्चात आपले वारस किंवा जो कोणी येईल त्याने तीन किल्ले जिंकून घ्यावेत. या किल्ल्यांनी त्याच्या मृत्यूसमयी त्याच्याविरुध्द उठाव केला होता. आणि ते जिंकून घेण्यासाठी त्याला अवधी मिळाला नव्हता. या किल्ल्यांपैकी दोन म्हणजे रायचूर आणि मुदगल येथील किल्ले होत.

कृष्णरायाने हे मृत्यूपत्र वाचले आणि त्यात व्यक्त झालेल्या इच्छेचा आधीच्या राजांनी फार वाईटरीतीने अवमान केला असे त्याला वाटले. म्हणून ताबडतोब फौज तयार करून या किल्ल्यांवर चढाई करण्याचा त्याने निश्चय केला. यापैकी एक किल्ला ओदेगिरीचा असून, तो ओरिसाच्या राजाच्या ताब्यात होता. पहिल्यांदा त्याच्यावर स्वारी करण्याचे ठरवून कृष्णदेवरायाने चौतीस हजार पायदळ, आठशे हत्ती अशी फौज गोळा केली आणि तिच्यासह तो दिगरी[१] शहरास येऊन थडकला. उदयनगरीत त्यावेळी दहा हजार पायदळ आणि पाचशे स्वार होते. किल्ला मुळात मजबूत असल्याने यापेक्षा जास्त फौजेची त्यात गरज नव्हती. रसद तोडून आतल्या लोकांची उपासमार करून मगच किल्ला घेता येणे शक्य होते.

---

१. ओदेगिरी आणि दिगरी हे दोन्ही शब्द उदयगिरीसाठी वापरले आहेत.

राजाने या किल्ल्यास दीड वर्ष वेढा घातला. या काळात त्याने खडकाळ टेकड्यातून बऱ्याच वाटा काढल्या. किल्ल्याच्या बुरुजांपर्यंत आपल्या सैनिकांना जाता यावे म्हणून मोठमोठे दगड फोडून रस्ता काढला. किल्ला त्यावेळी इतका मजबूत होता, की फक्त एकाच वाटेने त्याच्यापर्यंत जाता येत होते. ही वाटदेखील इतकी अरुंद होती की एकावेळी फक्त एकच माणूस जाऊ शके. ही वाट तसेच इतर बऱ्याच वाटा त्याने रुंद करवून घेतल्या. ज्यायोगे त्यांना किल्ल्याजवळ जाता येईल.

राजाने तो किल्ला हल्ला करून घेतला. किल्ल्यात ओरियाच्या राजाची आत्या [२] होती. तिला कैद करण्यात आले, पण राजाने सन्मानपूर्वक तिची मुक्तता केली आणि तिला आपल्याबरोबरच घेतले.

हे झाल्यावर त्याने साळुवं तिम्मास बोलावून घेतले आणि नरसिंग राजाने मृत्यूपत्रात लिहिले होते ते आपण किती चांगलेपणाने पार पाडले हे सांगितले. पण या लहानशा विजयाने आपण संतुष्ट नाही असे तो म्हणाला. कारण ओरियाच्या राज्यात चांगले शंभर कोस आत घुसण्याची त्याची इच्छा होती आणि त्याप्रमाणे त्याने साळुव तिम्मास रसद तयार ठेवण्याची तसेच फौजेचा पूर्ण तनखा देण्याची आज्ञा केली.

हा किल्ला जिंकून तो तिथून रवाना झाला आणि त्याने कोडवीडवर स्वारी केली. ओरियाच्या राज्यातील हे एक मुख्य शहर होते. राजाने त्याला वेढा घातला हे ऐकताच ओरियाचा राजा आपल्या राज्याचे संरक्षण करण्यासाठी धावून आला. त्याच्या फौजेत तेराशे हत्ती, वीस हजार घोडदळ आणि पन्नास हजार पायदळ होते. ओरिसाचा राजा येतो आहे हे समजताच कृष्णदेवराय शहरावर हल्ला करण्याचे सोडून निघाला. शहर घेण्यासाठी नंतर भरपूर अवधी आहे, आता शहरावर हल्ला करण्यापेक्षा खुद्द राजाशी आणि त्याच्या फौजेशी लढा देणे चांगले, असा त्याने विचार केला. शहर सोडून तो चार कोस गेला. पण जाण्यापूर्वी त्याने काही सैन्य मागे ठेवले होते. ज्यायोगे शहरातील लोकांस पळून किनाऱ्याकडे जाता येणार नाही. तो एका नदीपाशी येऊन पोहोचला. तिचे पाणी खारे होते आणि तिला पायउतार होता. नदीच्या पलीकडील तीरावर ओरिसाचा राजा आपल्या फौजेनिशी तळ देऊन होता. कृष्णदेवराय फौजेसह अलीकडच्या तीरावर थांबला. त्याने ओरिसाच्या राजास निरोप पाठवला की, तुम्हास लढावयाचे असेल तर आम्ही आपली फौज नदीपासून दोन कोस मागे घेऊ त्यायोगे केसाला धक्काही न पोहोचता तुम्हास नदी ओलांडता येईल. तुम्ही नदी पार येताच आम्ही लढाईस

---

२. पोर्तुगीज भाषेत 'तिआ' म्हणजे आत्या आणि तिओ म्हणजे चुलता असा अर्थ आहे. मूळ संहितेत 'तिआ' असा शब्द आहे तो चुकीने तिओसाठी पडला असावा. काही शिलालेखांत उदयगिरी जिंकून कृष्णदेवरायाने निरूमलराऊतराय महापात्र याला कैदेत टाकले असा उल्लेख आहे. काही इतिहासकारांच्या मते कृष्णदेवरायाने त्या राजाच्या चुलत्यास कैदेत टाकले, आत्यास नव्हे.

सुरूवात करू. याला ओरियाच्या राजाने काहीच उत्तर दिले नाही. उलट चढाईची तयारी सुरू केली. त्याचा हा निश्चय पाहून कृष्णदेवरायाने आपली फौज आणि हत्ती यासह नदी ओलांडली. नदी ओलांडतांना समोरासमोर लढाई होऊन त्यात बरेच लोक मारले गेले. पण तरीदेखील कृष्णदेवरायाने नदी ओलांडली आणि काठावर शौर्याने लढाई करून ओरियाच्या राजाचा पराभव केला. त्यास पळवून लावले व त्याचे बरेचसे हत्ती, घोडे आपल्या ताब्यात घेतले.

यानंतर किल्ल्यास परत जाण्याचा आपला मानस असल्याचे त्याने आपला दिवाण तिम्मा यास सांगितले. या किल्ल्यातील लोकांनी अद्याप राजाचा पराक्रम पाहिला नव्हता. राजाने किल्ल्यावर स्वारी केली. दोन महिने त्यास वेढा घातला आणि तो जिंकून घेतला.

किल्ल्याचा अधिकार त्याने साळुव तिम्माकडे सोपवला. स्वत:ला राजाबरोबर ओरियाच्या मोहिमेत जाता यावे या हेतूने साळुव तिम्माने सैन्यात अधिकारी असलेल्या आपल्या एका भावास किल्ल्यावर नेमले. राजाने पुन्हा एकदा नदी ओलांडली आणि ओरियाच्या राजाचा पाठलाग केला. त्याची चढाई बऱ्याच प्रांतात अनपेक्षित होती. हे प्रांत त्याने घेतले व त्यांची धूळधाण केली. कृष्णदेवराय यानंतर कोंडापल्ली या राजधानीच्या शहरास येऊन पोहोचला. राज्याचे प्रमुख अधिकारी त्या शहरात होते. राजाने त्यास वेढा दिला. पण तीन महिने वेढा देऊनही त्यास तो घेता आला नाही. सरतेशेवटी ते शहर त्याच्या हाती आले ते पराक्रमामुळे नव्हे, तर त्याच्या सैन्याच्या बळामुळे. किल्ल्यात बरेच मोठमोठे लोक हाती सापडले ते त्याने कैद केले. यात राजाची एक पत्नी, त्याचा एक राजपुत्र आणि राज्याचे सात मुख्य सेनाधिकारी यांचा समावेश होता. या सर्वांना त्याने बिसनागला पाठवले आणि मग तो राज्यात चांगला शंभर कोस आत घुसला. सिममदरी (राजमहेंद्री, नकल करणाऱ्याने अनवधानाने पहिले अक्षर गाळले आहे) इथे येईपर्यंत मार्गात त्याला कुठल्याही प्रकारचा अडथळा झाला नाही. हे फार मोठे शहर होते. ओरियाच्या राजाची वाट पाहत राजाने तिथे सहा महिने मुक्काम केला. आपण रणभूमीवर त्याची वाट पाहत आहोत मी अशा अर्थाचे अनेक निरोप त्याने ओरियाचा राजास धाडले, पण तो कधीच आला नाही. या शहरात राजाने बऱ्याच गोष्टी केल्या. त्याने मंदिरांना देणग्या दिल्या. शहरात एक भव्य मंदिर बांधून त्यास खर्चासाठी बरेच मोठे उत्पन्न लावून दिले. या मंदिरात त्याने एक शिलालेख कोरून बसवला तो असा, 'कदाचित जेव्हा ही अक्षरे मिटून जातील तेव्हा ओरियाचा राजा बिसनागच्या राजाशी सामना करेल. ओरिसाच्या राजाने ही अक्षरे मिटवली तर त्याच्या राणीस बिसनागच्या राजाच्या घोड्यास नाल ठोकणाऱ्या लोहारांच्या हाती दिले जाईल.'' [३]

---

३. असा शिलालेख उपलब्ध नाही.

यानंतर राजा परत निघाला. जिंकून घेतलेला बहुतेक प्रदेश त्याने देवळांपाशी धर्मादाय म्हणून दिला. बिसनागला परतून काही दिवस त्याने तिथे आराम केला. पहिल्या किल्ल्यावरच्या चढाईत बंदिवान झालेल्या ओरियाच्या राजपुत्रास त्याने बोलावून घेतले आणि म्हणाला की, तरवार जंबियाचे हात करण्यात तुम्ही फार कुशल आहात असे लोक सांगतात. तरवारबाजीचे तुमचे हे कौशल्य पाहाण्यास मला आनंद वाटेल.

तो तरुण राजपुत्र म्हणाला की, महाराजांची ही आज्ञा असल्यामुळे मी तिचे पालन करीन. फक्त हा कार्यक्रम उद्या ठेवा. दुसरे दिवशी पुन्हा त्यास बोलावून घेतले, तसेच तरवारबाजीत निपुण असणाऱ्या आपल्या पदरच्या एका माणसास राजपुत्राशी दोन हात करण्यासाठी बोलावून घेतले. राजपुत्राने त्या माणसास पाहिले आणि आपणास सामना देण्यासाठी बोलावले आहे ते कोण्या राजकुळातील व्यक्तीबरोबर नव्हे, तर खालच्या दर्जाच्या एका इसमाबरोबर, याचा त्याला अपमान वाटला. तो क्रोधाने राजास म्हणाला, ''राजघराण्याचे रक्त अंगात नसलेल्या यकश्चित माणसाशी सामना देऊन त्याच्या स्पर्शाने माझे हात विटाळतील असे परमेश्वरकृपेने न होवो.'' असे म्हणून त्याने स्वतःस मारून घेतले.[४] आपल्या मुलाच्या मृत्यूची हकीकत समजताच ओरियाच्या राजाने साळुव तिम्मास पत्र पाठवून विचारले, की मुलगा तर मरण पावला आहे, पण राजाच्या ताब्यात ओलिस असणाऱ्या माझ्या पत्नीस कसे सोडवता येईल ? साळुव तिम्माने उत्तर पाठवले, की राजाने आपली मुलगी कृष्णदेवरायास द्यावी म्हणजे नंतर तो त्याच्या पत्नीस परत पाठवेल आणि त्याचा मुलुखही परत करेल (किंवा फार तर फक्त मुलुख ठेवेल). राजाने हा सल्ला मानला. आणि मुलीचे लग्न ठरवण्यासाठी विजयनगरला वकील धाडले. कृष्णदेवरायासही हे पटले. राजाची याबाबतची कबुली मिळताच ओरियाच्या राजाने आपली कन्या पाठवली. या विवाहामुळे दोघांत मैत्री झाली. नदीच्या पलीकडचा मुलुख कृष्णदेवरायने राजास परत दिला आणि अलीकडचा मुलुख स्वतःकडे ठेवून घेतला.

---

४. केवळ दंतकथा, शिलालेखांमध्ये या राजपुत्राचा उल्लेख कृष्णदेवरायाच्या राज्यातील काही भागांवर नेमलेला अधिकारी असा आहे.

# प्रकरण ६

## *ओरियाच्या राजाशी तह करून कृष्णदेवरायाने 'कातुईर' च्या राज्यावर स्वारी करण्याचे ठरवले त्याविषयी .*

कृष्णदेवरायाने ओरियाच्या राजाशी तह केला. त्याच्या मुलीशी लग्न केले आणि त्याची पत्नी आणि नदीपलीकडील मुलुख त्यास परत दिला याचा वृत्तांत मागे आलाच आहे. नंतर त्याने मोठी फौज खडी करून 'कातुईर' [१] वर हल्ला करण्याचे ठरवले. 'कातुईर' चा राजा गेल्या पन्नास वर्षांपासून विरोधात होता. हा प्रदेश कारामाओंडेल [२] च्या किनाऱ्यावर आहे. कृष्णदेवरायाने त्यावर स्वारी करून राजा होता त्या राजधानीच्या शहरास वेढा घातला. या शहराचे नाव ...... असून, त्याच्या भोवती पाणी आहे.

कृष्णदेवरायाने स्वारी केली त्यावेळेस हिवाळा होता. त्यामुळे शहराभोवतीच्या नदीला आलेला पूर [३] एवढा होता, की ती दुथडी भरून वाहात आहे. या कारणाने राजाला काहीच नुकसान करता आले नाही. हे पाहून आणि आपले दिवस निष्फळपणे चालले आहेत हे लक्षात घेऊन राजाने आपल्या लोकांना बरेच नवीन नाले, ओढे खोदण्याची आज्ञा केली. असे केल्याने त्याच्या इच्छापूर्तीच्या आड येणाऱ्या नदीच्या मुख्य पात्रावरच हल्ला करता येणे शक्य होते. सैनिकांची संख्या पुष्कळ असल्याने हे काम लवकर पूर्ण झाले. यानंतर खोदून पूर्ण झालेल्या ओढे–नाल्याची तोंडे त्याने नदीच्या मुख्य पात्राशी नेऊन भिडवली. त्यामुळे नदीचे पाणी ओसरले आणि तिचा तळ दिसू लागला. नदी आता इतकी उथळ झाली, की त्यामुळे राजाला शहराच्या तटापर्यंत पोहोचवता येणे शक्य झाले. नदीला अशारीतीने पन्नास ओढे नाल्यात वळवण्यात आले

---

१. कृष्णदेवरायावरील आपल्या अप्रकाशित प्रबंधात डॉ. सौ. भार्गवी शैवय्या यांनी कोईतूर म्हणजे केतावरम असे म्हटले आहे.

२. चोलमंडल किंवा पूर्व किनारा.

३. पूर्व किनाऱ्यावर ऑक्टोबर ते जानेवारी या काळात मुसळधार पाऊस पडतो. त्यामुळे केतावरम भोवतीच्या नदीला पूर येणे स्वाभाविक होते.

होते. शहरामध्ये एक लक्ष पायदळ आणि तीन हजार घोडदळ होते. या फौजेने आपल्या बचावासाठी पराक्रमाची शर्थ केली. पण त्याचा उपयोग झाला नाही. कृष्णदेवराय काही दिवसांच्या आतच शहरात शिरला आणि त्याने त्या सर्वांची कत्तल केली. शहरात त्याला भरपूर लूट मिळाली. यात मुख्यत: एक लक्ष सहा हजार सुवर्ण *परदाओ* आणि जडजवाहिर, असंख्य घोडे आणि हत्ती होते. शहर काबीज करून घेतल्यानंतर कृष्णदेवरायाने ते आपल्या बऱ्याच सेनाधिकाऱ्यांना वाटून दिले. प्रत्येकाच्या गरजेनुसार ही वाटणी झाली. शहराचा प्रमुख होता त्याला कैद करून बिसनागला नेण्यात आले. तिथेच पुढे राजाच्या कैदेत तो मरण पावला.

शहराची अशी व्यवस्था लावून कृष्णदेवराय बिसनागला परतला. तेथून त्याने साळुव तिम्माला स्वत: कोडावीडला पाठवले. कारण साळुव तिम्माच तिथला मुख्य, जिम्मेदार अधिकारी होता आणि तिथला कारभार प्रत्यक्षपणे पाहण्यासाठी त्याने आपल्या भावाला तिथे ठेवले होते. कृष्णदेवराय मात्र ओरिसाहून परत आल्यावर पुन्हा कधी तिथे गेला नाही.

साळुव तिम्मा कोडावीड[४] ला रवाना झाला तो मार्गात त्याला मदारमेलुको आडवा आला. हा मुसलमान असणारा हा मदरमुल्को[५] इकडच्या राजाचा (बहुतेक दख्खनच्या राजाचा) सेनाधिकारी होता. साठ हजारांचे सैन्य घेऊन तो साळुव तिम्माची वाट पाहत होता. साळुव तिम्माचे सैन्यबळ दोन लक्ष असल्यामुळे त्याला भीती नव्हती. या सैन्यानिशी त्याने त्याच्यावर चढाई केली आणि त्याचा पराभव केला. स्वत: मदारमेलुको, त्याची बायको आणि मुलगा यांना कैद केले. हत्ती, घोडे, जडजवाहिर, पैसा यांची लूट केली आणि सर्वांना कृष्णदेवरायाकडे पाठवले. राजाने त्यांना तुरुंगात डांबण्याची आज्ञा केली आणि तिथेच ते पुढे मरण पावले. साळुव तिम्मा आपल्या प्रांतात पुढे रवाना झाला. तिथे काही महिने राहून त्याने कारभाराची घडी नीट बसवली. काही तंट्यांचे निर्णय दिले आणि मग तो बिसनागला परत आला. राज्याचा प्रधान म्हणून कृष्णदेवरायाने त्याचे यथोचित स्वागत केले.

---

४. कोंदाविड

५. मादेरमेलुको म्हणजे रायचूरचा मल्लुखान असला पाहिजे. काही शिलालेखांत हे नाव आढळते

# प्रकरण ७

## *साळुव तिम्मा आल्यावर कृष्णदेवरायाने आदिलशाहीतील रायचूर[१] वर स्वारी करण्याचे ठरवून कित्येक वर्षांपासून चालत आलेला तह मोडला तो का याविषयी*

साळुव तिम्मा परतला. त्याचे सन्मानपूर्वक स्वागत झाले. काही दिवस लोटल्यावर राजा त्याला म्हणाला, की नरसिग राजाच्या मृत्युपत्रातील सर्व इच्छा पूर्ण करण्याची माझा मानस आहे. त्यापैकी एक इच्छा म्हणजे रायचूर जिकणे ही होय. रायचूर हे यादलकाओ[२] च्या मुख्य शहरांपैकी एक असून, फार मजबूत आहे. यापूर्वी ते आदिलशहाने आपल्या पूर्वजांकडून हिरावून घेतले आहे. पण गेल्या चाळीस वर्षांपासून दोन्ही पक्षांमध्ये सलोखा राहिलेला आहे. तो कसा मोडावा हे मला समजत नाही. साळुव तिम्माने उत्तर दिले की, शांततेचा तो तह काही विशिष्ट अटीनुसार झाला होता. त्यामध्ये एक अट अशी होती की, दोघांपैकी कोणाचाही जमीनदार, बंडखोर सेनाधिकारी किंवा कोणी गुन्हा करणारा याने कोणाकडे आश्रय घेतल्यास त्यास ताबडतोब स्वाधीन करण्यात यावे. सलोखा मोडण्यासाठी आता सबळ कारण आहे. कारण महाराजांचे बरेच जमीनदार आणि कर्जदार पळून जाऊन आदिलशहाच्या आश्रयास आहेत. ''साळुव तिम्माने सल्ला दिला की, या लोकांना स्वाधीन करण्याची मागणी राजाने आदिलशहाशी करावी. त्याने तसे करण्यास नकार दिला तर सलोखा मोडण्यासाठी आपल्याला चांगले कारण मिळेल. तथापि बऱ्याच जणांना हा सल्ला पसंत पडला नाही. याच वेळेला असे घडले की, सिदमेरकारला राजाने चाळीस हजार *परदाओ* देऊन घोडे खरेदी करण्यासाठी गोव्यास पाठवले होते. हा सिदमेरकार राजाचा विश्वासू असा मुसलमान असून, राजाने त्याला अनेक कामगिरीवर यापूर्वी पाठवले होते. हा सिदमेरकार गोव्यापासून दोन कोस

---

१. इ. स. १५२० किंवा त्याच्या आसपास कृष्णदेवरायाने लढलेली रायचूरची सुप्रसिध्द लढाई.

२. आदिलखान किंवा विजापूरचा आदिलशहा.

अंतरावर असणाऱ्या पोमङ्गा[३] या ठिकाणी आला. तेथून राजाने दिलेले पैसे घेऊन आदिलशहाकडे पळून गेला. काही जण म्हणतात की, तो पोमङ्गाला पोहोचताच आदिलशहाने त्याला पत्र पाठवले. सिदमेरकार रकमेसह पळून गेल्याची खबर राजाला मिळताच त्याने आदिलशहा आपला मित्र असल्याने, सिदमेरकारला रकमेसहित परत पाठवण्याचे पत्र त्याला लिहू असे सांगितले. राजाने मग खलिता लिहवला तो असा की, आपल्यामध्ये असणाऱ्या मैत्री व सलोख्याला इतक्या वर्षात कधी धक्का लागलेला नाही, तर अशा जुन्या काळच्या या सलोख्याला एका दगलबाजाचे निमित्त होऊन तो मोडणार नाही अशी मी उमीद करतो. सिदमेरकारला ताबडतोब परत पाठवावे अशी विनंती त्याने केली.

आदिलशहास हे पत्र वाचून दाखवण्यात आले तेव्हा त्याने आपले काजी आणि सल्लागार यांना बोलावून घेतले व ते पत्र वाचण्यास सांगितले. पत्रावर बऱ्याच सूचना करण्यात आल्या. सरतेशेवटी सिदमेरकारला बिसनागला परत पाठवू नये असे ठरले. कारण सिद हा कायदेपंडित असून, प्रत्यक्ष प्रेषित महंमदाच्या वंशातला होता. नंतर जणू या कृतीवर पांघरूण घालण्यासाठी म्हणून आदिलशहाने सिदमेरकारला दाभोळ देऊन तिकडे पाठवले. यायोगे सिदमेरकार आपल्याकडे नाही व त्याच्याविषयी आपणास काही माहीत नाही अशी सबलाशी त्याला करता आली. दाभोळहून सिदमेरकार पळून गेला. नंतर त्याचा पत्ता लागलेला नाही असे उत्तर आदिलशहाने पाठवले. राजाने पाठवलेले वकील हे उत्तर घेऊन आले तेव्हा राजास खूप राग आला. सलोखा मोडलेला आहे असे त्याला वाटले. त्याने लगेच आपल्या मंत्र्यांना बोलावले आणि सर्वांना विदित व्हावे म्हणून आदिलशहाने पत्र वाचून दाखवले. पत्राचे वाचन होताच, विशेष गडबड न करता सर्वांनी तयार व्हावे असे त्याने सांगितले. कारण आदिलशहाचा पुरता सूड घेण्याचा त्यांचा आता निश्चय होता. मंत्र्यांनी राजाला सल्ला दिला की, एवढ्या लहानशा रकमेसाठी असे करणे बरे होणार नाही. लोक काय म्हणतील याचा विचार महाराजांनी करावा आणि एवढ्या क्षुल्लक कारणासाठी इतक्या वर्षांचा सलोखा मोडायचाच असेल तर महाराजांनी हेही लक्षात घ्यावे, की मुसलमान कधीच प्रामाणिक नसतो. शिवाय सिदने जे केले त्यात इतरही लोक दोषी आहेत. आपण सूड घेण्यासाठी म्हणून युध्द करणार त्यात येण्याचे धैर्य सिदने दाखवले तर ठीकच. कारण मग त्याच्याबरोबर असणाऱ्यांचे पारिपत्य आपल्याला करता येईल. पण स्वत. सिद मात्र युध्दास येणार नाही. पण आपण केलेल्या सल्ल्याचा काहीही परिणाम न होता राजाचा युध्द करण्याचा निश्चय ठाम आहे हे पाहून त्याचे सल्लागार मंत्री पुन्हा त्यास म्हणाले, ''महाराज, युध्द करावयाचेच असेल त्यासाठी दाभोळमार्गे रायचूरवर स्वारी करावी. कारण रायचूर आता आदिलशहाच्या ताब्यात असले तरी पूर्वी आपल्या राज्यात होते. आदिलशहाला त्याच्या

३. पोमदा किंवा पोंदा गोव्याजवळ आहे

बचावासाठी यावे लागेल आणि मग एकाच वेळी दोघांचाही बदला घेतल्यासारखे होईल.'' राजाला हा सल्ला योग्य वाटला आणि त्याने कूच करण्याची तयारी सुरू केली. त्याने माद्रेमलुका,[४] देमेएलिना[५] आणि देस्तूरविरोदो[६] यांना आणि इतर वरिष्ठ सरदारांना पत्रे पाठवली. या पत्रात त्याने आदिलशहाने केलेले वर्तन तसेच आपला युध्दाचा निश्चय याविषयी लिहिले. सरदारांनी उत्तरे पाठवली त्यात ''तुम्ही करत आहात ते योग्य असून, त्यासाठी आम्ही यथाशक्ती मदत करू, असे लिहिले होते. झेमुल्कोच्या[७] बाबतीत सांगायचे झाले तर त्यांची बहीण आदिलशहाला दिलेली होती. त्यामुळे राजाला असे उत्तर पाठवून सुध्दा बहिणीच्या मदतीसाठी काही फौज पाठवण्यावाचून त्याला गत्यंतर नव्हते.

राजाने ही जी पत्रे सरदारांना पाठवली होती त्यात त्याचा धूर्तपणा होता. आपण काय करणार आहोत हे कळवून त्यांना आपल्या बाजूस ओढण्याचा त्याचा डाव होता. त्यांच्या फौजेची त्याला फारशी गरज नव्हती. पण निदान त्यांचा पाठिंबा तरी पाहिजे होता. कारण हे लोक आदिलशहाला मिळाले असते तर त्याचा जो जय झाला तो झाला नसता. इतर सर्व सुलतानांपेक्षा आदिलशहा जास्त शक्तिशाली असल्याने ते त्याचा तिरस्कार करीत (कारण या मुसलमानांमध्ये परस्पर विश्वास असा नाहीच. एकमेकाला ते कुत्र्यांसारखे चावतात. क्रमाक्रमाने एकानंतर एकाचा नाश करणे त्यांना आवडते.) इ. स. १५२२ साली मे महिन्यात पौर्णिमेच्या दिवशी कृष्णदेवरायाने आदिलशहाचा पराभव केला.

आपल्या इष्ट देवतांची पूजा करून आणि त्यांना बळी अर्पण करून राजाने आपल्या फौजेसह बिसनाग शहर सोडले. फौजेने आगेकूच केली ती या क्रमाने सर्वात पुढे तीरंदाज, ढालाईत, भालाईत आणि बंदूकधारी. अशा तीस हजार पायदळाचे नेतृत्व असणारा कामानायक होता. याखेरीज एक हजार स्वार आणि त्याचे हत्ती त्याच्या बरोबर होतेच. कामानायकानंतर[८] पन्नास हजार पायदळ, दोन हजार स्वार आणि वीस हत्ती असणारा त्रंबकराय होता. त्याच्या मागे तिमप्पानायक[९] होता. त्याच्या हुकमाखाली

४. वऱ्हाडचा इमद-उल-मुल्क (?)

५. गोळकोंड्याचा कुतुबशहा (?)

६. बिदरचा बरीदशहा (?)

७. निझाम-उल-मुल्क. पण स्युअल तसे निश्चितपणे म्हणत नाही. पुरेशा पुराव्याभावी हा नेमका कोण हे सांगता येत नाही.

८. ही लढाई इ. स. १५२०-२१ साली झाली. नूर्नीशचा कालनिर्देश चुकला आहे.

९. तिम्मप्पानायक अमरय तिमप्पानायक असला पाहिजे.

साठ हजार पायदळ, साडेतीन हजार घोडे आणि तीस हत्ती होते. त्याच्या मागे होता अडप्पानायक. याच्या हाताखाली एक लक्ष पायदळ, पाचहजार घोडदळ आणि पन्नास हत्ती होते. त्यानंतर होता कोंडमअसय्या. त्याच्या तैनातील एक लक्ष वीस हजार शिपाईदळ, सहा हजार स्वार आणि साठ हत्ती होते. त्याच्या मागे कुमार होता. त्याच्या हाताखाली ऐंशी हजार पायदळ, अडीच हजार घोडदळ आणि चाळीस हत्ती होते. त्यामागे होता ओगेमद्राही.[१०] बिसनागचा कारभार पहाणारा हा प्रमुख आपल्या एका सेनाधिकाऱ्याला घेऊन चालला होता. त्याच्या हुकमाखाली एक हजार घोडदळ, तीस पायदळ आणि दहा हत्ती होते. त्याच्या मागोमाग खास राजाचे असलेले तीन हिजडे होते. खुद्द राजासमवेत चाळीस हजार पायदळ, एक हजार घोडदळ आणि पंधरा हत्ती होते. राजाला विडे देणारा जो हुजऱ्या होता त्याच्याबरोबर पंधरा हजार पायदळ आणि दोनशे स्वार होते. पण हत्ती मात्र काहीच नव्हते. कोमारबेरकी[११] जवळ आठ हजार शिपाईदळ, चारशे स्वार आणि वीस हत्ती होते. बेगापूर[१२] आणि डोमार येथील सेनाधिकारी आपापल्या माणसांसह मिळून दुसऱ्या मार्गाने गेले. यांची संख्याही भरपूर होती. याच रीतीने इतरही काही सेनाधिकारी आपापल्या दहा—बारा हजार फौजेसह निघाले होते. मी त्यांच्याविषयी लिहीत नाही. कारण मला त्यांची नावे माहीत नाहीत. आपल्या राजाने साऱ्या राज्यातून निवडून काढलेले चाळीस हजार पायदळ आणि सहा हजार घोडेस्वार बरोबर घेतले होते. यात ढालाईत, तीरंदाज आणि तीनशे हत्तीचा समावेश होता.

प्रत्येक जण आपापल्या पध्दतीने शस्त्रसज्ज होता. तिरंदाज आणि बंदुकधारी यांनी चुणीदार अंगरखे घातले होते. ढालाईतांच्या तलवारी जंबिये असून, त्यांनी कंबरेपट्टे बांधलेले होते. ढाली एवढ्या मोठ्या की, शरीराचा बचाव करण्यास चिलखताची गरज पडू नये कारण त्या संपूर्ण शरीर झाकून टाकतात. घोड्यांवर पुरा साज चढवलेला होता. स्वारांच्या अंगात कुडती असून, हातात शस्त्रे होती. त्यांची शिरस्त्राणेही त्यांच्या कुडत्याप्रमाणेच सईदार होती. लढाऊ हत्तीच्या पाठीवर हौदा असून, त्यात प्रत्येक बाजूस चार माणसे बसून लढू शकत. हत्तीच्या सर्वांगावर झूल आणि त्यांच्या दातांना सुरे बांधलेले असतात. या सुऱ्यांना पाजळून धार दिलेली असते. त्यामुळे ते चांगलीच इजा

---

१०. साळुव तिम्मा चा भाऊ गोविंदराज.

११. स्युअलच्या मतानुसार हा श्रीरंगपट्टणचा कुमार वीरय्या आहे.

१२. डेव्हिड लोपेझने संपादित केलेल्या पोर्तुगीज संहितेत रयुमदे बेसगा असा उल्लेख आहे. नाव नेमके कोणते आहे हे समजत नाही. मतानुसार ते बंकापूर आहे. डोमार म्हणजे कसरती करणारे, बरेच आरडाओरडा करणारे डोंबारी असावेत. काही तेलगू शिलालेखात डोंबारी हा शब्द आढळतो.

करू शकतात. कित्येक तोफाही घेण्यात आल्या होत्या. असंख्य असणाऱ्या घोक्यांबद्दल मी लिहीत नाही. फौजेबरोबर असणाऱ्या कसबिणीविषयीही मी लिहीत नाही. राजाबरोबर असणाऱ्या या लोकांची संख्या वीस हजार होती. एवढ्या माणसांना सामानसुमान किती लागत असेल याची कल्पना कोणालाही करता येईल. फौजेच्या पिछाडीस पण राजा पाण्याच्या मार्गावर त्याच्या पुढ्यात दहा–बारा हजार भिस्ती पखाली घेऊन, रस्त्याच्या बाजूस उभे राहून लागेल त्यांना पाणी देत होते. तहानेने कोणी मरू नये म्हणून अशी व्यवस्था केलेली असते. या प्रचंड लष्कराच्या पुढे तीन–चार कोस अंतरावर पन्नास हजार टेहळे होते. पुढच्या प्रदेशात जाऊन टेहळणी करण्याचे काम त्यांच्याकडे होते. आपल्यात आणि लष्करात तीन चार कोसांचे अंतर त्यांना नेहमीच ठेवावे लागते. त्यांच्या दोन्ही बाजूस घोडदळातील दोन हजार स्वार असतात. हे सर्व तीरंदाज असून, टेहळणी पथकाच्या दोन्ही बाजूने आगेकूच करतात.

या क्रमाने ते सर्वजण बिसनागहून निघाले. यांच्यात व्यापारी बरेच होते. तसेच रसद असणारे लोक तर अगोदरच पुढे गेलेले होते. त्यामुळे कोणी कुठेही असला तरी त्याला पाहिजे ती वस्तू चटकन मिळे. प्रत्येक सेनाधिकाऱ्यांच्या तैनातीत व्यापारी दिलेले असतात. त्यांच्या माणसांना जे काही हवे असेल ते त्यांना पुरवावे लागते. सर्व जीवनावश्यक वस्तू त्यांच्याजवळ असतात.

इथे प्रघात असा आहे की, राजाला जेव्हा विश्रांती घ्यावयाची असेल किंवा झोपावयाचे असेल तेव्हा त्याचा तंबू उभा केलेला असतो. त्याच्याच पुढ्यात लाकूडकाट्याचे बाड लावतात. मार्गावर जिथे जिथे राजाचा मुक्काम झाला तिथे तिथे असे करण्यात आले. याच मार्गाने जातांना एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. फौज एक नदी ओलांडू लागली. तेव्हा नदीत अर्धा गुडघा पाणी होते. पण अर्धी नदी ओलांडणे झाले तेव्हा पाणी वाहणे बंद होऊन सगळी नदी कोरडी पडली. सैनिकांनी मग पाणी मिळावे म्हणून वाळूत खड्डे खोदले. अशा रीतीने मजल दरमजल करीत राजा मल्लीबाद या शहरापाशी आला. रायचूरपासून हे शहर कोसभर अंतरावर आहे. राजाने तेथे तळ ठोकला व थकल्याभागल्या सैनिकांना विश्रांती दिली.

मल्लीबाद शहरात मुककाम करून रायचूरच्या वेढ्यास आवश्यक असणारी तयारी राजाने केली. त्याचवेळी बिसनाग, डोम्मार येथील लोक तसेच असंख्य माणूसबळ असणारे काही सेनाधिकारी – हे सर्व त्याला येऊन मिळाले. सर्व व्यवस्था पूर्ण होताच ब्राह्मणांनी होमहवन व बली दान करून विजयासाठी देवाचा कौल मिळाला आहे सांगून याच मुहुर्तावर कूच करण्यास सांगितले.

पदरच्या मुसलमान सरदारांना राजाने बिनीवर पाठवले. रक्षक दलाचा प्रमुख कामानायक याने रायचूरच्या खंदकाजवळ तळ दिला आणि प्रत्येक सेनाधिकाऱ्याने

देण्यात आलेल्या आज्ञेप्रमाणे आपापल्या तुकड्यांसहित तळ दिले. शहरातील लोकांनी तोफा, बंदुका डागून आणि बाणांचा वर्षाव करून सलामीचा हल्ला केला. त्यामुळे इतके नुकसान झाले की, माघार घेण्याचा त्यांनी विचार केला. पण राजाने ते चालू दिले नाही. तो म्हणाला, ''लवकर शहर काबीज करून त्यात प्रवेश करता यावा यासाठी तुम्हाला पुढे पाठवले आहे तेव्हा खुशाल तेथेच मरा पण मागे जाऊ नका.'' तेव्हा निरुपाय होऊन त्यांना शहरावर हल्ला चढवावा लागला. यासाठी त्यांनी नेटाने लढाई केली. यात बरेच जण मृत्युमुखी पडले. कारण राजाच्या सैन्याचे सारखे हल्ले चालू होते. तेव्हा शहराच्या आतील लोकांची बाजू भक्कम होती आणि संरक्षणासाठी काय करावयाचे हे त्यांना व्यवस्थित माहीत होते. अनेक सैनिक मारले जाऊनही या चढाईचा काही उपयोग होत नाही हे पाहून सेनाधिकाऱ्यांनी हरतऱ्हेच्या युक्त्या वापरून सैनिकांना बक्षिसे देणे सुरू केले. ते येणेप्रमाणे – शहराच्या तटातील दगड, विटा सैनिकांनी काढून आपल्यास त्या त्यांच्या महत्वाप्रमाणे प्रत्येकी दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास फनाम अशा किमतीने त्यांनी विकत घेतल्या. या युक्तीमुळे शहराच्या तटास बऱ्याच ठिकाणी खिंडारे पडली आणि शहरात जाण्याचा मार्ग मोकळा झाला. पण शहर भक्कम मजबूत होते आणि आत असणारे निवडक सैनिक युध्दाला सरावलेले असल्या कारणाने त्यांनी राजाच्या पक्षातील बऱ्याच सैनिकांना ठार केले. तरीदेखील न कचरता, राजाच्या सैन्याने आपले हल्ले चालूच ठेवले. प्रत्येक नव्या चढाईबरोबर अधिकच धैर्य त्यांच्या अंगी येई. याचे कारण म्हणजे त्यांच्या सेनाधिकाऱ्यांनी कबूल केलेल्या इनामाची लालूच हे होय. द्रव्यलालसेमुळे त्यांचे मृत्यूचे भय निघून गेले होते. तटाच्या पायथ्याशी पडलेली प्रेते ओढून आणण्याबद्दलही त्यांना काही तरी मिळे. ही लढाई अशारीतीने तीन महिने चालू राहिली आणि मग खुद्द आदिलशहा कुमक घेऊन आला.

आता त्यावेळची रायचूरची परिस्थिती, ते शहर आणि त्यात असणारे लोक याविषयी तुम्हास अधिक सांगतो. दोन मोठ्या नद्यांच्या मध्ये, एका मोठ्या मैदानावर रायचूर शहर वसलेले आहे. मैदानात मोठी झाडे फारशी नाहीत, आहेत ती खुरटी झाडे आणि मोठमोठे दगड. दोन्ही नद्या शहरापासून तीन कोस अंतरावर आहेत. यापैकी एक नदी उत्तर सीमेवर असून तिच्या पलीकडे आदिलशहाचे राज्य आहे. दुसरी नदी दक्षिण[१३] सरहद्दीवर असून, ती नरसिंग राज्याची सीमा आहे. दोन नद्यांमधील विस्तीर्ण मैदानात मोठी तळे त्याचप्रमाणे शहर वसले आहे. तिथे विहिरी, झरे आहेत. तिथेच निसर्गत: निर्माण झालेली एक स्तनाकार टेकडी आहे. मजबूत बांधकाम असणाऱ्या तीन तटभिंती आहेत. यात चुना बिलकूल वापरलेला नाही. भिंतीना आतून मातीचा भराव घातलेला आहे. तटाच्या सर्वात उंच भागी एक मजबूत बालेकिल्ला बांधलेला असून, तेथे बारा महिने पाणी असणारा एक झरा आहे. इतक्या उंचीवर असणाऱ्या झऱ्याचे पाणी कधीही

१३. या दोन नद्या म्हणजे कृष्णा व तुंगभद्रा होत.

आटत नाही हा एक दैवी चमत्कार समजला जातो. झरा त्यामुळे पवित्रस्थान बनले आहे. या झऱ्याशिवाय तिथे अनेक विहिरी आणि पाण्याच्या टाक्या आहेत. त्यामुळे आतील लोकांना पाण्याच्या तुटवड्यामुळे शहर पडण्याची भीती कधी वाटली नाही. शिवाय पाच वर्षे पुरेल इतकी रसद आत त्यांच्याजवळ होती. आतमध्ये शिबंदीची आठ हजार माणसे, चारशे स्वार, वीस हत्ती आणि भारी दगडांचा मारा करून उपाय करू शकणारी तीस गोफणयंत्रे होती. तटावर असणारे बुरुज इतक्या जवळ अंतरावर बांधले होते की, एका बुरुजावरची कुजबूज दुसऱ्यावर ऐकू जावी. बुरुजांमध्ये आणि सभोवती सर्वत्र तोफखाना खडा केलेला होता. बारीकसारीक तोफा सोडल्या तर यातील मोठ्या तोफांचीच संख्या दोनशे होती. राजाचे सैन्य येऊन ठेपले आहे हे कळल्यानंतर आणि आदिलशहाचा एक सेनाधिकारी काही सैनिकांसह आत दाखल झाल्यानंतर शहराचे दरवाजे दगड, चुन्याने लिपून बंद करण्यात आले. मुख्य लढाई पूर्व बाजूस झाली. उत्तर दक्षिण बाजूस मोठमोठे खडक असल्यामुळे फार मजबूत होत्या. शहर सर्वच बाजूंनी वेढले गेले होते. राजाचा तळ पूर्व बाजूस होता आणि चढाईचा माराही त्याच बाजूस झाला.

# प्रकरण ८

## *राजाची छावणी इत्यादींचे वर्णन*

राजाच्या तंबूभोवती मोठे काटेरी बाड लावलेले असून, त्याला एकच प्रवेशद्वार होते. तिथे त्याचे पहारेकरी उभे असत. या राजाला स्नान घालणारा आणि राजा आपल्या जवळ नेहमी बाळगतो त्या देवमूर्तीची देखभाल करणारा ब्राह्मण, त्याचे खाजगीतले अधिकारी आणि त्याच्या अंतर्गृहात नेहमी आढळणारे हिजडे – या सर्वांच्या या बाडाच्या आवारात राहाण्याची सोय केलेली होती. त्या आवाराबाहेर ठराविक ठिकाणी उभे असलेल्या पहारेकऱ्यांचा अहोरात्र पहारा असतो. या खाजगीतल्या अधिकाऱ्यांची राहण्याची व्यवस्था या पहाऱ्याच्या लोकांबरोबर केलेली असते. येथून ते पुढच्या भागापर्यंत बाकीचे सर्व सेनाधिकारी हुकूमाप्रमाणे सांगितलेल्या ठिकाणी तळ देऊन राहातात. या सर्वांच्या पलीकडे, मी ज्यांचा अगोदर उल्लेख केला त्या टेहेळणीच्या पथकांचा स्वत:चा स्वतंत्र असा तळ असतो. त्याचे काम म्हणजे रात्रभर छावणीत फिरून पहारा घ्यायचा आणि कोणी हेर वगैरे दिसतील तर त्यांना पकडायचे. दुसऱ्या बाजूस धोब्यांचा मुक्काम पडलेला होता. कपडे धुण्यासाठी योग्य जागा असेल तिथेच त्यांचा तळ पडलेला असे.

व्यवस्थित रस्ते आखून छावणीचे निरनिराळे भाग केलेले होते. प्रत्येक सेनाधिकाऱ्याच्या भागात एक बाजार होता. तिथे बकरी, बोकड, डुकरे, कोंबडी, ससे, तितर आणि इतर पक्षी यांचे मांस मिळे. तेही इतक्या भरपूर प्रमाणात की, आपण जणू बिसनाग शहरात आहोत असे वाटावे. तांदूळ, ज्वारी, मूग इत्यादींची निरनिराळी धान्ये मुबलक प्रमाणात होती. या जीवनावश्यक वस्तूंच्या बाजाराखेरीज अजून एक बाजार होता. तिथे पाहिजे ती वस्तू भरपूर प्रमाणात मिळे. कारण आपल्याकडे जो माल फक्त धंदेवाईक किरकोळ व्यापाऱ्यांकडे असतो, तो सर्व इथे विकावयास होता. बाजारातील रस्त्यांवर आपापल्या कामात मग्न असणारे कारागीर लोकही होते. सोन्याचे, जडावाचे आणि दिखाऊ असे दागिने ते तयार करतांना दिसत. शिवाय माणिक, मोती, हिरे इत्यादी सर्वतऱ्हेचे जड जवाहिरही या बाजारात मिळे. कापडविक्रेही होते. यांची संख्या अगणित होती. कारण कापड सर्वांनाच लागे. हे कापड सुती असे. गवत आणि चारा, कडबा हे

बाजारात प्रचंड प्रमाणात होते. याचे विश्वसनीय वाटावे असे वर्णन करता येईल किंवा नाही याबद्दल मला शंका आहे. कारण रायचूरसारख्या ओसाड रेताड प्रदेशात गोष्टीचा सुकाळ असावा हे एक गूढच आहे. बत्तीस हजार चारशे घोडे, पाचशे एकावन्न हत्ती यांच्याखेरीज खेचरे, गाढवे आणि मोठ्या संख्येने असणारे, तंबू इत्यादी अवजड माल वाहून नेणारे बैल – या सर्वांना रोज किती गवत, चारा लागत असेल याची कल्पना करता येईल. खरी परिस्थिती माहीत नसणाऱ्या माणसाला आपण युध्दाच्या छावणीत आहोत असे स्वप्नातसुध्दा वाटणार नाही. उलट आपण एखाद्या संपन्न शहरात आलो आहोत असेच त्याला वाटेल. नगारे, तुताऱ्या आणि इतर वाद्ये यांच्या संख्येविषयी तर काय लिहावे ? लढाई सुरू होण्याचा इशारा म्हणून ही रणवाद्ये वाजू लागतात तेव्हा आकाश कोसळते की काय असे वाटते. यांचा गगनभेदी आवाज होत असताना एखादा पक्षी उडत आला तर घाबरून जाऊन तो खाली येई. छावणी पार करणे त्याला जमत नसे. या पक्षाला मग ते हातात पकडत. असे किती तरी पक्षी मुख्यत: घारी या लोकांच्या हाती पडल्या.

या विषयी लिहावे तितके थोडेच. ते कधीच संपणार नाही. म्हणून आता लढाईबद्दल लिहितो.

# प्रकरण १

## *राजाचा रायचूर शहरावरील हल्ला*

शहरास वेढा घातल्यानंतर राजास नक्की बातमी कळाली, की आदिलशहा नदीच्या उत्तरेस आला असून, तेथे त्याने तळ ठोकला आहे. राजाने शत्रूच्या हालचालींवर नजर ठेवून बातमी काढण्यासाठी आपले हेर पाठवले. आदिलशहाच्या आगमनाची बातमी कळताच छावणीत - विशेषतः शिपाई लोकात - गडबड उडाली. कारण त्यांची मने शंकाकुल झालेली होती आणि मुसलमानांबद्दल वाटणाऱ्या जुन्या भीतीचे दडपण अजूनही त्यांच्या मनावर होते. राजाची पुढची हालचाल कळण्यासाठी आणि तो हल्ला करण्यासाठी पुढे येतो की काय, हे पाहण्यासाठी आदिलशहा काही दिवस तिथेच थांबला, आदिलशहा आणि त्याच्याकडच्या लोकांना वाटले की, आपण आलो आहोत असे कळताच राजा एकदम पुढे येऊन हल्ला करणार; आणि आपण आहो तिथेच हल्ला झाला तर नदी असल्यामुळे बचाव करणे सर्वांत सोयीस्कर होईल, कारण त्याच्या छावणीला लागून असणारा पायउतार सोडल्यास नदीला इतरत्र कोठेही पायउतार नव्हता. त्याचा व्यवस्थित बंदोबस्त करावयाचे त्यांनी ठरवले. असे झाल्यास कोणालाच ही पायउताराची जागा घेता येणार नाही, मग (त्यांच्या दृष्टीने) काळ्या असणाऱ्या या लोकांची काय कथा, असे त्यांना वाटले.

गनीम नदीच्या पलीकडील बाजूस आहे ही खबर राजास मिळाली. पण त्याने काहीच हालचाल केली नाही. राजा पुढे सरकत नाही हे पाहून आदिलशहाने आपल्या मंत्र्यांशी सल्लामसलत केली. निरनिराळ्या लोकांनी निरनिराळी मते दिली. कारण राजाच्या हालचाल न करण्याचे प्रत्येकाचे कारण निराळे होते. बऱ्याच जणांचे मत असे पडले की, राजा आपल्या शत्रूला कस्पटासमान समजतो त्या द्वारे तो आपल्या लोकांना आपण किती सामर्थ्यशाली आहो हे दाखवू इच्छितो. त्यांचे म्हणणे असे होते की, राजा आपण नदी ओलांडण्याची वाट पाहत असून आपण नदीपार होताच तो आपल्यावर तुटून पडणार. हा विचार मांडणाऱ्यांमध्ये अमकोस्टम[1] हा प्रमुख होता.

---

१. हा बहुधा अंकुशखान असावा.

ज्या वेळेस डॉम ग्युटेर गोव्याचा लष्करी अधिकारी होता त्याच वेळेस हा अमकोस्टम पोंमदाचा सेनाधिकारी होता. इतर काही जणांना मात्र हा विचार मान्य झाला नाही. त्यांच्या मते भूतकाळात मुसलमानांनी हिंदूंवर जे अनेक विजय मिळवले होते त्यांच्या आठवणीने राजा भिऊन गेला आहे. पूर्वीच्या या लढायांमध्ये भाग घेतलेले कित्येक पोक्त सैनिक आजही त्याच्या बरोबर आलेले होते. या लोकांचा सल्ला असा होता की, पुढे होऊन नदी ओलांडावी, ते आदिलशहास म्हणाले, ''सरकारांनी दुबळेपणा दाखवू नये. जितका अधिका काळ आपण आहे तिथेच राहू, तितके आपल्याला कमी फायदेशीर ठरून त्यामागे आपण शत्रूलाही नीट खडे चारू शकणार नाही. आपण संख्येने हिंदूइतके नसलो तरी आपण पूर्वी त्यांच्याविरुध्द ज्या लढाया दिल्या त्यांच्या ताज्या आठवणींचा फायदा आपल्याला आहे.''

सरतेशेवटी आदिलशहाने आज्ञा केली की, आधी सर्व फौजेची हजेरी घेण्यात यावी आणि त्यानंतर योग्य काय करावयाचे ते ठरवण्यात येईल. फौजेची हजेरी घेण्यात आली तेव्हा आपल्याजवळ ढालाईत, भालाईत, तिरंदाज, बंदुकधारी यांचे एक लक्ष वीस हजार पायदळ, अठरा हजार घोडदळ, दीडशे हत्ती आहेत असे त्याला आढळले. हजेरी झाल्यानंतर खुद्द आदिलशहाने आपल्या फौजेची तपासणी केली. आदिलशहाकडे मोठा तोफखाना होता. या तोफखान्याची ताकद वापरून आपण नरसिंगच्या राजाचा पराभव करू असे तो म्हणाला. त्याने सर्वांना सुसज्ज होण्याची आज्ञा केली कारण तात्काळ नदी ओलांडून हल्ला चढवण्याचा त्याचा बेत होता. आदिलशहाला वाटले की, नदीच्या पलीकडे जाऊन थांबावे, सैन्याच्या तुकड्या पाठवून राजाच्या छावणीवर हल्ला करावा. त्यायोगे आपला पराभव होणार नाही आणि रायचूरही हातात राहील.

हावरेपणाने असा निश्चय करून आदिलशहाने पायउताराने नदी ओलांडली आणि राजाची छावणी होती तिथून तीन कोस अंतराच्या आतच तो येऊन थडकला. तिथेच त्याने आपला तळ दिला आणि भोवती मोठे खंदक खणून छावणी मजबूत केली. आपल्या तोफखान्याला त्याने सर्वांत पुढे ठेवले, निरनिराळ्या तुकड्यांचा स्थानक्रम ठरवला आणि शत्रूचा हल्ला झालाच तर काय करायचे हेही त्यांना सांगितले. पाणीपुरवठा तुटू नये या दृष्टीने त्याने नदीच्या काठाकाठानेच आपली छावणी उभी केली होती.

आदिलशहा नदीपार आला आहे ही खबर राजाला कळताच त्याने सर्वांना तयार होण्यास सांगितले. पण त्याचबरोबर शत्रूची पुढील चाल लक्षात येईपर्यन्त फौजेत कोणीही हालचाल करू नये अशी आज्ञा केली. नंतर शत्रूने तळ ठोकलेला असून, आपली छावणी बळकट केली आहे अशी पुढची खबर येताच राजाने सर्व फौजेने शत्रूवर चालून जावे

अशी आज्ञा केली. त्याने आपल्या फौजेचे सात भाग केले. कोमारबेरया [२] हा श्रीरंगपट्टण या मोठ्या राज्याचा स्वामी आणि राजाचा सासरा होता. त्याने आपल्याबरोबर आपले बत्तीस तरुण पुत्र आणले होते. या कोमारबेरयाने आपणास बिनीचा सेनाधिकारी करण्यात यावे अशी विनंती राजास केली. राजाने त्याला आदिलशहाच्या छावणीतून कोसभर अंतरावर तळ देण्याची आज्ञा केली. तसेच सर्वांना पहाटे शस्त्रसज्ज होण्यास फरमावले. कारण शत्रूवर हल्ला चढवण्याचा त्याचा हेतू होता. पण त्याच्या सल्लागारांनी सांगितले की, दिवस शुक्रवारचा असल्याने अशुभ आहे. तेव्हा शनिवारपर्यन्त हल्ला करू नये. शनिवार इकडे शुभ समजला जातो.

राजा रायचूर शहर सोडून जाताच शहरात असणाऱ्यांनी दरवाजे उघडले आणि एक खोजा सेनाधिकारी दोनशे हत्ती, काही शिपाई आणि यांच्यासह बाहेर पडला, आणि सतत नदीकाठाने राजाच्या मार्गावर राहिला. याचा हेतू काय हे कोणासही कळाले नाही. जो तो आपापला तर्क लढवत होता. राजा जिथे तळ देई तेथे हाही थांबे आणि राजाच्या छावणीत हेर पाठवून काय हालचाली चालू आहेत किंवा लढाईचा शेवट काय होणार याची खबर काढण्याचा प्रयत्न करी. दोन्ही फौजा जवळजवळ असल्याने कोणीही हत्यारे बाजूला ठेवली नाहीत. रात्रभर त्या जागता पहारा ठेवून असत.

शनिवारची पहाट फुटू लागली तसे राजाच्या छावणीत नगारे, तुताऱ्या इत्यादी रणवाद्यांचा आवाज सुरू झाला. लोक ललकाऱ्या देऊ लागले. आकाश कोसळून पृथ्वीवर पडते की, काय असे वाटू लागले. घोड्यांचे खिंकाळणे, त्यांची गडबड आणि हत्तीचे चित्कार - याचे वर्णन करणे कोणासही अशक्य आहे. पण सांगितले तर खरे वाटणार नाही की, रणवाद्यांचा प्रचंड ध्वनी ऐकून त्यांना भीतीने धडकी भरली. इतकेच काय पण प्रत्यक्ष जे लोक ही रणवाद्ये वाजवीत होते तेसुध्दा घाबरून गेले होते. शत्रूच्या फौजेतही कमी ध्वनी होत असे नव्हे. त्यामुळे कोणी बोलले तर त्याचे शब्द त्याला स्वतःलाच ऐकू येईनात आणि मग काय सांगावयाचे आहे यासाठी त्याला खाणाखुणा करून काम भागवावे लागे. छावणीतली सर्व फौज आघाडीवर पोहोचली. तेव्हा सूर्य वर येऊन चांगले दोन तास झाले होते. आघाडीवरील फौजेच्या दोन भागांना राजाने चालून जाण्यास सांगितले आणि धडाक्याने हल्ला करून शत्रू सैन्यातील एकालाही जिवंत सोडू नये अशी आज्ञा केली. या आज्ञेप्रमाणे इतका जोराचा हल्ला करण्यात आला की, राजाच्या सैन्यातील बऱ्याच तुकड्या मुसलमानांनी छावणीभोवती खंदक खणून ठेवले होते त्यांच्यावरपर्यन्त जाऊन पोहोचल्या. राजा आपल्यावर सर्व फौजेनिशी एकदम हल्ला करणार या तयारीत असणाऱ्या सैन्याला हे अपेक्षितच होते. अदिलशहा आणि त्याचे मंत्री यांनाही तसेच वाटत होते. यासाठी त्याने आपला तोफखाना जय्यत तयार ठेवला

---

२. कुमारवीरय्या.

होता. घाडसाने राजाची फौज पुढे आली की, त्यावेळी तिच्यावर तुटून बरेच शिरकाण करायचे, मग तोफा पुढे घालून त्यांचा मारा करायचा आणि राजाच्या सैन्याची धूळधाण करावयाची अशी त्याची योजना होती. पण राजाने ज्या तऱ्हेने हल्ला चढवला होता तो पाहाताच बचावासाठी आतापावेतो योग्य वाटलेली ही योजना आदिलशहाने सोडून दिली आणि सर्व तोफांना एकदमच सरबती देण्याचा हुकूम दिला. तोफांचा हा भडिमार एवढा मोठा होता की, त्यामुळे राजाच्या फौजेची बरीच हानी झाली. बरेचसे स्वार, पायदळ आणि कित्येक हत्ती मारले गेले. राजाच्या सैन्याला त्यामुळे नाईलाजास्तव मागे सरकावे लागले. शत्रूने माघार घेण्यास सुरुवात केली आहे हे पाहताच आदिलशहाचे सर्व सैन्य राजाच्या फौजेवर तुटून पडले. त्यामुळे घोडयावर एकही स्वार टिकला नाही, तसेच शत्रूस हिमतीने तोड देणाराही कोणी राहिला नाही. सर्व फौज पळत सुटली. मुसलमानांनी अर्धा कोस त्यांचा पाठलाग करून त्यांची कत्तल केली. आपले सैनिक पळत सुटले आहेत ते पाहाताच त्यांना उद्देशून राजा ''विश्वासघातकी, दगलबाज'' असे ओरडला. तो म्हणाला, ''माझ्या बाजूने कोण आहे हे आता मला कळेल, मृत्यू सर्वांनाच आहे. तेव्हा आपल्या प्रथेप्रमाणे शर्थीने लढून दैवात जे असेल ते पत्कारावे''. मग तो गरजला, ''माझ्याबरोबर कोण येतो ? ''तात्काळ त्याला साथ देऊ इच्छिणारे सर्व सेनाधिकारी व सरदार त्याच्याभोवती गोळा झाले. मग राजा म्हणाला, ''आजची वेळ अशी आहे की, जगातील सर्वश्रेष्ठ राजाला आपण ठार केले अशी फुशारकी आदिलशहा पुढे मारू शकेल. पण त्याला आपण जिकले अशी बढ़ाई मात्र तो मारू शकणार नाही.'' नंतर बोटातली एक अंगठी काढून ती त्याने आपल्या एका हुजऱ्याजवळ दिली आणि आपल्या मरणानंतर खूण म्हणून ती अंतःपुरातील राण्यांना नेऊन दाखवण्यास सांगितले, म्हणजे प्रथेप्रमाणे त्या सती जातील. नंतर राजा एका घोडयावर स्वार झाला आणि आपल्या उरलेल्या फौजेनिशी पुढे घुसला. कोणीही पळून जाऊ लागला तर त्यास दयामाया न ठेवता ठार करावे, असा हुकूम त्याने दिला. आपलेच लोक आपल्याला ठार करणार हे पाहाताच पळून जाणारे सैनिक निरुपयाने मागे फिरले आणि शत्रूवर तुटून पडले. हा हल्ला एवढा जोराचा होता की, एकाही मुसलमानाला त्यास तोड देता आले नाही. कारण त्यांचे सैन्य पाठलागावर असल्याने मोठया प्रमाणात विखुरलेले होते. मुसलमान सैन्यात मग एवढा प्रचंड गोधळ माजला की, जी छावणी सभोवती खंदक खणून त्यांनी मजबूत केली होती तिचादेखील बचाव करण्याचा प्रयत्न त्यांनी केला नाही. हताश होऊन जीव वाचवण्यासाठी त्यांनी नदीत उडया घेतल्या. त्यांच्या मागोमाग राजाच्या बऱ्याच तुकडया आणि हत्ती आले. या हत्तीनी त्यांची सारखी दाणादाण केली. आपल्या सोंडेत माणसांना धरून ते त्यांना छिन्नविच्छिन्न करून टाकीत. याचवेळेस वर हौद्यात असणाऱ्या सैनिकांनीही अगणित जणांना मारले.

याप्रमाणे शत्रूचा पाठलाग करीत राजाची फौज नदीपर्यन्त पुढे सरकली. तिथे घोर संहार होत असल्याचे तिच्या दृष्टीस पडले. कुठे छावणी सोडून आलेल्या स्त्रिया व मुले

मरून पडली होती तर तर कुठे पाणी भरपूर असलेले नदीचे पात्र न ओलांडता आल्यामुळे घोडे व स्वार एकत्रच मरण पावलेले होते. राजाची फौज नदीतीरावर उभी राहिली. कोणीही माणूस दिसला की तत्क्षणीच तो ठार केला जाई . नदीतून तीरावर येऊ पाहणारे घोडे पाय घसरून मागे फेकले जात आणि स्वारासकट त्यांचा शेवट होई. खेरीज हत्ती पाण्यात शिरून जो कोणी सापडेल त्याला सोंडेत धरून क्रूरपणे मारून टाकत. हे सर्व पाहून राजाचे अंतःकरण द्रवले. त्याने आपल्या सैन्यास माघारी फिरण्याचा हुकूम दिला. ज्यांचा काही अपराध नव्हता, जे मृत्यूस पात्र नव्हते, असे किती तरी लोक ठार झालेले आहेत असे तो म्हणाला. सर्व सेनाधिकाऱ्यांनी राजाच्या आज्ञेप्रमाणे आपापल्या तुकडया मागे घेतल्या.

राजाने नंतर आदिलशहाच्या छावणीत प्रवेश केला आणि खुद्द त्याच्या डेऱ्यामध्ये विश्रांती घेतली. पण राजाने विश्रांती घेणे बऱ्याच सेनाधिकाऱ्यांना रुचले नाही. ''शत्रूचा पूर्ण संहार करावा, हे काम आम्ही करू शकतो. स्वतः महाराजांना हे करण्याची इच्छा नसेल तर आम्हास आज्ञा व्हावी. पण दिवस बाकी आहे तोपर्यन्त शत्रूचा पाठलाग थांबवू नये.'' असे त्यांनी बोलून दाखवले. यावर राजाचे म्हणणे पडले की, ''बरेच निरपराधी लोक मृत्युमुखी पडलेले आहेत. आदिलशहाने आपली आगळीक केलेली असली तरी त्याबद्दल त्याला पुरेशी सजा झालेली आहे. शिवाय अजून रायचूर घ्यावयाचे ते मागे राहिले असल्यामुळे पुढे जाणे रास्त नाही. तेव्हा रायचूर जिकण्याच्या दृष्टीनेच सर्वांनी तयार व्हावे. यासाठी वेढा आता नवीन आणि अधिक चांगल्या पध्दतीने टाकावा लागणार आहे. ''राजाचा समज असा झाला होता की आदिलशहाची धुळीस मिळालेली इज्जत, नष्ट झालेले त्याचे सैन्यबळ आणि सत्ता हे पाहाता त्याला आता जीवितेच्छा उरली नसावी, तो रणांगणावरच मरण पावला असावा. पण खरी गोष्ट अशी होती की, आदिलशहा लढाईत स्वतः उतरलाच नव्हता. बेळगावचा सुभेदार असणाऱ्या असदखान 'सेफलरिम' याने त्याचे या धामधुमीत रक्षण केले होते. प्रसंग बाका येणार अशी भीती असदखानला होतीच. म्हणून आदिलशहाने स्वतःच्या सुरक्षिततेसाठी आपल्या रक्षक दलाची निवड करावी असा डाव त्याने धूर्तपणाने टाकला होता. या रक्षकदलात बाराशे स्वार होते. सगळी फौज पराभूत होऊन पळत सुटलेली पाहाताच तो आदिलशहाला म्हणाला, ''सरकार, जगायचे असेल तर माझ्या मागून या'' हे ऐकताच आपली छावणी आणि सर्व सामानसुमान सोडून देऊन आदिलशहा एका हत्तीवर बसला आणि असदखानच्या मागे निघाला. नदी मार्गाने जावयाचे नसल्यामुळे असदखानने पायउतार शोधण्याचा प्रयत्न केला नाही, तर दक्षिणेकडे टेकडयांच्या रांगा होत्या, त्या लगतच्या वाटेने तो पुढे गेला.

रायचूर शहरातून एक सेनाधिकारी दोनशे स्वार, हती आणि शिपाई यांच्यासह बाहेर पडला असे मी मागे लिहिले आहे. त्या अधिकाऱ्याचे काय झाले असे तुम्ही म्हणाल, तर

त्या विषयी सांगतो. रणांगणावर काय घडले याची पूर्ण खबर या अधिकाऱ्याने मिळवली होती. आदिलशहा पराभूत झाला आहे हे कळताच रायचूरच्या किल्ल्यात आश्रय घेण्यासाठी तो माघारी वळला. पण तेथील एका लष्करी अधिकाऱ्याशी त्याचे बिनसले होते. त्यामुळे शहरातील लोकांना त्याला आत घेण्याची इच्छा नव्हती. आपला जीव वाचवायचा कसा याचा विचार करणे त्याला आता भाग पडले. तेव्हा नदीच्या खालच्या अंगास अजून एक उतार होता. तिथून त्याने नदी ओलांडली आणि स्वतःस वाचवले. बऱ्याच जणांच्या मते याला शहरात प्रवेश नाकारण्यात आला याचे कारण म्हणजे आत असणाऱ्याला वाटले की याला बाहेर ठेवल्यास शहर आपल्या मालकीचे होईल आणि आपण त्यायोगे श्रीमंत होऊ.

# प्रकरण १०

## *मुसलमानांची केलेली लूट , राजाने केलेली प्रेतदहनाची व्यवस्था आणि किश्तोव्हांव द फिगैरेदुची कामगिरी यांविषयी .*

अशारीतीने छावणीत आल्यानंतर राजाने मुसलमानांची लूट एकत्र करण्याचा हुकूम दिला. पाच सेनाधिकारी सापडले, त्यांना कैद करण्यात आले. मरून पडलेल्या लोकांत काही सर्वोच्च लष्करी अधिकारी आढळून आले यात आदिलशहाच्या सर्व पलटणींचा प्रमुख सेनापती सलाबतखानही होता. मुसलमानांकडे असलेले पण नंतर त्याला येऊन मिळालेले पाचशे पोर्तुगीज त्याने आपले खास रक्षक म्हणून लढाईत आपल्या बरोबर ठेवले होते. आपल्या सैन्याचा पराभव होत आहे असे पाहताच सलाबतखानने लोकांना एकत्र करून तुकडी उभारण्याचा प्रयत्न केला पण ते त्याला जमले नाही कारण त्यांच्यापैकी एकालादेखील आपला जीव वाचवण्यापलीकडे दुसरे काही सुचले नाही. पराभूत होण्यापेक्षा मरण पत्कारलेले बरे असा विचार करून सलाबतखान राजाच्या सैन्यात घुसला, कापाकापी केली आणि असा आश्चर्यकारक पराक्रम गाजवला की, ज्यायोगे त्याची आणि त्याच्या बरोबरच्या पोर्तुगीजांची नंतर सदैव आठवण राहावी. त्यांचे शस्त्राघात एवढे जबरदस्त होते आणि कामगिरी इतकी धाडसी होती की, राजाच्या सैन्याने त्यांना पुढे जाऊ दिले. त्या सैन्यात त्यांनी इतका आत प्रवेश केला की, ते थेट राजाच्या रक्षक दलाजवळ जाऊन पोहोचले. तिथे सलबतखानचा घोडा मारला गेला. त्याच्या मदतीला धाऊन जाऊन पोर्तुगीजांनी बहादुरी दाखवली ती इतकी की, कित्येक जण मारले जाऊन त्यांच्या पाठीमागील मार्ग मोकळा झाला. तिथे येण्याची कोणासही हिमत झाली नाही. उत्तमतऱ्हेने लढून त्यांनी सलाबतखानला दुसरा घोडा मिळवून दिला. त्यावर स्वार होताच जो जणू मेढयाच्या कळपात शिरलेल्या क्रुध्द लांडग्यासारखा झाला. पण आता ते सर्व जण थकले होते, जखमी झाले होते आणि सर्व बाजूंनी हल्ला होत असल्यामुळे त्यांच्याभोवती शत्रूचा गराडा पडला होता. सरतेशेवटी सलाबतखान घोडयासकट खाली पडला. त्याला मदत करू पाहणाऱ्या पोर्तुगीजांपैकी एकही वाचला नाही. सर्व जण मारले गेले. स्वत: सलाबतखानाला बऱ्याच जखमा झाल्या. त्यामुळे तो

शत्रूच्या हाती पडून कैद झाला.

यावेळी राजाच्या हाती लागलेली लूट म्हणजे चार हजार ओर्मझचे घोडे, शंभर हत्ती, चारशे मोठया, अवजड तसेच लहानलहान तोफा, नऊशे तोफगाडया आणि कित्येक तंबू, अशी होती. बैल, ओझ्याचे घोडे आणि इतर जनावरे यांची तर गणतीच नव्हती. स्त्री-पुरुष, मुले हीदेखील बरीच हाती लागली. यापैकी स्त्रियांना राजाच्या हुकुमावरून सोडून देण्यात आले.

मृतांचे दहन व उतरक्रिया होईपर्यन्त राजाने छावणीत मुक्काम केला. लढाईत कामी आलेल्या आपल्या सैनिकांच्या आत्म्यांना सद्गती मिळावी म्हणून त्याने बराच दानधर्म केला. त्याचे जवळपास सोळा हजारच्यावर सैनिक मारले गेले होते. हे सर्व उरकल्यानंतर, राजाने आपला मोर्चा पुन्हा रायचूरकडे वळवला आणि पूर्वीप्रमाणेच तिथे तळ ठोकला.

राजा रायचूरला परत जात असताना क्रिश्तोव्हाव द फिगैरेदु त्याला भेटण्यासाठी आला. फिगैरेदु त्यावेळेस बिमनाग शहरात होता त्याच्याजवळ घोडेही होते. येताना त्याने आपल्याबरोबर वीस पोर्तुगीज बंदुकधारी आणले. शिवाय त्याची स्वत:ची बंदूकही होती. राजाला त्याचा सहवास आवडला. युध्द तसेच आपली सत्ता पाहाण्यासाठी तो आला आहे याने त्यास आनंद झाला. आदिलशहाच्या छावणीतून लुटलेले काही तंबू क्रिश्तोव्हांवस देण्याची त्याने आज्ञा केली आणि आपल्या डेऱ्याला लागून त्याची राहाण्याची व्यवस्था करण्यात यावी, असा हुकूम त्याने दिला. एके दिवशी क्रिश्तोव्हांवने शहर पाहण्याची इच्छा राजाजवळ प्रदर्शित केली. तेव्हा राजाने त्यास तसे करणे धोक्याचे असल्यामुळे हा विचार सोडून देण्यास सांगितले. पण क्रिश्तोव्हांवने उत्तर दिले की, लढाई म्हणजे पोर्तुगीजांचा नेहमीचा धंदा तेव्हा महाराजांनी कृपावंत होऊन मुसलमानांना पाहाण्याची परवानगी द्यावी. राजाने शेवटी ही विनंती मान्य केली. त्याच्या बरोबर काही लोकही दिले. शक्य होईल तितके लपतछपत, क्रिश्तोव्हांव द फिगैरेदु तटाजवळील खंदकापर्यन्त जाऊन पोहोचला. तटावर मुसलमान निर्भयपणे उघडयावर उभे आहेत असे पाहून त्याने आपल्याबरोबर आणलेल्या बंदुकधारी सैनिकांच्या मदतीने गोळीबार सुरू केला. त्यात बरेच मुसलमान मारले गेले. कारण त्यांनी आतापर्यन्त बंदूक किंवा त्यासारख्या शस्त्रांनी माणसे मारली जाताना पाहिलीच नव्हती, त्यामुळे धीटपणे व बेफिकीरवृत्तीने तटावर उभे होते. पण लवकरच तटावरून ते दूर झाले. त्यामुळे राजाच्या सैनिकांना सुरक्षितपणे तिथपर्यन्त पोहोचवण्याची संधी मिळाली. त्यांनी मग तटभिंतीचा बराच भाग पाडून टाकण्यास सुरुवात केली. क्रिश्तोव्हांव आपल्या माणसांसह शहरात घुसला आहे अशी बातमी छावणीत पसरून एकच गडबड उडाली. राजालाही ही वार्ता कळाली. शहरात असणाऱ्यांना बाहेर काय चालले आहे याचा पत्ता नव्हता, किंवा ही माणसे एकाएकी राजाच्या पदरी केव्हा आली

हेही त्यांना उमजेना, पण मग अगोदरच्या लढाईत पोर्तुगीज कसे शिरले होते हे त्यांना आठवले आणि आपला पराभव आता अटळ आहे असे त्यांना वाटले. कारण पोर्तुगीजांची मदत मिळाल्याने राजाचे सैनिक बेडरपणे थेट तटाशी येऊन थडकले होते. शिवाय तटभिंतीला ठिकठिकाणी खिंडारे पडली होती. खेरीज शहरातल्या तोफा इतक्या उंचावर होत्या की, तटाच्या पायथ्याशी असणाऱ्यांचे काही नुकसान होणे शक्य नव्हते. तटाच्या आतील भागास मातीचा भराव होता आणि खिंडारे पडली होती त्या ठिकाणी तोफा नव्हत्या. तटावर असणाऱ्या सैनिकांना शहरवासियांनी दगडधोंडे, बंदुका, बाण आणून दिले होते. खाली वेढा घातलेल्यांवर ते वरून यांचा मारा करीत. त्यामुळे राजाचे सैनिक तटापर्यन्त पोहोचले तरी निदान जखमी होत. पण क्रिश्तोव्हांवने तटावरील हे सर्व सैनिक टिपले. इतकेच नव्हे, तर आपल्या पोर्तुगीजांच्या मदतीने शत्रूला तटावर येणेच अशक्य करून टाकले. त्यामुळे साहजिकच हिंदूना सहजपणे तटाशी जाऊन भिडता आले.

एकदा राजाच्या सेनाधिकाऱ्यांनी क्रिश्तोव्हांवला विनंती केली की, मुसलमानांवर हल्ला करण्यासाठी त्याने त्यांना आपल्याबरोबर न्यावे. त्यातील काही प्रमुख अधिकाऱ्यांची मर्जी राखण्यासाठी त्याने काही वेळा त्यांना आपल्याबरोबर नेले. एके दिवशी त्याने आपल्या बंदुकधाऱ्यांची तीन तुकडयांत विभागणी केली आणि तटावर जो कोणी मुसलमान डोके वर काढील त्यास टिपण्यास सुरुवात केली. त्यात इतकेजण मारले गेले की, कोणाची तोंड दाखवण्याची हिम्मत होईना. नंतर राजाच्या सैनिकांनी अशाच तीन तुकडयांत आपली विभागणी करून कुदळी, पहारी यांच्या सहाय्याने तटास खिंडारे पाडण्यास सुरूवात केली. क्रिश्तोव्हांवने बाकी इतरांनाही स्वतःच्या हिमतीवर जोराने हल्ला करण्यास सांगून पाठवले. याचा परिणाम असा झाला की, शहराचे रक्षण करणाऱ्या सैनिकांनी बाहेरचा पहिला कोट सोडून दिला. बायका, मुलांना त्यांनी आश्रयासाठी आतील किल्ल्यात रवाना केले. आपल्या सैनिकांची उडालेली ही गाळण पाहून शहराच्या सेनाधिकाऱ्याने त्यांना धीर देऊन परत पाठवण्याचा प्रयत्न केला. तो स्वतः काही सैनिकांना घेऊन तटावर जिथे सर्वात जोराचा हल्ला होत होता तिथे आला आणि हताश न होता रक्षणासाठी पुन्हा तटावर येण्याविषयी त्यांना आवर्जून सांगू लागला. काही जणांनी त्याला उत्तर दिले की, ''या ठिकाणी खाली राजाच्या सैन्यावर मदत करणारे फिरंगी आहेत, त्यामुळे कोणीही तटावर दिसला की, तो मेलाच म्हणून समजावे.'' हे पोर्तुगीज आहेत कुठे हे पाहण्यासाठी तो सेनाधिकारी तटाच्या कमानीतून किंचित वाकला. त्याच क्षणी एक बंदुकीची गोळी त्याच्या कपाळात मध्यभागी लागली आणि तो गतप्राण झाला. ही गोळी स्वतः क्रिश्तोव्हांवने झाडली होती असे मुसलमान म्हणू लागले. ते त्यांनी नीट लक्षातही ठेवले. अशारीतीने मुख्य सेनाधिकारी मारला जाताच शहरात एकच शोककल्लोळ उडाला. तट पूर्ण मोकळा पडला. राजाचे सैनिक आता पाहिजे ते करू शकत होते. शहरात उडालेला हाहाकार त्यांच्या लक्षात आला.

आता कोणी तट लढवत नाही हे त्यांना कळून चुकले म्हणून पुढे काय होते ते पाहण्यासाठी ते मागे फिरले आणि त्या दिवसापुरती लढाई बंद झाली.

# प्रकरण - ११

## *शहरातील लोकांनी कळवलेल्या शरणागतीच्या अटी आणि राजाने त्यांनी दिलेले अभय .*

दुसऱ्या दिवशी म्हणजे आदिलशहाच्या पराभवानंतर विसावे दिवशी शहरवासियांनी एक दरवाजा उघडला आणि पुढे पांढरे निशाण घेऊन, हात वर उचलून, दयेची याचना करीत राजाच्या छावणीकडे ते निघाले.

त्यांच्या आगमनाची वार्ता जेव्हा राजाला कळवण्यात आली तेव्हा त्याने आपला प्रधान साळुवतिम्म यास त्यांची भेट घेण्यास सांगितले. त्याला येताना पाहून राजा आपल्याला दया दाखवील असे त्या लोकांना वाटले. नंतर ते राजा होता तिथे आले. दीनवाणे होऊन त्यांनी रडत, ओरडत राजासमोर लोटांगण घातले आणि त्याच्या दयेची व कृपेची याचना केली.

राजाने त्यांना उठण्यास सांगितले आणि त्यांच्या जीविताचे तसेच मालमत्तेचे रक्षण होईल असे आश्वासन दिले. निर्धास्तपणे त्यांनी शहरात परत जावे असे त्यांना सांगून दुसऱ्या दिवशी आपण खुद्द शहरात येणार आहोत असेही सांगितले. नंतर एका सेनाधिकाऱ्याला शहराचा ताबा घेण्याची आज्ञा त्याने केली.

मुसलमान याप्रमाणे राजाच्या पुढयात असताना सभोवार असणाऱ्या सैनिकांमधील क्रिश्तोव्हांव द फिगैरैदुवर त्यांची नजर पडली. तेव्हा त्यांनी राजाला सांगितले की, या परकियांमुळेच शहराचा पाडाव झाला असून, त्यानेच आपल्या लोकांच्या मदतीने प्रमुख सेनाधिकारी आणि इतर कित्येक मुसलमान ठार केले होते. राजाने यावर क्रिश्तोव्हांवकडे दृष्टिक्षेप टाकून संमतीदर्शक मान हलवली आणि आपल्या लोकांना तो म्हणाला, ''पाहा, एक चांगला माणूस किती तरी थोर कामे करू शकतो.'' नंतर तो आपल्या तंबूत परतला, शहरातील लोक शहराकडे परत फिरले आणि राजाच्या सैन्याने आनंदोत्सव करण्यास सुरूवात केली.

# प्रकरण १२

## *राजाचा शहरात प्रवेश , त्याप्रीत्यर्थ झालेला उत्सव आणि त्याने लावलेली शहराची व्यवस्था .*

दुसरा दिवस उजाडताच राजाने नेहमीप्रमाणे आपली पूजाप्रार्थना आटोपली. विजय प्राप्त झाल्याबद्दल देवाचे आभार मानले (कारण प्रामुख्याने अशाप्रकारचा विजय मिळावा म्हणून इकडे देवाची प्रार्थना करण्यात येते.) नंतर प्रमुख सरदार, सेनाधिकारी आणि स्वत:चे रक्षक दल यांच्यासह तो शहरात जाण्यास निघाला. तिथे शहरातील नागरिक त्याच्या आगमनाची प्रतीक्षा करीत उभे होते. त्यांची खरी मन:स्थिती कशीही असली तरी त्यांनी आपले चेहरे धीर धरून प्रफुल्लित ठेवले होते. राजाच्या मागोमाग ते घोषणा देत होते. ''ज्या ईश्वराने आमचे रक्षण करण्यासाठी इतक्या वर्षानंतर तुम्हाला पाठवले तो ईश्वर धन्य होय.'' या आणि इतर अशा शब्दांनी त्यांनी राजाला अभय मागितले आणि दयेची याचना केली. अशा थाटात राजाची स्वारी मुख्य किल्ल्यालगत येऊन पोहोचली. तिथे जाताच राजाने शहरातील सर्व प्रतिष्ठित नागरिकांना बोलावून घेतले आणि त्यांच्या मालमत्तेला हात लावण्यात येणार नाही असे आश्वासन दिले. ''स्वत:चे जीवित आणि वित्त याबाबतीत काय करायचे ते ठरवण्यास तुम्ही मोकळे आहात'' असेही तो म्हणाला. ज्यांना शहरात राहावयाचे असेल त्यांना पूर्वीप्रमाणे राहता येईल आणि ज्यांना शहर सोडून जावयाचे असेल त्यांनी मालमत्तेसह ते तात्काळ सोडावे असेही त्याने सांगितले. हे ऐकताच सर्वांनी हात उभारून ईश्वराचे आभार मानले आणि राजाचा कनवाळूपणा पाहून कृतज्ञतेने त्याच्यापुढे जमिनीवर लोटांगण घातले. राजा अशाप्रकारे मग्न असताना ''सैनिकांनी शहरात लुटालूट चालू केली आहे अशी बातमी काही जणांनी त्याला तेथे येऊन दिली. राजाने तात्काळ हुकूम देऊन ती बंद करवली आणि लुटलेली चीजवस्तू ज्यांची त्यास परत करावयास लावली. पण अशाप्रसंगी पराभूत झालेले लोक जीव वाचला यातच समाधान मानतात. परत मिळणाऱ्या चीजवस्तूंचे फारसे महत्त्व त्यांना नसते. यामुळे बंदी केली होती तरी मोठमोठया चोऱ्या झाल्याच. नंतर यापैकी काही राजाच्या कानावर आल्या तेव्हा त्याने अपराध्यांना पुरेपूर शासन केले.

थोडयाच अवधीत आदिलशहाच्या पराभवाची वार्ता हिंदुस्तानात तसेच जिथे आदिलशहा सुलतान होता त्या अंतर्गत भागातही सर्वत्र पसरली. झेमुल्को, माद्रेमुल्को, देसूती, व्हिरिडो[१] या आणि इतर दक्षिणच्या बादशहाचे मांडलिक असणाऱ्या सुलतानांनाही ही बातमी कळाली. काही प्रमाणात त्यांना आनंदही झाला. कारण ते आदिलशहास पाण्यात पाहात, पण त्याचबरोबर स्वतःच्या सुरक्षितेविषयीदेखील ते चिंताग्रस्त झाले. म्हणून या सर्वांनी राजाकडे आपापले वकील पाठवण्याची व्यवस्था केली. वकील येऊन पोहोचले तेव्हा राजा रायचूर शहरातच होता. एवढया मजबूत शहराचा राजाने पाडाव केला याचे आश्चर्य तर त्यांना वाटलेच, पण त्याचबरोबर त्याचे अफाट सैन्य व सत्ता पाहून ते दंग झाले, शहरात येऊन पोहोचताच या वकिलांनी आपापल्या दरबारातून आणलेले खलिते राजास सादर केले. हे खलिते तावडतोब वाचण्यात आले. यात सुलतानांनी राजास लिहिले होते की, ''आपण आदिलशहास जिंकून घेतले हे योग्यच झाले. पण आता यापुढे युध्द चालवू नये. आदिलशहाकडून जे जे जिंकून घेतले आहे ते त्यास परत करावे असे न केल्यास आम्ही तुमच्या विरुध्द जाऊन आदिलशहास सामील होऊ आणि त्याने जे गमावले आहे ते त्यास मिळवून देऊ.'' पत्रातील हा मजकूर पाहून राजाने त्या सर्वांना एकच खलिता लिहून जबाब दिला तो असा : सन्माननीय माद्रेमुल्को, झेमुल्को, देस्कर, व्हिरिडे[२] आणि दक्षिणचे इतर सुलतान आपण पाठवलेले खलिते मी पाहिले आणि त्यातील मजकुराबद्दल मी आपला आभारी आहे. आदिलशहाच्या बाबतीत म्हणाल तर मी जे काही त्याचे बरेवाईट केले आहे आणि त्याच्याकडून जिंकून घेतले आहे त्याची सर्व जबाबदारी त्याच्यावरच येते. जिंकून घेतलेले त्याला परत करण्याबद्दल म्हणाल, तर ते आम्हास संयुक्तिक वाटत नाही आणि ते मी करणारही नाही. तुम्ही म्हणता त्याप्रमाणे मी न केल्यास तुम्ही माझ्या विरुध्द जाऊन त्याला सामील होऊन मदत करणार असे खलित्यात आहे. त्याविषयी एवढेच सांगतो की, ही तसदी तुम्ही घेण्याचे कारण नाही. आपापल्या राज्यात हिंमत धरून माझी वाट पाहाणार असाल तर आम्ही स्वतःच शोध घेत तुमच्याकडे येतो - हाच माझा तुमच्या खलित्यास जबाब आहे. मग आलेल्या दूतांना भेटवस्तू देण्याची आज्ञा देऊन त्याने आपले उत्तर त्यांच्यासमवेत रवाना केले.

---

१. नूनीशने याअगोदर देस्तूरव्हिरिडो असे एकच नाव वापरले होते. ते तोडून आता देस्तूर व व्हिरिडो अशी दोन नावे तो वापरतो.

२. देस्तुरव्हिरिडो या एका नावाची पुन्हा दोन नावांत विभागणी केली आहे.

# प्रकरण १३

## *बरेचसे लोक रायचूर सोडून जातात , राजाने त्यांच्याशी केलेले कनवाळूपणाचे वर्तन*

बरेचसे लोक शहर सोडून गेले आणि ज्यांच्यापाशी जाण्यासाठी काहीच शिल्लक राहिले नव्हते त्यांना राजाने प्रवासास लागणारी आवश्यक ती शिधासामुग्री देवविली. राजा नंतर काही दिवस तेथेच राहिला. शहराची शासनपध्दती बसवून दिली. ढासळलेल्या तटाची डागडुजी करवून घेतली. शहराची हिफाजत व्हावी म्हणून पुरेशी फौज मागे ठेवली आणि मग तो बिसनागच्या मार्गाला लागला. बिसनागमध्ये त्याचे विजयी स्वागत झाले. उत्सव करण्यात आले आणि आपल्या सैनिकांना त्याने मोकळ्या हाताने इनामे दिली.

उत्सव संपताच तो नव्या शहरात गेला. तेथे त्याला आदिलशहाचा वकील आल्याचे सांगण्यात आले. वकील आल्याचे त्याला आधीपासून कळाले होते तरी त्याने माहीत नसल्याचे दाखवले. कारण एखादा वकील आल्यानंतर स्वतः राजाने कोणास पाठवून त्याचे स्वागत करण्याची प्रथा नाही. हा वकील बिसनाग शहरातच मुक्कामास होता. दोन कोस अंतरावरील नव्या शहरात राजा असल्याचे त्यास माहीत होते म्हणून तो स्वतःच तिथे आला. आणि शहराजवळच तळ देण्यास आपल्या माणसांना त्याने सांगितले. त्याचा डेरा अतिशय सुंदर उत्तम असून, त्या भागात आतापर्यन्त लोकांनी असा डेरा कधी पाहिला नव्हता. या वकिलाचे नाव मतुलोटम; असे होते. त्याने आपल्याबरोबर दीडशे घोडे, तैनातीस बरीच माणसे आणि कित्येक ओझ्याची जनावरे ज्यात काही उंटही होते - आणली होती. आदिलशहाच्या कचेरीतील दोन चिटणीसही त्याने बरोबर आणले होते. अशारीतीने आदिलशहाच्या अधिकाराची कुलमुखत्यारीच जणू त्याला मिळाली होती.

याप्रमाणे मुक्कामाची सोय लागल्यावर वकिलाने राजाला आपल्या येण्याची वार्ता दिली आणि राजाने लवकर भेट ठरवून देऊन आपल्याला त्वरित जाऊ द्यावे अशी विनंती केली. राजाने त्याला उत्तर दिले की, भेट निश्चितच होईल, पण तुम्ही उतावळे होऊ नये

कारण आम्ही स्वतः च नुकतेच आलेलो आहोत. सवडीप्रमाणे योग्य समयी तुम्हाला जाण्याची परवानगी मिळेल. याप्रमाणे पुढे तो वकील महिनाभर तिथेच राहिला. त्या अवधीत त्याला राजाची भेट मिळालीच नाही, किंवा तो का आला आहे याची चौकशीही राजाने केली नाही. वकील रोज राजवाड्यात जाई. राजाचे वर्तन पाहून शेवटी त्याचे बोलावणे येईपर्यन्त वाट पाहण्याचे त्याने ठरवले. तरीसुध्दा रोज राजवाड्यात जाऊन सरदारांशी भेटून बोलण्याचा क्रम त्याने चालू ठेवला. एके दिवशी राजाने त्याला निरोप पाठवला की, उद्याचा दिवस शुभ असून तुम्ही का आला आहात हे कळून घेण्याची आमची इच्छा आहे. एवढया मोठया प्रतापी राजाच्या भेटीस जाण्यास योग्य तयारी वकिलाने केली.

त्याच्यावर सोपवण्यात आलेल्या कार्याला अनुरूप ठरेल म्हणून त्याने शहरातील काही मुसलमानांना बरोबर घेतले. शिवाय प्रथेप्रमाणे तुताऱ्या, डंका इत्यादी लवाजमाही त्याच्याबरोबर होता. याप्रमाणे तो राजवाड्यात गेला. तेथे सरदार आणि खाजगीतील अधिकारी यांनी त्याचे सन्मानपूर्वक स्वागत केले. पहिल्या दरवाजाच्या आतील दालनात राजाच्या परवानगीची वाट पाहात ते बसून राहिले. लवकरच वकिलास प्रवेश द्यावा अशी आज्ञा झाली.

रिवाजाप्रमाणे वकिलाने राजाला आदबीने प्रणाम केला. राजाचे मंत्रिमंडळ सभोवती उभे होते. ''आपल्या वकिलीचा मनसुबा काय असेल तो सांगावा, महाराज ऐकण्यास तयार आहेत.''असे त्यास सांगण्यात आले. ही आज्ञा होताच त्या वकिलाने, अशा थोर राजाच्या पुढयात असताना उचित असणारी लीनतेची वर्तणूक ठेवून आपल्या मालकाचा निरोप राजाला सांगितला तो असा -

# प्रकरण १४

## *वकिलाने राजाच्या दरबारात पार पाडलेली कामगिरी*

''हुजूर, माझा मालक आदिलशहा याने मला आपणाकडे पाठवले आहे आणि माझ्या तोडाने तो आपणास अर्ज करू इच्छितो की, आपण योग्य तो इन्साफ संतोषपूर्वक द्यावा त्याच्या हुकूमावरून मी हे आपणास मागत आहे की, त्याच्या मनात आपल्याविषयी सदिच्छा आहे कारण आपण जगातील थोर, सत्यप्रिय व न्यायी असे राजे आहात त्याच्याशी असलेले मैत्री व सलोख्याचे संबंध आपण अकारण तोडले ते आजचे नसून, पूर्वपारचे आहेत कारण काही वर्षांपूर्वी सलोखा झाला होता आणि त्याच्या अटी आजपर्यन्त सर्व राजांनी नेकीने पाळल्या होत्या आदिलशहाचे म्हणणे असे की, आपले राज्य सोडून आपण त्याच्यावर अशी स्वारी का केली उमजत नाही. रायचूरला आपला वेढा पडल्याची खबर त्याला मिळाली तेव्हा त्याला कसलीही शंका आली नाही पण त्याच्या आसपासचा प्रदेश लुटून त्याची धूळधाण करता आहात हे कळल्यावरून रक्षणासाठी त्याला यावे लागले. नंतर त्याचे सर्व दरबारी मारले गेले आणि त्याची छावणी लुटण्यात येऊन तिचा पुरता नाश करण्यात आला हे सर्व पाहण्यास आपण स्वतः तिथे होता. तरी या सर्वांची भरपाई करावी आणि लूटीत घेतलेले हत्ती, घोडे, तोफखाना, तंबू व इतर सर्व सामान परत करण्यात यावे, तसेच रायचूरही परत द्यावे. अशी विनंती त्याने आपणास केली आहे. ही मान्य करून आपण त्यांची सर्व मालमत्ता परत केली तर आम्ही आपले सदोदित एकनिष्ठ दोस्त राहू पण विनंती मान्य न केल्यास ती तुमची कृती वाईट ठरेल, मग ती आपणास कितीही संतोषजनक वाटो '' एवढे बोलून, अधिक काही न मागता वकील थांबला. यावर राजा म्हणाला की, ''आता तुम्ही परत जाऊन विश्रांती घ्यावी, आम्ही तुम्हाला उद्या रजा देऊ.'' मग राजाने प्रथेप्रमाणे वकिलाला रेशमी अंगरखा व इतर वस्त्रे यांच्या भेटी दिल्या.

# प्रकरण १५

## *राजने वकिलास बोलावून दिलेले उत्तर*

दुसरे दिवशी राजाने वकिलास दरबारात बोलावून घेतले आणि इतर गोष्टींविषयी बोलणे झाल्यानंतर तो वकिलास म्हणाला की, ''आदिलशहाचे जे म्हणून आम्ही काही जिंकून घेतले आहे ते त्याला त्याच्या इच्छेप्रमाणे आनंदाने परत करू, सलाबतखानालाही कैदेतून सोडू. फक्त अट अशी की स्वत: आदिलशहाने येऊन आमच्यापायी डोके ठेवावे.'' हे ऐकून वकिलाने राजाचा निरोप घेतला व तो तावडतोब आपल्या डेऱ्यात परतला. तिथे जाऊन राजाच्या भेटीत काय घडले याविषयी एक खलिता तयार केला आणि बरोबर आणलेल्या एका चिटणीसाकरवी तो आदिलशहाकडे रवाना केला. थोडयाच अवधीत आदिलशहाचे उत्तर आले. त्यात त्याने लिहिले की, ''बिसनागला येता येत नसल्यामुळे राजाची भेट कशी व्हावी ? तरीसुध्दा आम्ही त्यांच्या मर्जीनुसार सर्व काही करण्यास आनंदाने तयार आहोत.'' हा जबाब घेऊन वकील राजाकडे गेला. आदिलशहाकडून जिंकून घेतलेल्या सर्व गोष्टींपेक्षा त्याने समक्ष येऊन आपल्या पायावर डोके ठेवावे हे राजाला जास्त महत्त्वाचे वाटत होते. म्हणून वकिलास म्हणाला, ''तुम्ही आदिलशहाला राज्याच्या सरहद्दीपर्यन्त येण्यास सांगा. आम्ही स्वत: तिथे येऊ.'' वकिलाने हे मान्य केले आणि सरहद्दीपर्यन्त यावे म्हणून आदिलशहाचे मन वळवण्यासाठी तो माघारी परतला. इकडे राजा तात्काळ सरहद्दीवर असलेल्या मुदगल या शहरास रवाना झाला. प्रतीक्षा करत तो तिथेच थांबला. आदिलशहा येण्याचा मार्गावर असून, जवळ आलेला आहे, असे त्यास कळाले. त्याला भेटण्यासाठी तावडतोब तो निघाला आणि दक्षिणेच्या राज्यात शिरला. आदिलशहास भेटण्याची त्याची खूप इच्छा होती. पण आदिलशहास मात्र राजाची भेट घेण्याची हिंमत होईना. इकडे राजा मात्र पुढे पुढे सरकत होता कारण आदिलशहा आता अगदी जवळच आला आहे, अशी त्याला खबर मिळत. याप्रमाणे तो थेट विजापुरापर्यन्त येऊन पोहोचला. हे शहर दक्षिणेतील सर्वात मोठे शहर असून, तिथे तिथल्या पध्दतीनी बांधलेली अनेक सुंदर घरे आहेत. शहरात बागबगीचे द्राक्षकुंज असून, डाळिंब, संत्री, लिंबू यांच्या तसेच इतर अनेक फळबागा आहेत.

अशा सुंदर शहरात आदिलशहाची वाट पाहाणे बरे, असा राजाने विचार केला. आदिलशहा आलाच तर त्याने आपल्याला येथवर यावयास लावले या अपमानाचा बदला घेण्यासाठी त्याला कैद करावयाचे किंवा मृत्युदंड द्यावयाचा असा निर्धार त्याने केला. आपल्या शत्रूची येण्याची हिमत होत नाही हे पाहून राजाने बरेच दिवस[१] त्या शहरात मुक्काम केला. पुढे पाण्याचा तुटवडा पडल्यामुळे तो माघारी फिरला. विजापूर शहर एका मोठया मैदानात वसलेले असून, पावसाच्या पाण्याच्या साठा ज्यात होतो असे दोन मोठे तलाव मोडल्यास पाणीपुरवठयाचे दुसरे साधन शहरात नाही. राजाला शहरात जास्त दिवस राहता येऊ नये म्हणून हे तलावदेखील मुसलमानांनी फोडून रिकामे केले होते. त्यामुळे राजाला परत जाणे भागच होते. पण शहराची नासधूस मात्र फार झाली. ती राजाज्ञेवरून झाली असे नव्हे. पण स्वयंपाकासाठी लाकूडफाटा लागत होता म्हणून त्याच्या फौजेने इतक्या घरांची मोडतोड केली होती की, ते पाहाणारा उद्विग्न व्हावा. याचे कारण म्हणजे शहरात सरपणाची फार टंचाई होती, जे काही सरपण असे ते लांबून आणावे लागे. आदिलशहाने राजास निरोप पाठवून विचारले की, ''सरदार, सेनाधिकारी यांच्या घरांनी असे काय केले होते म्हणून त्यांची नासधूस करण्याचा हुकूम आपण दिला ?'' कारण आता स्वत: राजा जिथे उतरला होता ते आदिलशहाचे घर सोडल्यास इतर कोणाचीही घरे शाबूत राहिली नव्हती. राजाने उत्तर पाठवले की, जे झाले ते त्याच्या आज्ञेवरून झाले नव्हते. तर त्याची माणसे आज्ञेबाहेर गेल्याने तसे झाले.

राजा मुदगलला परतल्यावर आदिलशहा विजापुरास आला. शहराची झालेली धूळधाण पाहून आपल्याच चुकीमुळे हे सर्व झाले असे त्याला वाटले. राजाकडे आपण गेलो असतो तर ही नासधूस झाली नसती असे त्यास वाटले, निदान आता तरी राजाची भेट घ्यावी, आपण तसे करण्यास अगोदरच तयार होतो पण आपल्याला योग्य सल्ला मिळाला नाही, असे तो म्हणाला. नंतर त्याने आपल्या मंत्र्यांशी सल्लामसलत केली. राजाशी मैत्री केली तर आपल्या राज्याची स्थिती मजबूत होईल, त्याच्याशी हातमिळवणी केल्यास राज्याचे वैभव वाढेल आणि त्या आधारावर आपल्या इच्छेप्रमाणे सर्व गोष्टी पार पाडता येतील असे मत त्याने मांडले. या आणि इतर अशा अनेक बाबींचा विचार त्याने आपल्या सल्लागारांशी पुन्हा पुन्हा बोलून केला. तेव्हा बेळगावचा सुभेदार असदखान म्हणाला की, राजाकडे जाण्यास त्यास परवानगी मिळावी. असदखान स्वत: लढाईत आदिलशहाबरोबर पळून आला होता. सल्लामसलतीच्या कामात तो धूर्त आणि हुशार होता. तो आदिलशहास म्हणाला की, ''राजाकडे जाण्याची आज्ञा मिळाली. तर मी सर्व गोष्टी ठीकठाक करून आपणास पाहिजे ते घडवून आणतो.'' राजाने ही विनंती तत्परतेने मान्य केली.

---

१. विजापुरात सापडलेल्या एका शिलालेखानुसार कृष्णदेवरायाचा मुक्काम इथे चार दिवस होता. या घटना २३ मार्च १५२२ रोजी घडल्या.

असदखानाने राजाकडे जाण्याची ही कामगिरी अंगावर घेतली ती आदिलशहाची सेवा करण्याच्या हेतूने नव्हे, कारण ते इतर अजून कोणीही करू शकला असता. या पाठीमागे त्याचा अंतस्थ उद्देश दृष्ट होता. राजाने बिसनागला ज्याला कैदेत ठेवले होते त्या सलाबतखानाला असदखान नेहमी पाण्यात पाहात असे. कारण असदखानानेच आदिलशहाला सल्ला देऊन लढाईतून पळून जाण्यास सांगितले, हे सलाबतखान जाणून होता. या भित्रेपणामुळेच सर्व सैन्याचा नाश झाला होता. सलाबतखानाला भेटण्यासाठी जे कोणी गेले अगर पाठवले जात त्यांच्याशी बोलताना तो असदखानाविषयी संतापाने बोले. तो म्हणे की, आता तुरुंगातून सुटायचे ते एकाच गोष्टीसाठी. ती म्हणजे आपला कट्टर शत्रू असणाऱ्या असदखानावर चाल करणे. असदखानाला या सर्व गोष्टीचा सुगावा लागलेला होता. सलाबतखानाला कैदेतून सोडले तर तो बोलल्याप्रमाणे करेल हे ते जाणून होता. ते टाळण्यासाठी म्हणून आपल्या शत्रूचा काटा काढण्याचे त्याने ठरवले होते. याविषयीची माहिती पुढे योग्य ठिकाणी येईलच. पण वकील म्हणून आपणास राजाकडे पाठवण्यात यावे, अशी विनंती असदखानाने आदिलशहास केली होती, त्यामागील अंतस्थ कारणे अशी निराळी होती. त्याची विनंती आदिलशहाने मान्य केली.

# प्रकरण १६

## *असदखान राजाकडे वकील म्हणून जातो आणि सलाबतखानाचा काटा काढण्याचा घाट घालतो*

असदखान मग आदिलशहाकडून राजा होता त्या मुदगल शहरास रवाना झाला. बरोबर त्याने काही स्वार आणि तैनातीस चाकर मंडळी घेतली होती. त्याला निरोप देण्यासाठी म्हणून आदिलशहा नदीपर्यन्त गेला. मुदगल शहरास आल्यानंतर असदखानाला आत प्रवेश करण्याची परवानगी राजाकडून मिळाली. राजाने बोलावणे येईपर्यन्त तो शहरास बरेच दिवस राहिला. नंतर त्याची राजाशी भेट झाली. वाटाघाटीच्या कामात चतुर आणि धीट असलेल्या असदखानाने आदिलशहाच्या हातून घडलेल्या चुकीचा खुलासा राजास दिला. राजाशी बोलण्याची धाटणी त्याला इतकी व्यवस्थित माहीत होती की, राजाच्या मनात असलेला आदिलशहा विरुध्दचा सर्व संताप व त्वेष त्याने पार घालवून टाकला. तो राजास म्हणाला की, आदिलशहा हुजुरांच्या भेटीस आला नाही. याचे कारण म्हणजे सध्या त्यांच्या कैदेत असणाऱ्या सलाबतखानाची वागणूक हे होय. सलाबतखानानेच आदिलशहाला कळवले होते की, तुम्हाला ठार मारण्याचा राजाचा मनसुबा असल्याने त्याची भेट घेऊ नये. या व इतर अनेक अशा मतलबाच्या गोष्टी सांगून असदखानाने सलाबतखानाविरुध्द राजाचे कान भरले व त्याचा प्राण घेण्यात यावा, असेही सुचवले. राजाचा असदखानावर विश्वास बसला. एवढा मोठा माणूस असत्य भाषण करणार नाही असे त्याला वाटले आणि असदखानाची इच्छा लक्षात घेऊन सलाबतखानाचा शिरच्छेद करण्यात यावा, असा राजाने हुकूम दिला. सलाबतखान त्या समयी बिसनागमध्येच होता. हुकूम मिळताच ताबडतोब त्याचा शिरच्छेद करण्यात आला.

ही कामगिरी आटोपताच आता इथे अधिक काळ राहाणे धोक्याचे आहे असे असदखानाला वाटले. म्हणून त्याने तात्काळ परत जाण्यासाठी राजाची परवानगी मागितली. आपण माघारी जाऊन आदिलशहास नदीपर्यन्त घेऊन येऊ म्हणजे हुजूर त्याला भेटू शकतील असे त्याने सांगितले. पण राजाने ''एवढी घाई न करता अजून

काही दिवस आनंदात वेळ घालवावा, तुम्हाला काही गोष्टी दाखवावयाच्या असून, काहीबद्दल बोलावयाचे आहे.'' असे त्याला सांगितले. पण आपली दगलबाजी उघडकीस येईल या विचाराने तिथे अधिक राहाणे असदखानाला सुरक्षित वाटले नाही. पण यामुळे त्याच्या वर्तनात असा काही फरक पडला की, मलाबतखानाविरुध्द त्याने जे काही केले होते ते बाहेर पडले. राजाने त्याला पकडण्यासाठी ताबडतोब माणसे पाठवली, पण तोपर्यन्त तो निसटला होता. एके रात्री निघून तो आदिलशहाकडे पळाला. आदिलशहाला त्याने सांगितले की, ''राजाने मलाबतखानाला ठार करण्याचा हुकूम दिला आणि मलादेखील ठार करण्याचा त्याचा बेत होता. म्हणून जीव वाचवण्यासाठी मी पळून आलो. तेव्हा राजावर तुम्ही भरवसा ठेवू नये, असे मला वाटते. कारण सरतेशेवटी तो किती झाले तरी काळा काफिर आहे.'' असे सांगून तो नंतर बेळगावास गेला. तिथे त्याने आपली स्थिती भक्कम केली. आणि नंतर आदिलशहाने त्याला बोलावणे पाठवले तेव्हा तो गेलाच नाही. कारण आपण केलेला दुष्टपणा उघडकीस आल्याचे त्याला माहीत झाले होते.

# प्रकरण १७

*राजा आदिलशहाला भेटण्यास सरहद्दीपर्यन्त जातो आणि तो न आलेला पाहून जे करतो त्याविषयी.*

ठरल्याप्रमाणे राजा आदिलशहास भेटण्यासाठी सरहद्दीपर्यन्त गेला. पण आदिलशहा किंवा त्याची आई ही दोघेही तिथे आले नव्हते. असदखानाने आपली फसवणूक केल्याचे त्याच्या तात्काळ लक्षात आले. तसेच सलाबतखानाचा काटा काढण्यासाठी त्याने ही फसवणूक केली हेही त्याला उमगले. संतापाने त्याने दक्षिणेवर स्वारी केली आणि तो गुलबर्गा राज्यात शिरला. गुलबर्गा शहराची त्याने धूळधाण केली, तिथला किल्ला जमीनदोस्त केला. इतरही बऱ्याच ठिकाणांची त्याने अशीच अवस्था केली.

तेथून पुढे जाण्याची त्याची इच्छा होती. पण त्याच्या सल्लागारांना ते पटले नाही. ते म्हणाले की, ''मार्गावर आपल्याला पाण्याचा तुटवडा पडेल, शिवाय आपण ज्यांना मित्र समजतो त्या मुसलमान सुलतानांनाही वाटेल की शेवटी आपण सर्व एकाच बादशहाचे मांडलिक. आपल्यापैकी एकाचे राज्य राजाने घेतले इतरांचेही तो घेणार नाही हे कशावरून ? यामुळे एखादेवेळीस आपल्या विरुध्द ते आदिलशहाशी हातमिळवणी करतील. आपल्याला त्यांची भीती नाही, पण पाण्याचा तुटवडा आहे, त्याला तर भ्यावेच लागेल.'' हा सल्ला योग्य असल्याचे वाटून राजाने मान्य केला.

गुलबर्गा शहरातील किल्ल्यात दक्षिणेच्या सुलतानाचे तीन पुत्र होते ते राजाच्या हाती लागले. सर्वांत मोठा होता त्याला राजाने गादीवर बसवले. त्यांचा बाप अगोदरच मरण पावला होता. दक्षिणेच्या सुलतानाचा एक अनौरस मुलगा होता. त्याची एक बहीण आदिलशहास दिलेली होती. त्यामुळे आपल्या या मेहुण्याला गादीवर बसवावे, असा आदिलशहाचा विचार होता. या कारणाने त्याने सुलतानाच्या तिन्ही औरस पुत्रांना किल्ल्यात डांबून ठेवले होते. पण राजाने गादीवर बसवलेला मुलगा राजा म्हणून सर्वांना मान्य झाला. सर्व प्रमुख सरदार त्याच्या आज्ञेत राहू लागले. आणि स्वतः आदिलशहादेखील राजाच्या भीतीने त्याला मानू लागला. दुसरे दोन भाऊ होते ते राजाने आपल्याबरोबर घेतले आणि प्रत्येकास सालिना पन्नास हजार सुवर्ण *परदाओची* रक्कम

नेमून दिली. ते होते त्याचप्रमाणे म्हणजे राजपुत्र सरदार म्हणून राजाने त्यांना वागणूक दिली. मग ज्या वर्षी बिसनाग सोडले होते त्याच वर्षी तिकडे परतला. तो परतल्यानंतर युध्द किंवा सलोखा या संबंधाने त्याच्यात आणि आदिलशहास सांगण्यासारखे फारसे काही घडले नाही.

# प्रकरण १८

## *राजाने आपल्या हयातीत आपल्या सहा वर्षांच्या पुत्रास गादीवर बसवले त्याविषयी*

याप्रमाणे युध्द संपवून आपल्या शत्रूवर एवढा मोठा विजय मिळवल्यानंतर राजाला वाटू लागले की, आता आपले वय झाले आहे. तेव्हा आपल्यानंतर आपला मुलगा गादीवर येईल अशी तजवीज करून आपण वृध्दापकाल विश्रांतीत घालवावा. पण मुलाचे वय त्यावेळी सहा [१] वर्षांचे होते. आपल्या मृत्यूनंतर काय होईल ते माहीत नाही तेव्हा आपल्या हयातीतच त्याला गादीवर बसवावे, असा निश्चय राजाने केला. मग त्याने सिंहासन, राजपद, सर्व वैभव व सत्ता यांचा त्याग करून ती मुलाला अर्पण केली. स्वतः प्रधान म्हणून काम पाहू लागला आणि पूर्वी प्रधान असणारा साळुव तिम्म त्याचा सल्लागार म्हणून काम करू लागला. साळुव तिम्माच्या एका मुलाला त्याने मोठी सरदारकी बहाल केली. राजपद मुलाला दिल्यानंतर त्याने स्वतःला एवढे बदलेले की, राजा म्हणून त्या मुलाला तो स्वतः प्रणाम करू लागला. गादीचा हा बदल झाल्यानंतर राज्यात आठ महिने आनंदोत्सव चालू होता. पण याच कालावधीत आजारी पडून तो मरण पावला.

नंतर कृष्णदेवरायाला कळाले की, साळुव तिम्माच्या एका मुलाने विषप्रयोग [२] करून बालराजास मारले. याबद्दल राजाची पक्की खात्री झाली. तेव्हा त्याने क्रोधावेशाने साळुव तिम्म, त्याचा मुलगा आणि त्याचा भाऊ गोविंदराज, तसेच साळुव तिम्मच्या

---

१ कृष्णादेवरायाला जुलै १५१८ मध्ये एक मुलगा झाला. त्याचे नाव त्याने तिरुमलेराय ठेवले. १५२४ साली म्हणजे हा राजपुत्र फक्त सहा वर्षांचा असतांना घडलेल्या घटना नूनीश इथे सांगत आहे. तिरुमलेरायाचे नाव असलेले १५२४ मधील बरेच शिलालेख मिळाले आहेत.

२ कदाचित आनंदोत्सवांच्या थकव्याने बालराजा मरण पावला असावा. पण कोणी तरी ही खोटी कपोलकल्पित गोष्ट नूनीशला सांगितली असावी आणि नूनीशला ती खरी वाटली असावी. कृष्णदेवरायांच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंतच्या कित्येक शिलालेखात गोविंदराज, साळुव तिम्म आणि इतर यांची नावे आढळतात.

नात्यातील सेनाधिकारी या सर्वांना बोलावून घेतले. त्यांनी येऊन कुर्निसात केला तेव्हा राज्यातील प्रमुख सरदार, अधिकारी आणि साळुव तिम्माचे नातेवाईक यांच्या समक्ष एक भाषण करून राजा त्याला म्हणाला, ''मी आतापर्यन्त तुला माझा जवळचा मित्र समजत आलो. गेली चाळीस वर्षे दिवाण म्हणून तू याचा कारभार पाहिलास. हे राज्य तूच मला दिलेस. पण त्याबद्दल मी तुझे उपकार मानत नाही. कारण तसे करण्यास तू खरे म्हणजे आपल्या कर्तव्यात कसूर केलीस. माझे डोळे काढण्याची आज्ञा तुला राजा असणाऱ्या माझ्या भावाने केली होती. पण ती तू पाळली नाहीस आणि राजाच्या मर्जीविरुद्ध वागलास. एका बोकडाचे डोळे काढून ते दाखवून तू त्याला फसवलेस आणि आज्ञाभंग करून राजद्रोही बनलास. तुझ्या मुलांसाठी मी एवढे केले पण त्यांनीही दगलबाजी केली आहे. तू आणि तुझे पुत्र यांनी केलेल्या विषप्रयोगाने माझा मुलगा मरण पावला असे मला कळाले आहे. म्हणून तुम्हा सर्वांना मी कैद करीत आहे.'' असे बोलून त्याने स्वत. त्यांना धरले आणि कैद केले. कैद करण्यापूर्वी आपल्या राज्यात घोड्याचा व्यापार करणारे पोर्तुगीज सौदागर होते त्यांना मदतीसाठी त्याने बोलावून घेतले होते. बाप, मुले आणि इतर यांना कैद करून तीन वर्षांनंतर तुरुंगात डांबण्यात आले. मग राजाने कोडमअरसच्या एका मुलाला आपला मंत्री नेमले. याच कोडमअर्सयाने, कृष्णदेवरायाच्या पित्याच्या हुकूमावरून नरसिंग राजाच्या मुलास पेन्नागुंडी येथे एका बागेत विश्वासघाताने ठार केले होते, याचा वृत्तांत अगोदर आलेला आहेच.

पण नंतर लवकरच साळुव तिम्माचा मुलगा दंडनायक[३] हा तुरुंगातून पळाला आणि जेथे चोर, लुटारू यांच्याखेरीज कोणी जात नसे अशा पहाडी प्रदेशात तो जाऊन राहिला. या पहाडीत एक किल्ला होता. तेथे एक सेनाधिकारी राहत होता. त्याने त्याचे स्वागत करून त्याला सर्व प्रकारची मदत केली. दंडनायकाने तिथून कृष्णदेवरायावर अशी चढाई सुरू केली की, प्रतिकारासाठी त्याला बरीच फौज पाठवावी लागली. या फौजेचा प्रमुख म्हणून त्याने आपला मंत्री अजबाइसा[४] यास नेमले होते. त्याने दंडनायक होता त्या किल्ल्यास चाहोबाजूंनी गराडा घातला, त्याला पकडले आणि कैद करून राजासमोर आणले. राजाने मग तुरुंगात असलेले त्याचा बाप साळुवतिम्म आणि दुसरा भाऊ यांना आणवून घेतले आणि फाशी देण्याची जागा होती तिथे पाठवून त्यांचे डोळे काढवले कारण या देशात ब्राह्मणांना मृत्युदंड करीत नाहीत, फक्त काही शिक्षा करून जिवंत सोडतात. या सर्वांना राजाने मग पुन्हा कैदेत टाकले. तिथे तिमदंडनायक मरण पावला त्याचा बाप साळुव तिम्म आपला दुसरा मुलगा गोविंदराज[५] यासह कैदेतच राहिला.

---

३ दंडनायक हे नाव नाही. सैन्यातील मुख्य अधिकाऱ्याचे ते पद आहे

४ अजबसप्पा (?)

५ गंडराज ऊर्फ गोविंदराज इथेही घोटाळा झालेला आहे. एके ठिकाणी नूनीश गंडराज साळुव तिम्माचा भाऊ असे म्हणतो, तर दुसरे ठिकाणी त्याचा मुलगा असे लिहितो. शिलालेखातील पुराव्यानुसार गोविंद हा तिम्माचा भाऊ आणि कोंडमअर्सा हा त्याचा मुलगा अशी माहिती मिळते.

# प्रकरण ११

## *आदिलशहाची रायचूरवर स्वारी , कृष्णदेवरायाची वाट पाहाण्याची हिंमत नसल्याने त्याचे पलायन*

याच सुमारास आदिलशहाने आपले पायदळ, हत्ती नव्याने एकत्र करून फौज उभी केली आणि कृष्णदेवरायाच्या ताब्यात असलेल्या रायचूरवर स्वारी केली. ही खबर कळताच कृष्णदेवरायाने घोडा तयार ठेवण्यास सांगितले आणि कोणालाही न कळवता तो आदिलशहा होता, त्या रायचूरकडे भरधाव रवाना झाला. राजा येत असल्याची बातमी कळताच आदिलशहा पळून गेला. जाता जाता मार्गात कृष्णदेवरायाने पावणेपाच घोड्यांना एक हजार *परदाओ* या भावाने सहाशे[१] घोडे पोर्तुगीजांकडून विकत घेतले. रायचुरास पोहोचल्यावर त्याने आदिलशहास निरोप पाठवला की, आतापर्यन्त तुम्ही दोन वेळा दिलेला शब्द मोडलेला आहे, या वचनभंगाबद्दल मी तुमच्यावर अशी चढाई करीन की, तुम्हाला माझे मांडलिकत्व पत्करावे लागेल, तसेच बेळगाव घेतल्याशिवाय मी तुम्हाला सोडणार नाही.

आता हिवाळा सुरू झाल्याने राजाला पुढे जाता येणे शक्य नव्हते. म्हणून तयारी करण्याच्या उद्देशाने तो बिसनागला गेला. तोफखान्याची एक मोठी तुकडी तयार करण्याची आज्ञा त्याने दिली तसेच आपला एक वकील गोव्याच्या प्रमुखाकडे पाठवून त्यांची मदत मागितली. त्याबदली बेळगाव घेतल्यानंतर भोवतालचा मुख्य टापू देऊ, असे त्याला कळवले याचे कारण म्हणजे बेळगाव गोव्यापासून पंधरा कोसांवर असून तिथल्या सुभेदाराच्या अंमलाखाली घाटमाथ्याचा टापू होता. बेळगावच्या प्रदेशाची हद्द गोव्याला जाऊन भिडते गोव्याहून तीन कोस अंतरावर पोंड्याचा किल्ला आहे. तिथे बेळगावच्या सुभेदाराचा अंमल असतो. तेथील आणि आसपासच्या खेड्यातील उत्पन्नाच्या वसुलीचे काम तो पाहातो. या पध्दतीने आदिलशहाने नेमून दिलेले अधिकारी ठिकठिकाणी अंमल करतात. खुद्द आदिलशहा या सर्व प्रदेशाचा मालक आहे. (पोंड्याचा अंमलदार अंकुशखान हा होता.)

---

१ मूळ पोर्तुगीज संहितेत ''सेतेसेंतुश असा शब्द आहे. त्याचा अर्थ 'सातशे' असा होतो.

अशारीतीने युध्दाच्या तयारीत मग्न असतानाच कृष्णदेवराय एकाएकी आजारी पडला. त्याच्या सर्व पूर्वजांना झाला होता तोच विकार पोटशूळ - त्याला जडला. बिसनागचे सर्व राजे याच विकाराने मरण पावले आहेत.

तरुणपणी या कृष्णदेवरायाचे बिसनाग शहरातील एक गणिकेच्या मुलीवर प्रेम जडले होते. या मुलीचे नाव चिन्नादेवी[२] होते. तिच्यावर असलेल्या अपार प्रेमापोटी ''मी कधी गादीवर बसलो तर तुझ्याशी लग्न करीन'' असे वचन त्याने तिला दिले होते. तो हे थट्टेने म्हणाला तरी नंतर प्रत्यक्षात तसेच घडले, अशी नोद इतिहासात आहे. कारण राजपदी आरूढ झाल्यावर त्याला तरुणपणीचे बरेच छंद सोडून द्यावे लागले पण या मुलीबद्दल वाटणारे त्याचे प्रेम तो विसरला नाही. गुप्तपणे तो राजवाड्यातून बाहेर पडे आणि तिच्या घरी जाई. एके रात्री त्याचा दिवाण साळुव तिम्म याच्या नजरेस ही गोष्ट पडली. तो त्या मुलीच्या घरी जाईपर्यन्त साळुव तिम्माने त्याच्यावर पाळत ठेवली आणि नंतर त्याची कानउघडणी करून त्यास राजवाड्यात परत आणले. यावर राजाने त्यास सांगितले की, या मुलीवर आपले अतिशय प्रेम असून, आपण तिला लग्नाचे वचन दिलेले आहे. आणि कोणत्याही परिस्थितीत आपण ते पाळणार. राजाचा हा निर्धार पाहून साळुव तिम्म त्याला म्हणाला, ''तुमची इच्छा पूर्ण करण्यात येईल, पण ती अशारीतीने की, तुमच्यावर काही दोष येऊ नये.'' हे करण्यासाठी साळुव तिम्माने राजाचे लग्न प्रथम नरसिंगराधाच्या[३] घराण्यातील एका अतिशय रूपवान मुलीशी जुळवून आणले. लग्न समारंभ आणि विधी आटोपल्यानंतर त्याने त्या गणिकेच्या मुलीला आणि वधूला एका महालात ठेवले. या महालाला त्याने एक उंच, भव्य मिनार बांधवून घेऊन तिथे गणिकाकन्येची रहाण्याची व्यवस्था केली. यानंतर कृष्णदेवरायानी बरीच लग्ने केली. कारण अनेक बायका असणे हे इकडचे राजे प्रतिष्ठितपणाचे समजतात. कृष्णदेवरायाने चार बायका केल्या, पण इतर स्त्रियांपेक्षा या गणिकाकन्येवर त्याचे अधिक प्रेम होते. तिच्यावर असणाऱ्या प्रेमाप्रीत्यर्थ त्याने नागलपूर नावाचे शहर वसवले आणि त्याच्या सभोवती एक नवा तट बांधला. हा तट म्हणजे राज्यातील बांधकामाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. या शहरात त्याने लांब, प्रशस्त रस्ता बांधून काढला. त्याच्या दुतर्फा चिरेबंदी घरे आहेत. नवीन शहरात लोकवस्ती व्हावी म्हणून त्याने आपल्या अधिकाऱ्यांना तिथे आपापले वाडे बांधण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी केले. या शहरातील मुख्य मार्ग चार हजार सातशे कदम लांब असून, रुंदीस चाळीस कदम आहे.

---

२ ताडपत्री तालुक येथील इ. स. १५१२ च्या एका शिलालेखात डोंबारीण असणाऱ्या कोण्या एका चिन्नादेवीचा उल्लेख आहे. पुरेशा पुराव्याभावी, ही चिन्नादेवी म्हणजे नंतर राणी चिन्नादेवी झालेली गणिका असे म्हणता येणे कठीण आहे. पाहा : प्रस्तावना.

३ हे स्पष्ट नाही.

एवढा सुंदर रस्ता दुसरीकडे पाहावयास मिळणे शक्य नाही. शहर बसवण्यासाठी लागणाऱ्या खर्चास राजाने मागेपुढे पाहिले नाही. या शहराचे जकातीचे उत्पन्न आता सालिना दोन हजार परदाओ आहे. जकात कर जबर असून, तो भरल्याशिवाय माल वेशीतून आत येऊ शकत नाही. येणारे स्त्री-पुरुष डोक्यावरील ओझे, सर्व प्रकारचा व्यापारी माल यांना जकात लागू आहे.

आपल्या कारकीर्दीत राजाने पाण्यासाठी एक तलाव खोदवून घेतला. दोन उंच पहाडी रांगामध्ये हा तलाव पसरलेला आहे, तलाव बांधण्याची साधने आणि त्यासाठी लागणारी माणसे राज्यात नसल्याने काही पोर्तुगीज गवंडी पाठविण्याची विनंती गोव्याच्या प्रमुखास केली. त्याने दगडी बांधकामासाठी प्रसिध्द असलेल्या जाआदेला पोते[४] यास राजाकडे पाठवले. राजाने त्यास तलाव कसा बांधावयाचा आहे हे सांगितले. या गवंड्याला अशा पध्दतीचा तलाव बांधणे अशक्यप्राय वाटले, तरीसुध्दा आपण हे काम करू, असे राजास सांगितले. आणि पुष्कळ चुना तयार करून घेण्यासही सांगितले. यावर राजाला हसू आले कारण इकडील देशात घर बांधण्यासाठी चुना कसा वापरावयाचा हे ठाऊक नाही. राजाने मग मोठमोठे दगड आणि खडक आणून खोऱ्यात टाकण्याचा हुकूम दिला. पण त्या सर्वांचा चक्काचूर होऊन जाई आणि रात्रीपर्यन्त दिवसभर केलेले काम वाया जाई. राजाला याचे आश्चर्य वाटले. त्याने या क्षेत्रातील जाणती माणसे, शकून पाहणारे यांना बोलावले आणि विचारले ते म्हणाले ''राजाच्या देवता या कामाविषयी असंतुष्ट आहेत. कारण एवढे मोठे काम होत असूनही त्यांना काहीच देण्यात आलेले नाही. त्यामुळे काही स्त्री-पुरुष किंवा महिष यांचे रक्त अर्पण केल्याखेरीज काम पूर्ण होणार नाही.'' यावर राजाने मृत्युदंडाच्या शिक्षेस पात्र असणारे तुरुंगातील सर्व कैदी तिथे आणवून घेतले आणि त्यांचा शिरच्छेद केला. तेव्हापासून पुढे काम नीटपणे चालू झाले. खोऱ्याच्यामध्ये राजाने एक भला मोठा आडवा बांध टाकला. लांबी, रुंदीस तो धनुष्यातून सुटलेल्या बाणाच्या टप्प्यात यावा असा होता. त्याला मध्ये मोठमोठी दारे होती. त्यांच्या खाली असलेल्या नळामधून पाणी बाहेर येई. गरज भासेल तेव्हा हे नळ बंद करता येत. या पाण्यायोगे शहरात बऱ्याच सुधारणा झाल्या. भात पिके आणि बागा यांचे सिंचन करणारे कालवे काढण्यात आले. शेती सुधारावी म्हणून राजाने

---

४ पाइशनेदेखील या तलावाच्या बांधकामाचे बोलके वर्णन केलेले आहे. तो स्वत: च तिथे असल्याने पोर्तुगीज तंत्रज्ञ पोतेविषयी काही लिहीत नाही. एवढे सोडल्यास पाइश आणि नूनीश या दोघांनीही केलेली बांधकामाची वर्णने जवळपास सारखीच आहेत. पाइश असतांना तलाव पूर्ण झाला नव्हता. त्यामुळे चालू असलेल्या बांधकामाविषयी त्याने लिहिले. पण तलावापासून मिळणाऱ्या उत्पन्नाविषयी लिहिले नाही. देला पोतेने तिथे येऊन मदत केली याबद्दल शंका आहे. कारण राजाच्या दरबारात चांगले वास्तुशास्त्रज्ञ व तंत्रज्ञ होते. हिंदुस्तानातील लोकांना त्यावेळी चुन्याचा वापर करणे माहीत नव्हते ते नूनीशचे म्हणणे चुकीचे आहे.

या पाण्याच्या सिंचनाखाली येणारी जमीन लोकांना नऊ वर्षांकरिता मशागतीसाठी फुकट दिली. या जमिनी आता चांगल्या सुधारल्याने त्यांच्यापासून येणारे उत्पन्न सालिना वीस हजार *परदाओ* आहे.

या तलावाच्या वरच्या अंगास चाहोबाजूस दगडीचे कडे पसरले आहे. मध्यभागी दोन्ही बाजूस बुरूज असणारे मजबूत दरवाजे आहेत. आत शंभर माणसे असून, त्यांचा नेहमी पहारा असतो. कारण शहरात येणारा सर्व माल या वेशीतून येतो. बिसनागा शहरात येण्यासाठी दुसरा रस्ता नाही. इतर सर्व इथे मिळतात. वेशीचा सालिना मक्ता बारा हजार *परदाओं*चा असून, जो कोणी आत येतो - मग तो राज्यातला असो की, बाहेरचा - त्यास मक्तेदार मागेल ती जकात भरावी लागते. दोन्ही शहरामध्ये मालाची पैदास होत नाही. सर्व माल बाहेरून येतो. नेहमी वापरली जातात त्या ओझ्याच्या जनावरांवर, बैलांवर हा माल लादून आणतात. रोज वेशीमधून दोन हजार बैल येतात. या प्रत्येकाचे तीन 'व्हिंटेम' द्यावे लागतात. बिर्नाशिगाच्या काही बैलांवर मात्र राज्यात कुठेच जकात पडत नाही.

या दोन्ही शहरांबाहेर सभोवती गहू, हरभरा, भात आणि ज्वारी यांची शेते आहेत. यापैकी ज्वारीचा इकडे खाण्यासाठी सर्वाधिक वापर होतो. त्या खालोखाल वापरले जाते ते म्हणजे पान. राज्यात सर्वत्र लोक ते खातात आणि विडा नेहमी तोंडात ठेवतात.

# प्रकरण २०

## *कृष्णदेवरायाच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ अच्युतराय गादीवर बसतो त्याविषयी*

कृष्णदेवराय आजारी पडून त्यातच मरण पावला हे अगोदर सांगितलेलेच आहे आजारी पडल्यानंतर जगण्याची आशा उरली नाही तेव्हा त्याने मरण्या अगोदर [१] आपले मृत्युपत्र तयार केले त्यात त्याने लिहिले की, ज्या त्याच्या तीन भावांनी त्याला राज्यावर बसवले होते आणि ज्यांना त्याने आपला पुतण्या (भुजबळराव याचा मुलगा) [२] याच्यासह चंद्रगिरीच्या किल्ल्यात कैदेत टाकले होते, त्यांच्यापैकी अच्युतराय या भावास गादीवर बसवावे कारण राज्यपदासाठी इतरांपेक्षा तोच योग्य आहे शिवाय आपला स्वतःचा मुलगा अल्पवयीन - केवळ अठरा महिन्यांचा असल्याने राज्यावर येण्याच्या वयात नाही. या मृत्युपत्रानुसार आता अच्युतराय गादीवर आहे. कृष्णदेवराय मरण पावल्यानंतर अच्युतराय जिथे कैदेत होता त्या चंद्रगिरीच्या किल्ल्याहून परत येईपर्यन्त साळुव नायकाने [३] दिवाण म्हणून कारभार पाहिला कृष्णदेवरायाने आपल्या मृत्युपत्रात असेही लिहिले होते की, अच्युतरायाने बेळगाव जिंकून घ्यावे आणि आदिलशहावर चढाई करावी

पण गादीवर आल्यानंतर हा अच्युतराय व्यसनी, दुर्वर्तनी बनला आणि त्याने एकतंत्री कारभार सुरू केला अच्युतराय अप्रामाणिक असल्याने प्रजा आणि सेनाधिकारी त्याच्या दुष्टपणाला विटले आहेत त्याचे दोन मेहुणे सांगतील त्याप्रमाणे तो वागतो, त्याखेरीज दुसरे काही त्याने केलेले नाही हे दोन्ही मेहुणे अतिशय वाईट प्रवृत्तीचे असून, ज्यू

---

१ मूळ संहितेत depois असा शब्द आहे. त्याचा अर्थ 'नंतर' असा होतो. स्युअलने केलेला अनुवाद मुळाबरहुकूम नाही पण त्याने अर्थ अधिक स्पष्ट होतो

२ काही शिलालेखानुसार अच्युतराय हा कृष्णदेवरायाचा सावत्र भाऊ म्हणजे नरसिंह व देवांबिका यांचा मुलगा होता. (काही शिलालेखात देवांबिकाऐवजी ओबांबिका असे आहे)

३ [illegible] नायक म्हणजे साळुवतिम्म नव्हे

प्रमाणे[४] आत्यंतिक चिकू आहेत. अच्युतराय आता प्रबळ राहिलेला नाही असे कळाल्यावरून आदिलशहाने त्याच्यावर स्वारी करण्याचे ठरवले. शिवाय राजा युध्दासाठी तयार नसल्याने आपण त्याच्यावर सहज विजय मिळवू असे त्याला वाटले. म्हणून आपली फौज एकत्र करून त्याने अच्युतरायच्या अंमलातील प्रदेशावर आक्रमण सुरू केले. बिसनाग शहरापासून कोसभर अंतरावर तो आला. अच्युतराय त्यावेळी शहरातच होता. त्याच्यापाशी एवढी फौज आणि बळ होते की, मनात आणले असते तर आदिलशहाला कैद करणे त्याला सहज शक्य होते. कारण आदिलशहाजवळ बारा हजार पायदळ व तीस हजार स्वार एवढीच फौज होती. पण या छोट्या फौजेनिशी बिसनागहून कोसभर दूर असणाऱ्या नागलपूर शहरात शिरला आणि ते शहर जमीनदोस्त करून टाकले. राजाने त्याच्यावर पुढे जाऊन प्रतिहल्ला करण्याचा प्रयत्न केला नाही. कारण लढण्याचे धैर्य त्याच्यापाशी नव्हते. त्यामुळे त्याचे काही सेनाधिकारी व चांगले स्वार होते. त्यांच्या आदिलशहाच्या सैन्याशी काही चकमकी तेवढ्या झाल्या. या लोकांनी राजाला प्रतिहल्ला करण्याची परवानगी मागितली आणि अशा लहानशा लढाईत त्याने स्वतः येण्याची गरज नाही असे सांगितले. पण राजा एवढा घाबरला होता की, आपल्या मेहुण्यांनी दिलेल्या सल्ल्यानुसार (आणि हा सल्ला त्याला भरपूर मिळे.) त्याने आदिलशहाशी तहाची बोलणी करण्याचे ठरवले व त्याप्रमाणे माणसे पाठवून त्याला कळवले. आदिलशहाला याचा फार आनंद झाला आणि त्याने तह केला. हा तह शंभर वर्षांसाठी होता आणि राजाने आदिलशहाला दहा लक्ष सुवर्ण *परदाओ* द्यावेत (एक लक्ष सुवर्ण*परदाओ* म्हणजे एक लक्ष *परदाओ*), कृष्ण देवरायाने जिंकून घेतलेले व सालिना पंधरा हजार *परदाओ* जमीन महसूल असणारे रायचूर शहर परत करावे, तसेच एक लक्ष किमतीचे जवाहिर द्यावे, अशा तहाच्या अटी होत्या. राजाने या सर्व अटी मान्य केल्या आणि द्रव्यलाभाने संतुष्ट होऊन आदिलशहा माघारी परतला. एवढे सर्व झाल्यानंतरही राजाने एकशे तीस 'मॅंगेलिनीस' वजनाचा एक हिरा आणि एक लक्ष किमतीचे इतर पंधरा हिरे आदिलशहास भेटीदाखल पाठवले. पण हा पैसा नंतर त्याने आपल्या प्रजेकडून आणि लष्कराकडून वसूल केला आणि आपल्या खजिन्यात जमा केला. ही वसुली त्याने इतक्या जुलुमाने केली की, सहा महिन्यांत तेवढा पैसा खजिन्यात जमा झाला असे सांगतात.

राजाने आदिलशहाशी केलेला तह आणि लोकांच्या मर्जीविरुध्द त्यांच्याकडून जुलुमाने केलेली वसुली यामुळे सर्वत्र असंतोष पसरलेला आहे. अच्युतराय आपल्या मेहुण्यांच्या सल्ल्याने व मर्जीने वागे. त्यांच्या बदसल्ल्यावरून त्याने राज्यातील प्रमुख

---

४ मूळ संहितेतील शब्द "Judeus" म्हणजे ज्यू असा आहे. नकल करणाऱ्याने मुळातील 'ज्युडास' म्हणजे विश्वासघातकी हा शब्द चुकीने ज्यू असा लिहिला असेल काय?

अधिकाऱ्यांना व त्यांच्या मुलांना मारले आणि त्यांची सर्व मालमत्ता हिरावून घेतली. त्यामुळे लोक म्हणतात की, हे राज्य रसातळाला जाणार असेल तर ते अच्युतरायाच्या कारकीर्दीतच जाईल.

मी आता एका कृष्णराय नायकाची हकीकत सांगतो. त्याला एके रात्री राजाने पकडले. पण राजाच्या हाती पडण्यापूर्वीच कृष्णराय नायकाने आपल्या दोनशे बायकांना ठार केले आणि स्वतः विष खाऊन राजासमक्ष जीव दिला. त्याने असे केले याची कारणे राजा आपल्या मुलाला समक्ष ठार करणार असे त्याला अगोदरच कळाले होते. सेनाधिकाऱ्यांचे जंबिये, बरच्या, तलवारी, भाले इत्यादी सर्व रत्नजडित शस्त्रे विकून राजाने तीन हजारांपेक्षा जास्त *परदाओ* मिळवले. अशारीतीने राज्याला आधारभूत असणारे प्रमुख अधिकारी व व्यक्ती नाहीशा झाल्या आहेत. त्यामुळे आदिलशहा या राज्याला इतके तुच्छ लेखतो की, दररोज तो नव्या मागण्या करून हजारो पध्दतीनी अपमान करत असतो. या राजाला चारित्र्याचे बळ नाही असे सर्व जण समजतात आणि राज्याला हितकर असणाऱ्या गोष्टीकडे तो दुर्लक्ष करतो. एवढे मोडल्यास या राजाबद्दल अधिक काही सांगण्यासारखे नाही.

# प्रकरण २१

## *राजाची दरबारात होणारी सेवा . (पुढील वर्णन अच्युतरायाच्या कारकीर्दीसंबंधीआहे .)*

राजप्रसादात वापरली जाणारी सर्व उपकरणे म्हणजे पात्र, वाट्या, चौरंग, झाऱ्या ही व इतर भांडी सोन्या-चांदीची आहेत. राजस्त्रिया झोपण्यासाठी वापरतात ते पलंग चांदीने मढवलेले आहेत. प्रत्येक राणीला स्वतःचा पलंग आहे. खुद्द राजा ज्या मंचकावर झोपतो तो सोन्याच्या पत्र्याने मढवलेला असून, त्याचे पायही सोन्याचे आहेत. पलंगाची गादी रेशमी असून, त्यावरील गिरद्यांना मोत्याची झालर लावलेली आहे. पलंगाच्या पायथ्याशी अशा प्रकारचे चार तक्के असून वर रेशमी वस्त्र ठेवलेले आहे. चांदीची चौकट आहे त्यावर मच्छरदाणी टाकलेली असते. शिवाय बाहेर गेल्यास बरोबर नेण्यासाठी एक प्रशस्त पलंग आहे, तो लोखंडी मंडपात ठेवलेला असतो.

या राजाला पाचशे बायका आहेत. त्यातील पाहिजे तितक्या जणींशी तो रात्र घालवू शकतो. तो मरण पावल्यावर या सर्व जणी सती जातात. फिरतीवर तो बाहेर जातो तेव्हा त्यापैकी त्याच्या आवडत्या असलेल्या पंचवीस ते तीस बायका त्याच्याबरोबर आपापल्या पालखीत जातात. पट्टराणीच्या पालखीवर लाल मखमूचे वस्त्र आच्छादलेले असून, लहानमोठ्या मोत्यांची झालर लावलेली असते. पालखीची दांडी सोन्याची असते. इतर राण्यांच्या पालख्यांवर फक्त चांदीकाम असते. खुद्द पालखी सोन्याची असून, ती इतर पालख्यांच्या उजव्या बाजूस चालते. राजपुत्र किंवा राजकन्या बरोबर असतील तर त्यांच्यासाठी सोनेरी काम केलेला हस्तिदंती पलंग असतो. स्वारीवर असताना त्याचा तळ पडला तर राजासाठी दगड मातीचे निवासस्थान तयार करतात. याला कापड लावून सुशोभित केलेले असते. राजा कधी तंबूत राहात नाही.

राजमहालामध्ये राजाची सेवा करण्यासाठी चांगल्या पाच-सहाशे दासी, हिजडे नाकर असतात. राजाच्या प्रत्येक पत्नीस तैनातीसाठी अशीच स्वतंत्र व्यवस्था असते. पण त्यांच्या सेवेत सर्व स्त्रिया असतात. राजाचे महाल टोलेजंग आहेत आणि त्यातील दालने प्रशस्त आहेत. महालात धर्ममठात असतात त्याप्रमाणे कोठड्या आहेत. या

कोठड्यात त्याच्या राण्या आपापल्या दासीसह राहतात. राजा विश्रांतीसाठी जातो तेव्हा कोठड्यांमधून जातो त्यावेळी त्याच्या या बायका दरवाज्यात उभे राहून त्याला आत बोलावतात. पण या त्याच्या प्रमुख राण्या नव्हेत. त्या राज्यातील सरदार, सेनाधिकारी यांच्या मुली आहेत. राजमहालाच्या आतील भागात दोनशेपेक्षा अधिक दुभत्या गाई आहेत. असे म्हणतात. या दुधापासून स्त्रियांसाठी लोणी तयार होते.

राजाला स्वतःचा अन्नखर्च नाही. कारण तांदूळ, गहू, मांस, कोंबड्या ही सर्व सामग्री त्याला सरदाराकडून रोजच्या रोज मुदपाकखान्यात पाठवली जाते. मुदपाकात चारशे पहारेकरी असून, त्यांच्यावर चार मुख्य अधिकाऱ्याची नेमणूक असते. सध्या पेद्दानायक व अजप्पानायक या नावाचे दोन फौजेचे अधिकारी या सर्व पहारेकऱ्यांवर देखरेख ठेवतात पहारेकऱ्यांना चार किंवा पाच दरवाजापर्यन्तच जाण्याची मुभा असते. कारण नंतर आत स्त्रिया व हिजडेच फक्त असतात.

राजा जेंव्हा घोड्यावर बाहेर जातो तेव्हा त्याच्याबरोबर बहुधा दोनशे स्वारांचे रक्षक दल असते. यांना तनखा राजाकडून मिळतो. याशिवाय आपल्या शिपयांसह सेवेत तत्पर असणारे चाळीस-पन्नास सेनाधिकारी आणि शंभर हत्ती हेही बरोबर असतात. राजाची स्वारी निघते तेव्हा दोन हजार ढालाईत दुतर्फा चालत असतात. सर्वात पुढे प्रमुख अल्केद[१] असतो. त्याच्याबरोबर सुमारे तीस स्वार लाठ्या घेऊन असतात. मुख्य चोपदारांच्या हाती निराळी काठी असते. राजाचा आताचा जो मुख्य चोपदार आहे. त्याचे नाव चिन्नपानायक आहे. पिछाडीस असणाऱ्यांच्या बरोबर पागेचा प्रमुख स्वारासह असतो. घोडदळाच्या मागे शंभर हत्ती चालतात. त्यांवर प्रतिष्ठित, मानकर, लोक बसलेले असतात. पागाप्रमुखापुढे लढाऊ घोडे असतात, त्याच्याही पुढे खास राजाचे पाच हत्ती चालतात. या हत्तीपुढे हाती निशाण घेतलेले पंचवीस स्वार असतात. तुताऱ्या, नगारे, इत्यादी वाद्ये त्यांच्याजवळ असून, ती बाजू लागली की, मग इतर काही ऐकू येत नाही. सर्वांपुढे एक मोठी रणभेरी असते. तिला चोहोबाजूंनी धरण्यास माणसे असतात. अधुनमधून ती ही रणभेदी वाजवतात. तिचा नाद लांब अंतरापर्यन्त ऐकू जातो. या रणभेदीस इकडे 'पिचा'[२] म्हणतात. राजा अश्वारूढ होताच बरोबरचे दोनशे स्वार, शंभर हत्ती, संरक्षक ढालाईत या सर्वांची हजेरी घेतो. जो गैरहजर असेल त्याला कडक शिक्षा होऊन त्याची मालमत्ता जप्त केली जाते.

---

१ राजमहालाचा प्रमुख.

२ याचा अर्थ लागत नाही.

# प्रकरण २२

## *राजाला प्रणाम करण्याची पध्दत इत्यादीविषयी*

दररोज राजाला दरबारी मंडळी सलाम करतात. त्याची रीत अशी : सकाळी दहा-अकरा वाजता सरदार वगैरे लोक राजवाड्यात जातात. राजा त्यावेळी अंत:पुरातून बाहेर येतो. तो स्थानापन्न झाल्यावर दरबारी लोकांना आत प्रवेश मिळतो. प्रत्येक जण वेगवेगळे येऊन राजापुढे शिर झुकवतो आणि हात उंचावतो. यालाच इकडे सलाम म्हणतात. राजाजवळ दहा-बारा ललकारे असतात. प्रत्येक सेनाधिकारी आला की, ''महाराज, अमुक तमुक सेनाधिकारी सलाम करीत आहे. त्याजवर दृष्टी टाकावी'' असे पुकारण्याचे त्यांचे काम असते.

डामडौलासाठी बिसनागच्या राजांनी आपल्या पागेत पुष्कळ घोडे नेहमीच बाळगले आहेत. आठ-नऊशे घोडे आणि चार-पाचशे हत्ती त्यांच्याकडे नेहमीच असत. त्यांचा व त्यांच्या देखभालीसाठी ठेवलेल्या नोकरमाणसांचा मिळून बराच खर्च होत असे. हल्लीचा राजा (अच्युतराय) याच्या पागेत सातशेपेक्षा अधिक घोडे व चारशे हत्ती आहेत. त्यांच्यावर तो बराच खर्च करतो आणि देखरेखीसाठी ठेवलेल्या नोकरांना शिधा तसेच दररोज दोन हजार सुवर्ण *परदाओ* तनख्यापायी देतो. खास राजाकडून तनखा मिळणारे स्वार सहा हजार आहेत. हे सर्व पागेच्या व्यवस्थेचा (?) भाग म्हणून आहेत. यांच्या हाताखालच्या लोकांपैकी काहीना पाचशे, काहींना तीनशे असा तनखा मिळतो. कमीतकमी पगार शंभर आहे. या सहा हजारांपैकी दोनशे स्वारांना राजा निघाला की, त्याच्याबरोबर जावे लागते.

इकडील राजांना पाहिजे तेवढी शिपाईभरती करता येते. कारण माणसे भरपूर असून, त्यांना पगार देण्यासाठी पाहिजे ती संपत्तीही त्यांच्याजवळ पुष्कळ असते. अच्युतराय राजाच्या पायदळाचा पगार सरदारांकडून चुकता होतो. या सरदारांना सहा लाख शिपाई पदरी बाळगावे लागतात. शिवाय चोवीस हजार घोडदळही ठेवावे लागते. हे सरदार म्हणजे राजाच्या सर्व जमिनीचे मक्तेदार होत. त्यातून ते फौज पदरी बाळगून शिवाय त्यांचा सर्व खर्च करतात खेरीज सालिना साठ लाख त्यांना मक्तेदारीपोटी राजाला अदा

करावे लागतात. जमिनीचे उत्पन्न एकशे वीस लाखांचे आहे असे म्हणतात. यापैकी निम्मे ते राजास देतात आणि बाकीच्यातून त्यांच्या पदरी असलेल्या हत्तींचा आणि शिपायांचा खर्च करतात. यामुळे सर्वसाधारणपणे रयतेचे फार हाल होतात. कारण जमीनमालकी ज्यांच्याकडे असते ते फार जुलूम करतात. जमीन महसुलापोटी मिळणाऱ्या साठ लाखांपैकी राजाला स्वत:साठी पंचवीस लाखांपेक्षा जास्त मिळत नाही. उरलेल्या रकमेतून पायदळ आणि घोडदळ यांचा खर्च त्याला करावा लागतो.

उत्सव आणि देवळांसाठी होणारा दानधर्म याप्रसंगी जणू कूळ असणाऱ्या या सेनाधिकाऱ्यांना दरबारात हजेरी लावावी लागते. यात राजासमवेत असणारे आणि दरबारात नेहमी त्याच्याबरोबर असणारे दोनशेपेक्षा जास्त आहेत. यांना दरबारात राजासमोर हमेशा असावे लागते आणि नियमाप्रमाणे ठराविक संख्येची फौज पदरी बाळगावी लागते. शिपायांची संख्या कमी आहे असे राजाच्या नजरेस आले तर तो त्यांना कडक शिक्षा करतो आणि त्यांची मालमत्ता जप्त करतो. या सरदारांना शहर किंवा गाव येथे कायम राहू दिले जात नाही. कारण तसे केल्यास ते राजाच्या हाताबाहेर जाण्याची शक्यता असते. म्हणून ते शहर, गांव इथे अधुनमधून जातात. मांडलिक असलेल्या राजांना मात्र याबाबतीत सवलत असते. बोलावल्याखेरीज ते दरबारात जात नाहीत आणि राजाची खंडणी किंवा महसूल ते त्याला आपापल्या गावाहून पाठवतात. पण बंकापुराच्या राजाशी मात्र त्याने नेहमी छावणीत राहावे आणि वर्षातून दोन वेळा दरबारात यावे, असा करार आहे.

बंकापुराच्या राजाशिवाय मांडलिक असणारे राजे म्हणजे गिरसप्पा बंकापूर, कळस आणि भटकळ येथील राजे होत. हे दरबारात येतात तेव्हा राजाकडून किंवा सरदारांकडून त्यांना मिळणारा मान इतर सेनाधिकाऱ्यांपेक्षा जास्त नसतो.

बिसनाग राज्यातील अमीर उमराव, सेनाधिकारी तसेच दरबारी असणारे किंवा बाहेर राहणारे सर्व मानकरी यांचा प्रत्येकाचा एक चिटणीस असतो. तो रोज राजवाड्यात जाऊन राजाचा दिनक्रम आपल्या मालकास लिहून कळवतो. अशाप्रकारे राजदरबारी काय घडते आहे त्याची माहिती आपल्या धन्यास व्हावी अशी ते व्यवस्था करतात. त्यासाठी अहोरात्र ते राजवाड्यावर असतात. खुद्द राजादेखील राजमहालाबाहेर जाताना आपल्याबरोबर निराळे चिटणीस ठेवतो. राजा काय बोलला, त्याने कोणासाठी काय उपकारकृत्ये केली, कोणाशी कोणत्या विषयावर कोणत्या हेतूने बोलला - या सर्वांची नोंद ते लिहून घेतात. या लोकांना मिळणारे महत्त्व आपल्याकडील एव्हँजलिस्टांसारखे असते. कारण राजा जेव्हा बोलतो तेव्हा ते लिहून घेण्याइतके महत्त्वाचे असते आणि अशी लिखित नोंद स्मरणार्थ आवश्यक असते, असे ते म्हणतात. अशारीतीने राजा आपण दिलेल्या देणग्या - इनामे किंवा आज्ञा यांच्यासाठी लिखित हुकूम किंवा सनदा कधीच देत नाही. पण त्याने कोणावर कृपा केली व काही बहाल केले तर त्याची नोंद या

चिटणीसांच्या दप्तरी राहाते. मात्र ज्याच्यावर कृपा केली त्याला राजा लाखेवर उमटवलेला आपल्या अंगठीचा शिक्का देतो. हा शिक्का दिवाण ठेवून घेतो. अधिकृत पत्रांसाठी या शिक्क्यांचा उपयोग होतो.

बिसनागच्या राजांच्या आहारात गाई-बैलाचे मांस सोडल्यास इतर सर्व काही असते. मूर्तीपूजकांच्या या देशात गाय बैल [१] पूज्य असल्यामुळे त्यांची हत्या केली जात नाही. बकरी, डुकरे, हरिण, तितर, ससे, पारवे, लावें, आणि इतर पक्षी यांचे मांस ते खातात. इतकेच काय पण चिमण्या, उंदीर, मांजरे, घोरपडी यांचेही मांस बिसनाग शहरातील बाजारात विकले जाते.

प्रत्येक शिकार जिवंत विकली जाते कारण त्यामुळे गिऱ्हाईकाम आपण काय घेत आहोत ते कळते. निदान जंगली शिकारीच्याबाबतीत तरी असे आहे. नदीतील मासे भरपूर प्रमाणात बाजारात विकावयास असतात. द्राक्षे, संत्री, लिंबू, डाळिंब, फणस, आंबा अशा स्वस्तात मिळणाऱ्या फळांची बाजारात रेलचेल असते. असे सांगतात की, बाजारात एक जिवंत बकरे एक परदाओला मिळते तर बाहेर पहाडी प्रदेशात त्यांना भाव एका परदाओला चौदा किंवा पंधरा असा असतो. राजा एका खास झऱ्याचे आणलेले पाणी पितो. राजाच्या अत्यंत विश्वासात असलेल्या एका माणसाचा पहारा तेथे असतो. झऱ्याचे पाणी ज्या भांड्यात काढून घेतलेले असते ती झाकून सीलबंद करतात. राजाच्या तैनातीत असणाऱ्या दासींना हे पाणी दिले जाते. त्या मग ते आत नेऊन राजस्त्रियांच्या हवाली करतात.

राजाकडून एखाद्या सरदाराला मिळणाऱ्या सर्वोच्च बहुमानाचे प्रतीक म्हणजे सोने आणि जडावकाम केलेली चवऱ्यांची जोडी होय. या चवऱ्या काही विशिष्ट गाईच्या [२] पांढऱ्या शेपटीच्या केलेल्या असतात. त्यांच्याबरोबर कंकणेही दिली जातात. सरदाराला जे काही देण्यात येते ते खाली जमिनीवर ठेवतात. कोणा एखाद्याला राजाच्या पायाचे [३] चुंबन घेण्याची परवानगी मिळाली तर तो फार मोठा मान समजला जातो. कारण राजा कोणालाही कधी आपल्या हाताचे चुंबन घेऊ देत नाही. कोणा सरदारावर विशेष मर्जी दाखवायची असेल, किंवा कोणी चांगली सेवा केली असेल किंवा तशी सेवा

---

१. सोळाव्या शतकापासून युरोपीय लोक हिंदुस्थान आणि 'पवित्र गाय' याविषयी लिहीत आलेले आहेत. आजसुध्दा युरोपात लोक आश्चर्याने प्रश्न विचारतात. ''भारतात गाय, बैल पवित्र का समजले जातात ?''

२. कपिला गाईच्या शेपटीपासून तयार केलेल्या

३. आपल्याकडे वडील माणसांना नमस्कार कसा करतात हे नूनीशच्या लक्षात आले नाही. प्रथेप्रमाणे आपण वडीलधाऱ्या, आदरणीय मंडळीच्या पायास हात लावतो किंवा डोके टेकवतो.

त्याच्याकडून करून घ्यावयाची राजाच्या मनात असेल तर अशा वेळी तो त्यांना भेट म्हणून वैयक्तिक वापरासाठी शाल देतो. हा फार मोठा मान समजला जातो. दरवर्षी सरदार लोक जमिनीचा ठरलेला महसूल राजास आणून देतात तेव्हा तो त्यांना अशा शाली[४] भेट देतो. हा समारंभ सप्टेंबरात[५] नवरात्र उत्सवाच्यावेळी होतो. काही लोक म्हणतात की, आपल्या कुमारी मातेने मेरीने - नऊ महिने उदरात गर्भ वाढवला त्या प्रीत्यर्थ हा उत्सव होतो तर काही जण म्हणतात की, जमिनीचा महसूल देण्यासाठी सरदार उमराव आलेले असतात केवळ त्यासाठीच तो होतो. या उत्सवाचे स्वरूप येणेप्रमाणे :

पहिल्या दिवशी राजवाडयासमोरील प्रांगणात नऊ मंडप उभे करतात. हे मंडप राज्याच्या नऊ मुख्य सरदारांनी उभे केलेले असतात. बुरुजासारख्या दिसणाऱ्या या उंच, भव्य मंडपांना भरजरी कापड मढवलेले असते. मंडपात कलावंतिणीचा नाच व निरनिराळ्या प्रकारचे खेळ चालू असतात. या नऊ मुख्य सरदाराखेरीज इतर सरदारांनाही आपापले मंडप उभे करून राजास दाखवावे लागतात. प्रत्येकजण आपापल्या पध्दतीने हे करतो. असे नऊ दिवस चालते. आपल्याकडीलप्रमाणे इकडेही शहरातील अधिकाऱ्यांना दररोज रात्री आपापल्या साधनांनिशी यावे लागते. या नऊ दिवसांच्या काळात प्राण्यांना मारून बळी देण्यात येते. पहिल्या दिवशी ते नऊ रेडे, नऊ बकरी आणि नऊ बोकड[६] मारतात. नंतर प्रत्येक दिवशी बळी देण्यात येणाऱ्या प्राण्यांची संख्या दुप्पट केली जाते. बळी देण्याचा विधी संपल्यानंतर फुलांनी आणि भरजरी वस्त्रांनी शृंगारलेले हत्ती राजापुढे येतात. त्यांच्या अग्रभागी अश्वशाळेचा अधिकारी आपल्या सेवकांसह असतो.

हे सर्व जण राजापुढे जाऊन सलाम करतात. नंतर आतून बरेचसे ब्राम्हण, पुरोहित हाती तांदूळ नैवेद्य, पाणी, अग्नी आणि निरनिराळया प्रकारची सुगंधी द्रव्ये घेऊन येतात. प्रार्थना करून ते घोडयांवर व हत्तीवर फुले उधळतात आणि आपल्याकडील पुरोहितांप्रमाणेच पवित्र जल शिंपडतात. नंतर गुलाबपुष्पे उधळतात. हे सर्व राजाच्या समक्ष होते. राजा एका रत्नजडित सुवर्ण सिंहासनावर बसलेला असतो. तो यावर वर्षातून फक्त एकदाच बसतो. सध्या गादीवर जो राजा आहे तो तर या सिंहासनावर कधीच बसत नाही. कारण या सिहासनास पात्र असणारा राजा सत्यवान, सदाचरणी असावा लागतो आणि हा राजा तसा नाही. हे चालू असताना जवळपास हजार

---

४. शाल देऊन सन्मान करणे. या समारंभास 'शालुसमारंभ' म्हणतात.

५. दसरा सण. पाईशनेदेखील याचे वर्णन केले आहे.

६. पाईश म्हणतो की, २४ रेडे, १५० बकरी यांचा बळी दिला जातो व शेवटच्या दिवशी २५० रेडे व ४५०० बकरी मारली जातात. नूनीशने दिलेले आकडे काहींसे अतिरंजित वाटतात.

कलांवतिणी राजापुढे येऊन नृत्य व विक्षेप करतात. सर्व खेळ, कार्यक्रम पाहाणे झाल्यानंतर राजाचे घोडे येतात. घोडयांवर रेशमी वस्त्रे असतात. त्यांच्या शिरोभागी सोन्याचे जडावाचे अलंकार असतात. त्यांच्या मागून अशाचरीतीने शृंगारलेल्या हत्ती व बैलांच्या जोडया राजवाडयापुढील प्रांगणात आणतात. ते निघून गेल्यावर राजाच्या सर्वात सुंदर अशा छत्तीस स्त्रिया येतात. त्यांच्या अंगावर सोन्या-मोत्याचे भरपूर अलंकार असतात. आणि प्रत्येकीने सुवर्णपात्रात आरती[७] धरलेली असते. या स्त्रियांच्यासमवेत सर्व दासी आणि इतर राजस्त्रिया येतात. त्यांच्या हातात सोन्याची मूठ असलेल्या छडया आणि जळत्या मशाली असतात. या मग राजाबरोबरच महालात जातात. या स्त्रियांच्या अंगावर सोनेरी व जडावाचे इतके अलंकार असतात की, त्यांच्या भाराने त्यांना हालचाल करणे कठीण जाते.

अशारितीने या नऊ दिवसांत राजाला आनंददायक होईल अशा गोष्टी आखून केल्या जातात.

राजाच्या पदरी हजार मल्ल असून, उत्सवप्रसंगी त्यांच्या कुस्त्या होतात. पण या कुस्त्यांची तऱ्हा आपल्याकडच्यासारखी नाही. हे मल्ल हातात अणकुचीदार चक्रे धरून आघात करून, परस्परांना जखमी करतात. सर्वात जास्त जखमी झालेल्यास राजातर्फे शालीचे इनाम[८] मिळते. या मल्लावर देखरेख करणारा एक मुख्य असतो. हे लोक दुसरी कोणती नोकरी करीत नाहीत

नऊ दिवसांचा हा उत्सव संपल्यानंतर राजा अश्वारूढ होऊन आपल्या सेनाधिकाऱ्यांच्या पलटणीची पाहणी करण्यासाठी बाहेर पडतो. फौज सुमारे दोन कोस रस्त्याच्या दुतर्फा उभी केलेली असते. तिच्यामधून राजा जातो. रस्त्याच्या टोकास आल्यावर तो घोडयावरून खाली उतरतो. हाती धनुष्य घेतो आणि तीन बाण मारतो. यातील एक आदिलशहासाठी, दुसरा कोटामुल्को[९] च्या राजासाठी आणि तिसरा पोर्तुगीजांसाठी असतो. सर्वांत लांब जाऊन पडलेल्या बाणाच्या दिशेने जे राज्य असेल त्यावर स्वारी करण्याचा मानस ही प्रथा दाखवी. हे झाल्यानंतर राजा महालात परत येतो. त्या दिवशी राजासकट सर्व लोक उपास करतात. दुसरे दिवशी आपल्या खाशा मंडळीसह तो नदीवर जाऊन स्नान करतो. या नऊ दिवसांतच सर्व जण राजाला द्यावयाचे मक्त्याचे पैसे त्याच्याकडे जमा करतात. कारण मागे सांगितल्याप्रमाणे राज्याची सर्व जमीन राजाच्या मालकीची असते. त्याच्याकडूनच ती सरदार, सेनाधिकारी यांना मिळते. ते स्वत: ही जमीन कुळाला देतात. त्याबद्दलही कुळे

---

७. पाईशने वर्णन केला आहे त्याच्यापेक्षा हा क्रम निराळा आहे.

८. पाइशचा वृतांत पाहा.

९. कुतुबशहा.

उत्पन्नाचा शेकडा नव्वद हिस्सा त्यांना देतात. जमिनीवर सरदार, सेनाधिकाऱ्यांचा खाजगी हक्क नसतो. कारण राज्याची सर्व भूमी राजाची असते. फौज बाळगण्याची त्यांची जिम्मेदारी असते. तिचा खर्च भागावा म्हणून ही तजवीज केलेली आहे. ही फौज पाहिजे तेव्हा सेवेस हजर करावी लागते. राजमहलाच्या आतील भागात राजाच्या कुलदेवतेची मूर्ती आहे. प्रत्येक शनिवारी कलावंतिणींनी तिथे जाऊन मूर्तीपुढे नृत्य करावे असा नियम आहे. या देशातील सर्व लोक शनिवारी उपास करतात. त्या दिवशी ते दिवसाच काय पण रात्रीही काही खात नाहीत. पाण्याचा घोटदेखील घेत नाहीत. मुखशुध्दीसाठी फक्त काही लवंगा चघळतात. दानधर्म म्हणून राजा मोठमोठया रकमा देतो. राजमहालात त्याचे उपाध्ये असणारे दोन-तीन हजार ब्राम्हण आहेत. त्यांना राजाच्या आज्ञेवरून दान, दक्षिणा मिळते. हे ब्राम्हण पुरोहित म्हणजे अतिशय तिरस्करणीय लोक होते. ते बराच पैसा बाळगून असतात. उध्दट तर इतके असतात की, प्रसंगी तडाखे देऊनसुध्दा पहारेकऱ्यांना त्यांच्यावर नियंत्रण ठेवता येत नाही.

सेनाधिकारी आणि इतर प्रमुख लोक रात्री तेलाच्या मशाली वापरतात. जसा दर्जा असेल त्याप्रमाणे मशालीची संख्या चार ते बारापर्यन्त असते. सर्वांत श्रेष्ठ दर्जा असणाऱ्याला जास्तीत जास्त बारा मशाली असतात. राजासाठी मात्र शंभर किंवा दीडशे मशाली असतात. या देशात मेण पुष्कळ पैदा होते. पण त्याचा उपयोग करण्याचे इकडील लोकांना माहीत नाही. कोणी व्यापारी माल किंवा घोडे विकण्यासाठी घेऊन आला आणि जर त्यास राजाची भेट पाहिजे असेल तर त्याला बरोबर आणलेल्या मालातील एक उत्तम वस्तू किवा उत्कृष्ट घोडा यांचा नजराणा राजास द्यावा लागतो. त्याशिवाय राजाशी भेट होऊन त्याचा सौदा होत नाही. हा नजराणा फक्त राजास देऊन चालत नाही. ज्या अधिकाऱ्यांशी संबंध येतो त्या सर्वांना लाच द्यावी लागते. स्वत:चा फायदा असल्याखेरीज ते लोक काही काम करत नाहीत.

कोणावर अन्याय झाला असेल आणि राजाच्या कानावर आपले गाऱ्हाणे त्याला घालावयाचे असेल तर तो जमिनीवर सपशेल आडवा पडून आपल्यावर केवढा मोठा अन्याय झाला आहे हे लोकास दाखवतो. कोणी येऊन त्याची विचारपूस करेपर्यन्त तो उठत नाही. राजा अश्वारूढ होऊन जात असताना त्याला कदाचित राजाच्या कानी काही टाकावयाचे असेल तर तो भाल्याच्या काठीस झाडाची फांदी बांधून ओरडत जातो. लोक त्याला वाट करून देतात. मग तो राजापाशी जाऊन आपले गाऱ्हाणे सांगतो. त्याचा निर्णय फारशी लांबड न लावता तिथल्या तिथेच दिला जातो. आपल्यासमवेत असणाऱ्या एखाद्या सरदाराला राजा त्या माणसाबरोबर जाऊन त्या अर्जदाराने सांगितले ते करण्यास सांगतो. अर्जदाराने जर तक्रार केली की, अमुक अमुक प्रांतात अमुक अमुक रस्त्यावर मला लुटण्यात आले, तर राजा त्या प्रांताच्या अधिकाऱ्याला ताबडतोब बोलावून घेतो. मग तो दरबारात असला तरी त्यास यावे लागते. प्रांतअधिकारी चोराला

पकडू शकला नाही तर राजा त्याची मालमत्ता जप्त करतो व त्याला कैद करतो. मुख्य कोतवालाला, राजधानीत होणाऱ्या चोऱ्यांची माहिती द्यावी लागते. त्यामुळे चोऱ्या कमी होतात. एखादी चोरी झालीच तर लहानशी भेटवस्तू देऊन चोराची चेहरपट्टी वर्णन केली की, मग मांत्रिक, जादूगार यांच्या मदतीने चोर शहरात आहे की, बाहेर हे पाहातात. या राज्यात मोठमोठे मांत्रिक आहेत. त्यामुळे इकडे चोऱ्या फार कमी होतात.

राजाच्या पदरी पन्नास हजार पगारी शिपाई कायम असतात. यापैकी सहा हजार स्वार असून, ते राजवाडयाच्या रक्षकदंलात आहेत. राजा बाहेर निघाला की, त्याच्याबरोबर जे दोनशे स्वार नेहमी असतात ते यापैकीच होत. याखेरीज, वीस हजार भालाईत व ढालाईत, हत्तीची व्यवस्था पाहाणारी तीन हजार माणसे, घोडयांची देखरेख करणारे तीन हजार मोतद्दार व त्यांना शिकवून तयार करणारे तीनशे प्रशिक्षक, सुतार, गवंडी, लोहार आणि धोबी यांचा समावेश असणारे दोन हजार कारागीर हे सर्व राजाच्या पदरी आहेत. त्यांचा पगार दररोज होतो. राजवाडयाच्या प्रवेशद्वाराशी तो वाटण्यात येतो. सहा हजार स्वारांना राजाकडून घोडे मोफत मिळतात. शिवाय त्यांच्यासाठी लागणारा चंदीचाराही दर महिन्यास दिला जातो. सर्व घोडयांवर राजाचा शिक्का उठवलेला असतो. एखादा घोडा मेला तर त्याच्या कातडीचा शिक्का असणारा भाग काढून घेऊन पागेचा प्रमुख अधिकारी असणाऱ्या ''मदनायकां'' कडे नेतात. म्हणजे मग तो त्यांना दुसरा घोडा देतो. तो देतो ते बहुतेक घोडे देशी असतात. एक हजार परदाओला बारा ते पंधरा या भावाने राजा ते खरेदी करतो. दरवर्षी राजा आरमुझचे आणि देशी असे मिळून तेरा हजार घोडे विकत घेतो. यातील सर्वात चांगले घोडे स्वत:च्या तबेल्यासाठी ठेवऊन बाकीचे तो आपल्या सरदारांना विकतो. याद्वारे त्याला बराच पैसाही मिळतो. कारण चांगले पर्शियन घोडे काढून घेतल्यानंतर उरलेले देशी घोडे तो एक हजार परदाओला पाच या भावाने विकतो. सप्टेंबर महिन्यापूर्वीच सरदारांना घोडयांचे हे पैसे भरावे लागतात. अशारीतीने मिळालेल्या पैशातून राजा पोर्तुगीजांकडून विकत घेतलेल्या अरबी घोडयांची किंमत अदा करतो. अशारीतीने राजाच्या खजिन्यातून काही एक पैसा बाहेर न जाता सरदारांनी दिलेल्या रकमेतून सगळी किमत वसूल होते.

राजवाडयात चार हजारच्यावर बायका असून त्यांच्या राहण्याची व्यवस्थाही तिथेच असते. यापैकी काही कलावंतिणी आहेत. काही राजपत्नीना तसेच राजालाही राजवाडयाच्या हद्दीत खांद्यावर वाहून नेण्याचे काम करतात. कारण राजवाडा खूपच प्रशस्त असून, त्याच्या दोन भागांमधील अंतरही खूप आहे. राजाच्या पदरी मल्लविद्या जाणणाऱ्या स्त्रिया आहेत, त्याचप्रमाणे ज्योतिष जाणणाऱ्या व शकून सांगणाऱ्या स्त्रियाही आहेत. राजवाडयात होणाऱ्या खर्चाचा हिशोब लिहिणाऱ्या स्त्रियांही आहेत काही स्त्रियांकडे राज्यातील घटनांची हकीकत लिहून ठेवणे व तिची तुलना बाहेर

इतरांनी लिहिलेल्या हकीकगतींशी करणे हे काम सोपवलेले असते. संगीत वाद्ये वाजवणाऱ्या व गाणाऱ्या स्त्रियांही त्याच्याकडे आहेत. खुद्द राजाच्या स्त्रिया संगीत कलेत पारंगत आहेत. [१०]

राजवाडयात इतरही अजून बायका आहेत. राजाच्या खास मुदपाकात दहा बायका असून, मेजवानीप्रसंगी असाव्यात म्हणून इतरही बायकांना त्याने ठेवले आहे. वर सांगितलेल्या दहा स्त्रिया राजा सोडल्यास इतर कोणासाठी स्वयंपाक करीत नाहीत. मुदपाकखान्याच्या दाराशीच एक हिजडयाचा पहारा असतो. विषप्रयोगाचा धोका होऊ नये म्हणून तो कोणालाही मुदपाकात जाऊ देत नाही. राजाच्या भोजन प्रसंगी, इतर सर्व जण निघून जातात. नंतर ज्यांना हे काम नेमून दिलेले आहे त्या बायका येऊन ताट-पाट मांडतात. राजासमोर त्या सोन्याची गोलाकार तिवई ठेवतात आणि त्यावर सोन्याच्या ताटात भोजनाचे पदार्थ वाढतात. हे पदार्थ मोठाल्या सोन्याच्या पात्रातून आणतात तर बारीकसारीक पदार्थ लहान आकाराच्या सोनेरी भांडयात आणतात. यापैकी काही भांडी रत्नजडित असतात. तिवईवर वस्त्र घातलेले नसते. पण राजाचे भोजन आटोपताच एक वस्त्र आणतात. राजा हात, तोड धुऊन या वस्त्राने पुसतो. बायका आणि हिजडे भोजनसमयी त्याला वाढतात. राण्या आपापल्या दालनात असतात. त्या प्रत्येकीच्या सेवेत दासी असतात. असे सांगतात की, राजाच्या पदरी न्यायाधीश, कोतवाल तसेच रोज रात्री राजवाडयावर पहारा देणारे चौकीदार - या सर्वांची कामे करणाऱ्या स्त्रिया आहेत.

राजा एकदा घातलेली वस्त्रे पुन्हा वापरत नाही. एकदा घालून वापरली की, तो नेमून दिलेल्या एका अधिकाऱ्यांकडे ती सुपूर्द करतो. ते यांचा हिशोब ठेवतात. ही वस्त्रे दुसऱ्या कोणास कधी दिली जात नाहीत. हे सर्व मोठेपणाचे चिन्ह समजले जाते. राजाचे कपडे तलम रेशमी कापडाचे असून, त्यावर सोनेरी जरीकाम केलेले असते. प्रत्येक कपडा दहा परदाओंचा असतो. राजा कधी कधी 'बाजूरी' नावाचा कपडा घालतो. हा चुणीदार सदऱ्यासारखा असतो. डोक्यावर जरीची टोपी असते, तिला इकडे 'कुलई' म्हणतात. एक टोपी सुमारे वीस 'कृझादो' ची असते. एकदा काढली की ती टोपी राजा पुन्हा वापरत नाही.

या राज्यात देण्यात येणाऱ्या शिक्षा अशा. कितीही लहान चोरी असो, चोराचा एक पाय आणि एक हात ताबडतोब तोडतात. चोरी मोठी असेल तर चोराच्या हनुवटीखाली

---

१०. अच्युतरायाच्या पदरी तिरुमलादेवी नावाची स्त्री होती. ती दरबारात वाचून दाखवण्याचे काम करी. (काही इतिहासकारांच्या मते ही राजाची बायको होती.) राजाने १५३३ साली विठ्ठल मंदिरासाठी कांचनमेरूचे (सुवर्णमेरू) दान केले तेव्हा तिने काव्यरचना करून गाऊन दाखवली. 'वरदंबिका परिणय' हा ग्रंथ तिनेच लिहिलेला आहे.

गळ लावून त्यास फासावर लटकवतात. सभ्य स्त्री किंवा कुमारिका यांच्यावर कोणी बळजबरी किंवा अशाप्रकारचा गुन्हा केला तर त्यासही हीच शिक्षा मिळते. राजद्रोह करणाऱ्या सरदारांना सुळावर चढवतात. खालच्या दर्जाच्या लोकांनी गुन्हा केला असेल तर मग गुन्हाचे स्वरूप कसेही असो, भर चौकात त्यांचा शिरच्छेद करण्याची आज्ञा राजा ताबडतोब देतो. खुनासाठीदेखील हीच शिक्षा असते. द्वंद्व युध्दामध्ये मात्र कोणी कोणाचा जीव घेतला तरी त्यास शिक्षा नसते. द्वंद्व युध्द लढणाऱ्यांचा उलट सन्मान होतो. त्यात मरण पावलेल्यांची मालमत्ता जिवंत असणाऱ्यास दिली जाते. मात्र मंत्र्यांची परवानगी असल्या खेरीज द्वंद्वयुध्द कोणाला लढता येत नाही. मंत्र्यांची परवानगी मात्र तात्काळ मिळते. या सर्वसाधारण शिक्षा झाल्या. इतर काही आहेत त्या विचित्र आहेत. राजाच्या मर्जीला आले तर तो एखाद्याला हत्तीच्या पायी देण्याची शिक्षा देतो. आणि हत्ती त्याचा चक्काचूर करतात. येथील लोक राजाचे इतके गुलाम आहेत की, ''राजाने तुला पाठीवर दगड घेऊन रस्त्यात उभे राहण्यास सांगितले आहे.'' असे तुम्ही एखाद्यास म्हणाला तर तो दिवसभर रस्त्यावर निमूटपणे, तुम्ही पुन्हा त्याला मोकळे करेपर्यन्त तसाच उभा राहील.

राज्यात फिरतीवर असणारे राजाचे मुख्य अधिकारी येणेप्रमाणे. प्रथम राजाचा दिवाण असतो. राजानंतर याचा दर्जा असतो. यानंतर असतो खजिनदार. त्याच्याबरोबर राजाच्या खाशा जमिनीचा[११] हिशोब ठेवणारे असतात. त्याच्यानंतर असतात मुख्य खजिनदार, राजवाडयाचा रक्षकदलाचा प्रमुख, रत्नेजवाहिर पाहणारा आणि पागेचा मुख्य अधिकारी. राजाच्या पदरी महमुलाचा मुख्य असा कोणी नाही. तसेच खाजगीतील अधिकारीही नाहीत. आहेत ते फक्त राज्यातील सरदार यापैकी काही जणांचे मी उल्लेख, मी त्यांचा महसूल आणि त्यांच्या अमलाखाली असणारा मुलुख यांच्यासकट करतो.

सर्वप्रथम हल्ली दिवाण असणारा साळुव नायक[१२] याच्याविषयी त्याचा महसूल अकरा लाखांचा आहे. त्याच्या अंमलाखाली चोलमंडल, नागपट्टण, तंजावर, बोमगरीन,[१३] दपाटाओ,[१४] तिरूकोइलूर आणि कौलिम[१५] हे भाग येतात. ही सर्व शहरे मोठी असून, त्यांचा विस्तार मिलोनपर्यन्त आहे. आपल्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा त्यास राजास द्यावा लागतो आणि उरलेल्या दोन हिश्श्यांतून तो शिपाई व

---

११. कंपिली, रामसागर इत्यादी ठिकाणी राजाच्या खाशा जमिनी होत्या.

१२. चोलमंडलचा सरदार साळुव नायक.

१३. ब्रम्हगिरी (?)

१४. देवीपट्टण किंवा तिरूपती (?)

१५ कोविला ऊर्फ श्रीरंगम.

स्वारदळाचा खर्च भागवतो. राजासाठी त्याला ही फौज बाळगावी लागते. या फौजेत तीस हजार पायदळ, तीन हजार घोडदळ, आणि तीस हत्ती असतात. एवढया फौजेचा खर्च उरकल्यानंतर जे बाकी राहील तेवढेच त्याला स्वत:ला मिळते. पण यात त्याला बरीच संपत्ती कमावता येते कारण एवढी पूर्ण फौज तो कधीच ठेवत नाही. राजाच्या मर्जीस आले तर तो या सरदारांची मालमत्ता हिरावून घेऊ शकतो.

दुसरा एक सरदार 'अजप्पारक तिम्मपा' हा पूर्वी कृष्णदेवरायाच्या दरबारात मंत्री होता. त्याला आठ लक्ष सुवर्ण परदाओंचे उत्पन्न आहे उदयगिरी शहर त्याच्याकडे असून, शिवाय कोंडाविड पेन्नुगोंदे आणि सिदाओता व कोडेशेगल ही शहरेही त्याचीच आहेत. ही सर्व मोठी शहरे ओरिसा राज्याच्या सरहद्दीस लागून आहेत. काही केपकामोरिनला लगतची आहेत. आपला आधीचा दिवाण साळुवतिम्म याचे डोळे काढविल्या नंतर कृष्णदेवरायाने अजप्पारतिम्मपास प्रधानकीची वस्त्रे दिली. पंचवीस हजार पायदळ, पंधराशे स्वार आणि चाळीस हत्ती यांच्यासह तो राजाच्या चाकरीत आहे. सलिना त्याला राजाला तीन लक्ष *परदाओ* द्यावे लागतात.

आणखी एक सरदार गोपनायक हा असून, रोझिल[१६] टीपर, टिकालो[१७] आणि बिगोलोम[१८] हे त्याच्या ताब्यात आहेत. या प्रदेशाची सरहद्द आदिलशहाच्या राज्यास लागून असून, तिथे गव्हाची पैदास बरीच होते. शिवाय इतर धान्ये, गुरे, बकरी, तीळ, कापूस यांचेही प्रमाणे भरपूर आहे. या कापसाचे सूत चांगले निघते आणि या भागात सर्व कापड त्यापासूनच तयार करतात. या सरदाराचे उत्पन्न सहा लक्ष *परदाओ* आहे. राजासाठी त्याला अडीच हजार घोडदळ, वीस हजार पायदळ आणि वीस हत्ती पदरी बाळगावे लागतात. सलिना दीड लक्ष *परदाओ* त्याला राजास द्यावे लागतात.

येलप्पा नायक नावाचा एक विंगापूरचा सरदार आहे. इथली जमीन सुपीक असून, त्या बि-बियाणे व गुरे यांच्या पैदाशीस अनुकूल आहे. या सरदाराचा महसूल तीन लक्ष *परदाओं*चा आहे. आपल्या पदरी त्याला बाराशे स्वार, वीस हजार पायदळ आणि अठ्ठवीस हत्ती ठेवावे लागतात. राजाला तो दरवर्षी ऐंशी हजार *परदाओं* देतो.

रत्नभांडाराचा मुख्य अधिकारी नरवर[१९] नावाचा असून तोच ओडेगमा या नवीन

---

१६. रतीहळ्ळी (?)

१७. टाकळी (?)

१८. बागलकोट.

१९. नरहरी. हा अच्युतरायाने वसंवलेल्या वरदाजम्मनपट्टण या नवीन उपनगराचा प्रमुख होता.

वसवलेल्या शहराचा प्रमुख आहे. त्याच्या ताब्यात दिग्गुओती,[२०] एतारेम,[२१] दारोजी,आणि बिसनागच्या हद्दीत लागून असणारी इतर जमीन आहे. ही सर्व जमीन लागवडीची असून, तिथे सालिना उत्पन्न चार लक्ष *परदाओ* आहे. यापैकी दोन लक्ष *परदाओ* तो राजास देतो आणि उरलेल्यातून आपले बारा हजार पायदळ, सहाशे स्वार आणि वीस हत्ती यांचा खर्च भागवतो.

चिन्नप्पा नायक नावाचा सरदार राजाचा खाजगीतील सेनाधिकारी आहे. अंतर्गत भागातील कोचीनच्या दिशेस असणाऱ्या 'कंकाली' [२२] व इतर भूप्रदेश यांचा तो मालक आहे. त्याचे वार्षिक उत्पन्न तीन लक्ष *परदाओ* आहे. दरवर्षी राजास तो एक लक्ष *परदाओ* देतो आणि पदरी आठशे स्वार आणि दहा हजार पायदळ बाळगतो.

कृष्णाप्पा नायक हा आयोसेल [२३] या मोठया शहराचा सरदार आहे. त्याच्या ताब्यात इतर बरीच खेडीही आहेत. पण त्याचे नावे कठीण असल्याने मी त्यांचा उल्लेख इथे करीत नाही. त्याला मिळणाऱ्या जमिनीचा महसूल प्रतिवर्षी वीस हजार सुवर्ण परदाओ एवढा असतो. यातील सात हजार *परदाओ* तो दरवर्षी राजास देतो. त्यांच्या पदरी पाचशे स्वार आणि सातशे पायदळ आहे.

बचप्पनायक [२४] हा बोदियाल प्रांताचा सरदार असून, हा प्रांत समुद्रकिनाऱ्यावर असणाऱ्या मामलगोराला लागून आहे. 'गुईआना' देखील याच्याच ताब्यात आहे. या भागात ऊस, मिरे, ताग आणि तांदूळ यांची बरीच पैदास होते. पण गहू किंवा इतर कोणत्याही प्रकारचे कापड होत नाही. मेण मात्र भरपूर होते. जमिनीपासून सरदाराला मिळणारा महसूल सालिना तीन लक्ष परदाओंचा आहे. त्याच्या पदरी आठशे स्वार व दहा हजार पायदळ व पंधरा हत्ती आहेत. राजाला तो दहा हजार *परदाओ* देतो.

कृष्णदेवरायाच्या पदरी पागाप्रमुख म्हणून काम पाहाणारा मलाप्पा नायक हा आवली [२५] प्रदेशाचा सरदार आहे. हा प्रदेश कालेक्याच्या आतील भागात आहे. या जमिनीत लोखंड सापडते. कापूस, तांदूळ,बकरी, गाई, म्हशी यांचेही प्रमाण विपुल आहे. सरदाराचे उत्पन्न सालिना पंधरा हजार परदाओ असून, त्याने पदरी चारशे स्वार आणि सहा हजार पायदळ अशी फौज बाळगली आहे. राजाला तो दरवर्षी पाच हजार

---

२०. दुर्गावती (?)

२१. होस्पेट जवळील अनंतपूर.

२२. कलाले किंवा कोलळ (कोलार ?) कोचीनच्या दिशेने असणारे कलाल (?)

२३. कृष्णाप्पानायक होयसळचा सरदार होता.

२४. बचप्पनायक हा बुदियाळीसिंहचा प्रमुख होता. हा भाग आता कडूर जिल्ह्यात आहे.

२५. स्नोराबमधील आवळी (?)

परदाओ देतो.

राजाचा प्रमुख सल्लागार असणारा अडप्पानायक[२६] 'गाटे' या प्रदेशाचा सरदार आहे. तिथे हिऱ्यांच्या खाणी आहेत. याखेरीज त्याच्या इतरत्रही जमिनी आहेतच. या सर्वांचे मिळून त्याला तीन लक्ष सुवर्ण *परदाओ* एवढे उत्पन्न मिळते. हिरे, रत्ने यांच्या खाणीचे उत्पन्न तर निराळेच. राजाला तो दरवर्षी चाळीस हजार *परदाओ* देतो. वीस 'मॅंगेलिन' पेक्षा जास्त वजनाचे हिरे निघाल्यास तो राजास त्याच्या खजिन्यासाठी द्यावेत, अशी अट असते. त्याच्या पदरी आठ हजार पायदळ, आठशे स्वार आणि तीस हत्ती आहेत. राजाला तो दरवर्षी एक लक्ष *परदाओ* देतो.

बचप्पानायक हा मुद्‌गल किल्ल्याचा प्रमुख आहे. हा किल्ला आधी आदिलशहाच्या ताब्यात होता पण त्याला लागून असलेले रायचूर घेतले त्यावेळी कृष्णदेवरायाने हा किल्लाही जिंकून घेतला. हा किल्ला आणि इतर बाकीचा प्रदेश यांचे उत्पन्न चार लक्ष *परदाओ* एवढे होते. बजप्पा नायकाने एक हजार घोडदळ, दहा हजार पायदळ, आणि पंधरा हत्ती अशी फौज बाळगली आहे. राजाला तो दरवर्षी दीड लक्ष *परदाओ* देतो.

अशारीतीने विजयनगरच्या राज्याची विभागणी दोनशेपेक्षा जास्त सरदार, अधिकारी यांच्यात झाली आहे. हे सर्व मूर्तिपूजक आहेत. त्यांच्या ताब्यातील प्रदेश आणि त्यांचा महसूल यानुसार त्यांनी किती फौज बाळगावयाची आणि सप्टेंबरातील नऊ दिवसांच्या उत्सवात राजाच्या खजिन्यात किती भरणा हे करायाचा हे राजाने ठरवून दिलेले असते. भरणा केलेल्या रकमेची पावती त्यांना राजाकडून कधी मिळत नाही. रक्कम भरली नाही तर मात्र शिक्षा होते आणि मालमत्ता जप्त केली जाऊन त्यांची मग वाताहत होते. राज्यातले सर्व सरदार मेणे व पालखी यांचा वापर करतात. आपल्याकडे शववाहिका असते तशा या पालख्या असतात. त्या उचलून खांद्यावर वाहून नेतात. सर्वांत वरच्या दर्जाचे सरदार, सेनाधिकारी आणि प्रमुख व्यक्ती यांच्याखेरीज इतरांना मेणे-पालखी वापरण्याची परवानगी नाही. राजा दरबारात असतो तेव्हा वीस हजार मेणे व पालख्या असतात.

विजयनगरचे वैभव आणि सामर्थ्य याविषयी मी जे सांगितले आहे ते तुम्हास कदाचित अतिरंजित वाटेल. पण भूतकाळात हे वैभव व सामर्थ्य आता आहे त्यापेक्षाही अधिक गौरवशाली होते असे इकडील लोक खात्रीपूर्वक सांगतात.

या राज्यात एक विशिष्ट वर्गाचे लोक आहेत ते म्हणजे ब्राम्हण. बहुतेक ब्राम्हण हिंसा करीत नाहीत. किंवा मांसाहार करीत नाहीत. असे ब्राम्हण सर्वांत चांगले असतात. हे

---

२६. अडप्पानायक हे नाव पंडयप्पनायक याबद्दल चुकीने पडले असावे.
पंडयनायक याचा अंमल त्यावेळी खालच्या आणि वरच्या घाट प्रदेशावर होता.

लोक प्रामाणिक सचोटीचे असून, व्यापार उदीम करतात. ते तीक्ष्ण बुध्दीचे असून, हिशोबाला अतिशय चोख असतात. त्यांची अंगकाठी सडपातळ, बांधेसूद असते अंगमेहनतीचे काम मात्र त्यांना जमत नाही. या लोकांच्या कर्तबगारीवरच राज्य चालते. त्यांची धारणा अशी की, त्रिमूर्ती असली तरी ईश्वर एकच आहे. या पवित्र त्रिमूर्तीस ते 'त्रिसेबका' [२७] म्हणतात. दुसरा वर्ग आहे. तो कानडयांचा असून त्याच्या देवालयात माकड, गाय, महिष आणि वेताळ यांच्या (मूर्ती ?) असतात. या मूर्तीचा मान फार मोठा असतो. ते सांगतात की, फार पूर्वी हा सर्व प्रदेश ते ज्यांच्या मूर्तीची पूजा करतात त्या माकडाचांच [२८] होता. व त्या काळी माकडाना बोलता येत असे. त्यांच्या ग्रंथात शिलेदारीच्या चांगल्या कथा सांगितल्या आहेत. तसेच त्यांच्या मूर्तीसंबंधी अशा काही भाकडकथा आहेत की त्यावर विश्वास ठेवणे तर्कास सोडून वाटते. पण त्यामुळे झाले आहे असे की, बिसनागच्या राज्यात किंवा इतरत्रही या मूर्तिपूजकांच्या देशात माकडांना कोणी मारत नाही. त्यामुळे या देशात माकडे इतकी आहेत की, पहाड त्यांनी भरून जातात. 'तेलमगले' नावाच्या लोकांना अजून एक वर्ग आहे. यांच्यात नवरा मेला की त्याच्या बायकोस त्याच्याबरोबर जिवंत पुरतात.

बिसनागचा राजा ब्राम्हण [२९] आहे. ब्रम्हचारी असलेल्या स्त्रीला स्पर्शही न करणाऱ्या एका ब्राम्हणाचे उपदेशपर प्रवचन तो दररोज श्रवण करतो. सर्वांनी ईश्वराच्या आज्ञांचे पालन करावे, म्हणजेच हिंसा करू नये, दुसऱ्याच्या मालमत्तेचा अपहार करू नये, असा उपदेश हा ब्राम्हण प्रवचनावेळी करतो. या लोकांची गाईवर एवढी भक्ती आहे की, ते रोज गाईचे चुंबन घेतात. काही जण म्हणतात की, हे गाईच्या पार्श्वभागाचे चुंबन

---

२७. त्र्यंबक. पोर्तुगीज संहितेत 'कानडी' अशा अर्थाचा canaras हा शब्द आहे. दक्षिण कॅनरामध्ये लोक भुते, वेताळ, महिष यांची पूजा करतात. हनुमान हा देव कर्नाटकात सर्वत्र आढळतो.

२८. किष्किंधा तुंगभद्रेच्या काठावर होती, तिथे राम हनुमान भेट झाली आणि रामाने झाडापाठीमागे लपून वालीचा वध केला असे वर्णन रामायणात आहे. किष्किंधा म्हणजे वानरांचे राज्य होते या समजुतीने आजसुध्दा काही भींती लोक दाखवतात व त्या सुग्रीवाच्या काळात वानरांनी बांधल्या असे सांगतात. हंपीजवळ एक जागा दाखवण्यात येते ती म्हणजे वालीभंडार असून, कोणी तिच्याजवळ जाऊ नये, तसे करण्याचा प्रयत्न केल्यास तो आधंळा होतो असे लोक सांगतात. हंपीजवळ राखेचे ढीग आहेत ते म्हणजे वालीची हाडे असे सांगण्यात येते. अनेगोंदीपासून एक मैलवर नैसर्गिक खडकाळ टेकडयांनी वेढलेले चित्रवत असे सरोवर आहे. पंपमहात्म्यानुसार, शिवाशी विवाह व्हावा म्हणून पंपा या नावाने पार्वतीने इथे तपश्चर्या केली. काही जणांच्या मते एकेकाळी तुंगभद्रा आणि पंप सरोवर मिळून पंपसरस नावाची एकच मोठी नदी होती. पंपाक्षेत्र हे नाव नदी आणि देवी या दोहोंवरून पडले आहे.

२९. हे चूक आहे.

असते. पण हे त्यांना उपमर्दकारक असल्याने मी खात्रीपूर्वक सांगू शकत नाही. पापक्षालनासाठी पवित्र तीर्थ म्हणून गोमूत्र तसेच गोमय[३०] वापरतात. ब्राम्हण पुरोहितांसमोर आपल्या पापांचा पाढा वाचावा, अशी आज्ञा त्यांच्या धर्मात आहे पण काही अतिशय धार्मिक वृत्तीचे लोक सोडल्यास इतर ती क्वचितच पाळतात. दुसऱ्या माणसासमोर आपल्या पापाची कबुली देणे लाजिरवाणे वाटते असे सांगून ते याचे समर्थन करतात. आणि देवापाशी ते कबूल केले तरी पुरे असे म्हणतात. जो अशी कबुली देत नाही त्याला अर्थात परमेश्वरी कृपेचा अनुग्रह होत नाही. अशारीतीने या ना त्या प्रकारे ईश्वरी आज्ञांचे पालन आवश्यक ठरते. प्रत्यक्षात मात्र ते पाप निवेदन क्वचितच करतात, त्यामुळे ही आज्ञा दुर्लक्षित राहाते असे म्हटले तरी चालेल.

बिसनागच्या राज्यातील सर्व लोक मूर्तिपूजक आहेत. पती मरण पावला की, त्याच्याबरोबर पत्नीनेही स्वत:ला जाळून घ्यावे अशी इथली चाल[३१] आहे. ही चाल बहुमानाची निदर्शक समजली जाते. त्यामुळे इकडे स्त्रिया पती मृत्यू पावला की, इतर आप्तेष्टाबरोबर शोक करतात. पण जास्त शोक करणारी स्त्री असेल तर तिला आपल्या नवऱ्याबरोबर जावयाचे नाही असे समजतात. शोक करणे संपल्यानंतर या स्त्रियांचे नातेवाईक त्यांना सहगमन करावे, त्यायोगे कुळास कलंक लागणार नाही असे सांगतात. असे म्हणतात की, यानंतर फुले व डहाळ्या यांनी शृंगारलेल्या ताटीवर मृतदेह ठेवण्यात येतो. एका साध्या घोड्यावर बसून ती स्त्री सर्वांच्या मागोमाग जाते. तिच्या अंगावर बरेच दागदागिने व फुलांचा साज असतो. तिच्या एका हातात डहाळी व दुसऱ्या हातात आरसा असतो. वाद्ये वाजवीत हे आप्त लोक मिरवणुकीने जातात आणि त्यांच्याबरोबर ही स्त्रीदेखील आनंदाने जाते. पुढे एक माणूस लहानसे ढोलके वाजवीत जातो आणि गाणी म्हणून ''तू आता लवकरच पतीकडे जात आहेस'' असे त्या स्त्रीला सांगते. ती स्त्रीदेखील आपण ''पतीच्या भेटीस जात आहोत'' असे गाण्यात उत्तर देते. स्मशानात पोहोचल्यानंतर दहन होईपर्यन्त ती इतरांच्या बरोबर वाट पाहात थांबते. मरण पावलेल्या नवऱ्याचा देह खास तयार केलेल्या एका खड्ड्यात ठेवलेला असतो. त्यात लाकडे जमवून ठेवलेली असतात. अग्नी देण्यापूर्वी मृताची आई किंवा सर्वात जवळचा आप्त, डोक्यावर पाण्याने भरलेले मडके आणि हातात पेटते लाकूड घेऊन त्या खड्ड्यास तीन फेऱ्या घालतो. प्रत्येक फेरीच्या वेळी मडक्यास एकेक भोक पाडतात.

---

३०. गाय व गोमूत्र पवित्र समजले जातात.

३१. सती अथवा सहगमन, भारतात येणाऱ्या जवळपास सर्व परदेशी प्रवाशांनी या प्रथेविषयी आश्चर्य वाटून लिहिले आहे. सतीची चाल एकोणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यन्त होती. १८२९ साली ती बंद करण्यात आली. कर्नाटकात बऱ्यात सती आणि आणि वीरनायक यांच्या समाधींचे दगड, बऱ्याच ठिकाणी दिसतात. लढाया व राजांच्या कारकीर्दी यांचा काल निश्चित करण्यासाठी त्यांचा उपयोग होतो.

तीन फेऱ्या संपताच हे लहानसे मडके जमिनीवर फेकून फोडतात. व पेटते लाकूड खड्ड्यात टाकतात. यानंतर चितेस अग्नी दिला जातो. दहन होताच ती स्त्री इतरांच्या बरोबर पुढे येते व आपले पाय धुते. एक ब्राह्मण शास्त्रात सांगितलेले संस्कार व विधी करतो. ते संपताच ती आपल्या अंगावरील सर्व दागिने काढून आप्तस्त्रियांना आपल्या हाताने वाटून देते. मुले असतील तर त्यांचा सांभाळ करा, असे वडिलधाऱ्या मंडळींना सांगते. मग तिच्या अंगावरील वस्त्रे - चांगली असतील तर तीसुध्दा काढून तिला एक साधेसुधे पिवळे वस्त्र नेसवतात. नंतर एक हात नातेवाईकांनी धरलेला व दुसऱ्या हातात एक डहाळी, अशी ती स्त्री गात गात चितेच्या खळग्यापर्यन्त जाते तिथे पायऱ्या असलेला एक चौथरा केलेला असतो, त्यावर ती चढते. हे करण्यापूर्वी चितेला पुन्हा तीन फेऱ्या घालतात. ती स्त्री नंतर पायऱ्या चढून चौथऱ्यावर जाते आणि समोर एक पडदा धरते ज्यायोगे पेटत्या ज्वाला तिला दिसत नाहीत. चितेमध्ये मग दोन पुरचुंड्या टाकतात. एकात तांदूळ असतात तर दुसऱ्या पुरचुंडीत विड्याची पाने. त्या स्त्रीचा आरसा, फणी या वस्तू असतात. पतीकडे पोहोचल्यावर या शृंगारवस्तू तिला कामी येतील असे ते म्हणतात. अखेर ती सर्वांचा निरोप घेते आणि डोक्यावर तेलाचे भांडे ठेवून इतक्या धैर्याने चितेत उडी घेते की, त्याचा विस्मय वाटतो. नातेवाईक हाती लाकडे घेऊन तयारच असतात. तिने चितेत उडी घेताच ते ही लाकडे भराभर चितेत टाकतात आणि मोठमोठ्याने आक्रोश करतात. एखादा सरदार मरण पावला तर त्याच्या बायकांची संख्या कितीही असो, त्या सर्व जण सती जातात. राजा मरण पावला तरीही हेच असते. तेलुगा[३२] नावाची जात सोडल्यास या मूर्तिपूजकांच्या देशात सती जाण्याची प्रथा सर्वत्र पाळली जाते. तेलुगांमध्ये मात्र नवरा मरण पावला तर त्याच्या स्त्रीला त्याच्याबरोबर जिवंत पुरतात. ती स्त्री आनंदाने खड्ड्याजवळ असते. खड्ड्याजवळ जाते. खड्ड्यात दोन आसने तयार केलेली असतात. मग तिच्यासाठी आणि दुसरे तिच्या नवऱ्यासाठी. या आसनावर त्यांना बसवून हळुहळू सगळा खड्डा मातीने भरतात. अशारीतीने ती स्त्री आपल्या नवऱ्याबरोबर मरण पावते.

---

३२. तेलुगू ही जात नसून एक भाषिक गट आहे. 'कास्टा' या पोर्तुगीज शब्दाचा अर्थ लोकसमूह (जमात, वंश) असा होतो. आज मर्यादित अर्थाने जो 'कास्ट' (जाती) हा शब्द वापरला जातो त्याचे मूळ हे आहे.

# प्रकरण २३

## *ब्राह्मण लोकांतील अंत्यविधी*

एखादा ब्राह्मण आजारी पडून मृत्यूशय्येवर असेल तर त्यावेळी त्याच्या विद्वान अशा पुरोहितांना त्याच्यासाठी देवाची प्रार्थना करण्यास आणि त्याचे सांत्वन करण्यास बोलावतात. ते येऊन त्याला आत्म्याच्या मुक्तीचे मार्ग इत्यादीविषयी सांगून त्यासाठी दानधर्म करण्यास सांगतात. हा विधी आटोपल्यानंतर पुरोहित लोक त्या माणसाचे क्षौर करवून त्याला स्नान घालतात. स्नानानंतर एक सवत्स घेनूघरात आणली जाते. इकडे ब्राह्मण कितीही गरीब असले तरी त्यांच्या घरी गाय नाही असे होणार नाही. मरणोन्मुख माणसाला स्नान घातल्यानंतर एक वस्त्र घेऊन त्याचे एक टोक गाईस बांधतात. तर दुसरे टोक त्या माणसाच्या हातात देतात. तो माणूस मग आपल्या आत्म्याला मुक्ती मिळावी म्हणून त्या सवत्स गाईचे दान, हे विधी करणाऱ्या पुरोहितांना करतो. आसन्नमरण माणूस त्यादिवशी आपल्या दर्जानुसार यथाशक्ती दान देतो आणि त्यासाठी बोलावलेल्या ब्राह्मणांना भोजन घालतो. हे विधी केले असता आजारी असणारा माणूस त्याच्या कपाळी आयुष्य असेल तर जगतो किंवा लवकर मरतो, अशी इकडे श्रध्दा आहे.

आजारी पडलेला माणूस मरण पावल्यानंतर तो जिथे होता ती जागा धुऊन काढतात. त्यानंतर शेणाने ती जागा सारवतात आणि त्यावर मृतदेह ठेवतात. आजारी माणसाला जमीन सोडून पलंग किवा इतर कोणत्याही ठिकाणी मरण आल्यास पाप लागते असे समजले जाते. मृतदेह जमिनीवर काढून ठेवताच, पिंपळाच्या डहाळ्या बांधलेली तिरडी तयार करतात. तिरडीवर ठेवण्यापूर्वी प्रेतास पुन्हा एकदा शुध्द पाण्याने स्नान घालून चंदनाचे तेल लावतात. प्रेताशेजारी तुळशीच्या फांद्या ठेवून त्यावर नवीन वस्त्र टाकतात. आणि मग ताटीवर ठेवतात. नंतर मृताच्या आप्तापैकी एकजण एका बाजूने तिरडी धरतो दुसऱ्या बाजूंनी ती उचलून धरण्यासाठी तिथे असलेल्या ब्राह्मणांपैकी तिघांना बोलावतात. याप्रमाणे तिरडी उचलून स्मशानात घेऊन जातात. तिरडीसमोर बरेचसे ब्राह्मण भजन करीत चालतात. सर्वात पुढे मृताचा मोठा मुलगा, तो नसेल तर धाकटा भाऊ किवा मग सर्वात जवळचा आप्त हातात अग्नी घेऊन चालतो. चिता पेटवण्यासाठी हा अग्नी असतो. स्मशानात पोहोचताच यथाशक्ती दानधर्म केला जातो

आणि मग चितेला अग्नी देतात. सर्व शरीराचे दहन होईपर्यन्त लोक थांबतात. नंतर सर्व जण तलावास जाऊन स्नान करतात व आपापल्या घरी परतात. ज्या मुलाने, भावाने किंवा आप्ताने अग्नी दिला त्यास मृतदेह ठेवला होता त्या भूमीवर नऊ दिवस झोपावे लागते. नऊ दिवसांनंतर पुरोहित उपाध्ये मंडळी येतात व त्या माणसाचे क्षौर करवून घेतात. या नऊ दिवसांत गरिबांना अन्नदान करून त्यांना मृत माणसाचे कपडे देतात. त्याचा पलंग व बिछाना, काही दक्षिणेसहित ब्राह्मणांना देतात. मृत व्यक्ती धनवान असेल तर ब्राह्मणांना बागबगीचे, भूमी यांचे दान करण्यात येते. इतरही दानधर्म करतात. दहा दिवसांनी, क्षौरविधी झाल्यानंतर मृताचा मुलगा स्मशानात जातो. मृत माणसांची रक्षा व अस्थी राहिलेल्या असतात. त्या एका लहानशा कलशात विधिपूर्वक जमा करतात. जमिनीत एक लहानसा खळगा करून त्यात कलश पुरून ठेवतात. अस्थीचे नंतर नदीत विसर्जन करावयाचे असते. म्हणून कलश असा सुरक्षितपणे ठेवतात. अस्थी विसर्जन जिच्यात करावयाचे असते ती नदी [१] गोव्यापासून एक हजार कोसांपेक्षा अधिक दूर आहे. तिथे एक भव्य देवालय [२] असून, ते तीर्थक्षेत्र आहे. तिथे मरण पावलेला प्रत्येक यात्रेकरू मोक्ष मिळवतो व स्वर्गास जातो, असे समजले जाते. ज्या मृत व्यक्तीच्या अस्थी इथल्या नदीत टाकतात त्याही मोक्ष मिळवून स्वर्गास जातात असे समजतात. पण असे असूनही प्रत्यक्षात मात्र फार कमी लोक तिथे जातात. मृत माणसाचा बाप, मुलगा किंवा जो वारस असेल तो अकरा दिवस सत्तावीस ब्राह्मणांना जेवू घालतो. नंतर एकवीस दिवस तीन, पुढचे बारा दिवस सात व त्यापुढचे सत्तावीस दिवस पुन्हा तीन - या संख्येने ब्राह्मणांना जेवू घालावे लागते. महिन्याच्या शेवटच्या दिवशी अजून तीन ब्राह्मण जेवू घालतात. आणि त्यानंतर वर्षभर महिन्यातून एकदा तीन ब्राह्मणांना भोजन घालतात. मृताच्या आत्म्याला सद्गती मिळावी म्हणून त्रिमूर्तीच्या नावाने हे ब्राह्मणभोजन घातले जाते. वर्ष संपल्यानंतर दानधर्म करीत नाहीत. फक्त दरवर्षी ती व्यक्ती मरण पावली असेल तो दिवस (श्राध्दाचा) म्हणून पाळतात. त्यादिवशी सहा ब्राह्मण जेवू घालतात. यापैकी तीन त्रिमूर्तीच्या नावाने जेवतात तर उरलेले तीन मृताचा पिता, आजोबा, पणजोबा या पितरांच्या नावे जेवतात. अशारीतीने सर्वांचे जणू सहभोजनच होते.

अशारीतीने देवास प्रसन्न केले जाते. यासाठी लागणारा खर्च भागवण्यासाठी गरीब लोक दानाची याचना करतात. जेवणापूर्वी सहाही ब्राह्मणांचे पाय धुतात. भोजनप्रसंगी काही विधी करतात. त्यासाठी ब्राह्मण पुरोहितांना मुद्दाम बोलावलेले असते.

---

१ उत्तरेतील गंगा नदी.

२ काशीतील विश्वेश्वराचे मंदिर.

# सूची

# संदर्भ

1) *इंडियन एपिग्राफी*

2) *एपिग्राफिया कर्नाटका :* भाग एक ते सोळा

3) *वार्षिक अहवाल.* म्हैसूर पुरातत्व विभाग

4) लोपेझ, डेव्हिड. *'क्रॉनिक दूश रेइश द् बिसनाग'* क्वार्तू सेन्तेनारियु दिश्कोब्रिमेंतु द् इंदिय, कोंत्रिब्रुइसाँइश द् सोसियदाद जेओग्राफीय द् लिश्बोअ, इंप्रेस् नासिओनाल, लिश्बोअ 1897

5) स्युअल, रॉबर्ट. *'ए फॉरगॉटन एंपायर'* जी. ॲलन अनविन लिमिटेड, लंडन 1924, पहिली भारतीय आवृत्ती - नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया 1962

Printed at The Central Electric Press A-12/1 Narama Indl. Area, Phase-I, New Delhi-28.